# प्राचीन मराठी पद्य

[ आद्य मराठी कवींपासून पंडित कवि–अखेरपर्यंतचा
प्रातिनिधिक काव्यसंग्रह ]


संपादक

**मा. चि. टेंभेकर**, एम्. ए.

**मा. ग. बुद्धिसागर**, एम्. ए.

दयानंद अँग्लो वैदिक कॉलेज, सोलापूर.


किंमत तीन रुपये




चित्रशाला प्रकाशन : पुणें २

# हृद्गत

प्राचीन काव्याचें वाचन दिवसेंदिवस कमी होत आहे. पूर्वीच्या शिक्षणपद्धतींत शिस्तीनें थोडेंफार जुनें काव्य घरीं व शाळेंत वाचलें जाई. भगवन्ताच्या लीलांचें सक्तीनें घडलेलें हें वाचन अनेकांस त्या काव्याची गोडी लावी. आजकाल जरी शाळांतून प्राचीन काव्याचे वेचे असतात तरी ते वरच्या वर्गांत व त्रोटक आणि तोळाभर वजन भरेल इतकेच असतात. ही परिस्थिति सुधारली पाहिजे. विशेषतः जीं विद्यापीठें मातृभाषा व संस्कृत भाषा यांच्या विशेष अध्ययनार्थ आहेत तेथें तर याकडे विशेष लक्ष पुरवलें गेलें पाहिजे. प्राचीन काव्याची गोडी शाळेंत असतां 'नवनीत' वाचून व घरीं आईवाडिलांस श्रीधर–रामदासादिकांचे ग्रंथ वाचून दाखवून ज्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली त्या जुन्या काळच्या विद्यार्थ्यांना शाळेचे असो पण महाविद्यालयांतहि तिसऱ्या वर्षापर्यन्त प्राचीन काव्य वाचावयास लावण्याची व्यवस्था नाहीं हें पाहून विषाद वाटणें साहजिक आहे. अशा रीतीनें तरुण पिढी प्राचीन महाराष्ट्र–संस्कृतीस वंचित होत आहे.

मराठी वाङ्मयाचा इतिहास पाहिला असतां असें आढळून येईल कीं इतर देशांच्या वाङ्मयाशीं तुलना केली असतां मराठी अथवा कुठल्याहि भारतीय भाषेचें प्राचीन वाङ्मय ( जें प्राधान्यानें पद्यमयच आहे ) हेंच तिचें खरें, शाश्वत व प्रातिनिधिक वैभव आहे. इंग्रजांच्या आगमनानंतर छापखाने आल्यावर भराभर पुस्तकें छापलीं जाऊं लागलीं असलीं व आधुनिक साहित्याची प्रगति व स्वरूप असमाधानकारक नसलें तरी या वाङ्मयांत बऱ्याच अंशीं परप्रेरितता, परानुकरण व किमानपक्षीं प्रत्यक्षाप्रत्यक्ष परवाङ्मयाचा परिणाम झालेला दिसून येतो. असें नसल्यास तें निस्सत्व, निर्जीव व स्वप्नरंजनात्मक वाटतें. मग तें भरेंहि क्षणैक द्राक्षासवाप्रमाणें उत्तेजक वाटो. याला निवडक वैचारिक साहित्याचा अपवाद आहे. प्राचीन साहित्य ललित असूनहि उद्बोधक आहे. तेव्हां, विद्यार्थ्यांच्या अभिरुचीस वळण लागावें म्हणून, त्यांच्यांत सांस्कृतिक जागृति व आत्मविश्वास उत्पन्न व्हावा म्हणून, त्यांच्या पुढें वैयक्तिक व सामाजिक आदर्श असावा म्हणून, संत व पंत कवींचें निवडक साहित्य भरपूर वाचलें गेलें पाहिजे.

'नवनीता 'ची कामगिरी त्याच्या निघालेल्या अनेक आवृत्त्यांनीं जाहीर केली. हें पुस्तक 'वाकुडां विंचुकीं पाउलीं' त्याच्या पाउलांवर आपलें पाहिलें पाऊल टाकीत आहे. प्राचीन मराठी वाङ्मयांतील आशय, विषय, रचना व सौंदर्याविष्कार यांचें विद्यार्थ्यांस दिङ्मात्र-दर्शन व्हावें व त्याची गोडी लागावी हा आमचा उद्देश आहे. व्यवहार हा एक कडक शिस्तीचा पंतोजी आहे. वाचकांस प्राचीन काव्याचें प्रातिनिधिक सम्यक्-दर्शन घडविण्याची संपादकांस पुष्कळ इच्छा असूनहि तिला व्यावहारिक मर्यादांचें उल्लंघन करतां आलें नाहीं याची व आपल्या दोषांची आणि पुस्तकांतील अनेक उणीवांची जाणीव आहे. प्राप्त स्थितींत सोलापूरसारख्या शहरीं जितकें करतां येईल तितकें करण्याचा प्रयत्न केला आहे. चोखंदळ रसिकांचें व विद्वानांचें संपूर्ण समाधान नाहीं, निदान असमाधान तरी होणार नाहीं अशी उमेद आहे. मुद्रण-दोष टाळण्याचा प्रयत्न करूनहि राहिले आहेत याबद्दल दिलगिरी वाटते.

पुस्तकाच्या प्रस्तावनेंत प्राचीन काव्याचें विहंगम-समालोचन येत आहेच. तेव्हां त्याविषयीं येथें अधिक न लिहिणें योग्य.

डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे, त्यांनीं गुरुवर्य गो. वि. तुळपुळे यांनीं केलेल्या क्रिस्त पुराणाच्या कांहीं भागाच्या प्रति-लिपीचा कांहीं अंश या पुस्तकासाठीं दिल्याबद्दल व केलेल्या मार्गदर्शनाबद्दल, अत्यंत आभारी आहोंत. तसेंच खिस्त-सेवा मंदिराचे (सोलापूर) श्री. जाधव यांनीं दिलेल्या माहितीबद्दलहि आभारी आहोंत. मुद्रणाविषयक दिलेला त्रास सहन करून असल्या पुस्तकास ग्राहक नसतांहि हौसेनें हें प्रकाशनाचें काम अंगीकारलें म्हणून मुद्रक-प्रकाशकांचे आभार मानणें आमचें कर्तव्य ठरतें. शेवटीं श्री. दा. पां. रानडे यांच्या सौहार्दाचा व सौजन्याचा ऋणानिर्देश करतां आला असता, पण तसें केल्यास तें सौजन्य पुढें न दिसण्याची भीति वाटते !

२४-९-५३
डी. ए. व्ही. कॉलेज,
सोलापूर.

संपादक.

# प्रस्तावना

प्राचीन मराठी पद्याचे कवि, विषय, काव्यप्रकार, छंदप्रकार इ० अनेक प्रकारांनीं वर्गीकरण करतां येईल. येथें, प्राचीन मराठी पद्यांत स्थूल मानानें पहिल्या दृष्टिपातास चटकन् दिसून येतें अशा प्रकारचें गटवारीनें वर्गीकरण केलें आहे. महानुभावीय, तात्त्विक, आख्यानक काव्य, संतवाणी व स्फुटकाव्य असे खंड येथें सोईच्या दृष्टीनें पाडले आहेत.

सर्वसाधारणपणें संस्कृतोत्पन्न भारतीय भाषांत ११ व्या किंवा १२ व्या शतकापासून ग्रंथ-रचना, आणि तीहि उत्तम प्रकारची, दिसून येते. महाराष्ट्राचा 'विवेकसिंधू'-सारखा ग्रंथ शके १११० त लिहिला जाऊं शकतो तर तत्पूर्वीं १०० वर्षें तरी बरेंच साहित्य मराठींत निर्माण झालें असलें पाहिजे. नाहींतर भाषेचें असें विकसित स्वरूप व आत्माविष्काराचें सामर्थ्य मराठींत आलें नसतें हें मराठी वाङ्मयाच्या गेल्या १५० वर्षांच्या इतिहासावरूनहि आपण सांगूं शकतों. दुर्दैवानें मुकुंदराजाच्या या ग्रंथाची तत्कालीन भाषाविशेष दर्शवणारी प्रत अजून उपलब्ध नाहीं. यामुळें राजवाडेसंपादित ज्ञानेश्वरी व महानुभावांचे आद्य ग्रंथ हेच प्राचीन मराठी भाषेचे प्रातिनिधिक ग्रंथ ठरतात. प्राचीन मराठी ग्रंथांच्या शोधांत बहुतेक धार्मिक व तात्त्विक वाङ्मयच उपलब्ध झालें आहे. यावरून धार्मिक व तात्त्विक साहित्याशिवाय इतर प्रकारच्या साहित्यास साक्षर जनतेचें उत्तेजन नव्हतें असा कयास करण्याशिवाय दुसरा मार्ग राहात नाहीं.

हा कालच धर्म-वर्चस्वाचा होता. निश्रेयसाच्या प्राप्तीसाठीं नवे मार्ग शोधण्यांत साधक आणि सिद्ध चूर होते. शंकराचार्यांचा काल हा देशी भाषांच्या व्युत्थानाचा काल. कित्येक शतकांची स्थितिशील, साचेबंद रूढ समाजव्यवस्था, स्पर्धाशील, कमजोर व शिथिल राजसत्ता, शिरजोर

अंमलदार, राजा, वतन, ग्राम व जाति या संस्थांचा शेतकऱ्यांवर भार, यांस असलेलें दैवी अधिष्ठान, या सर्वांच्या संकलित परिणामानें धर्मश्रद्धा व भोळेपणा यांस प्रतिष्ठा प्राप्त झाली. ब्राह्मण व क्षत्रिय हे समाजाचे पुढारी प्रेरणाशून्य व प्रवाहपतित बनून धर्मजीवन उथळ व संकुचित झालें. त्यास चेतना देण्यास व त्यांतील वैषम्य नष्ट करण्यास शैव, जैनादि संप्रदाय पुढें सरसावले व त्यांनीं प्रादेशिक भाषांत पंथसाहित्य निर्माण करून अध्यात्मजीवनास नवें वळण लावलें. तेव्हां नाथ व महानुभाव पंथांनीं महाराष्ट्रांत यापासून यथाकालींच बोध घेऊन, दलितांविषयीं जवळीक दाखवून आणि मराठींत शुद्धधर्मप्रचार करून जनतेची मान्यता मिळविली.

या काळाची एकंदर परिस्थिति पाहिली असतां राजा रामदेवरावाची कारकीर्द चालू असून तो न्यायानें क्षितिपोषण करीत होता असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें असलें तरी त्याचें राजकारणांत व युद्धकारणांत लक्ष नव्हतें म्हणून साम्राज्यसत्ता विस्कळित झाली व लहानमोठ्या राजांना अंकुश राहिला नाहीं, असें दिसून येतें. त्यानंतर तर पारतंत्र्याचा गाढ अंधःकारच होता.

आर्थिक दृष्ट्या शेतकरी स्वतःच जमीनमालक होता. त्याची जमीन अल्पोत्पादक असे आणि दुष्काळाचा मधून मधून त्याला तडाखा बसे. राजा, वतन, ग्राम, जाति, धर्म इ० संस्था प्रत्यक्षाप्रत्यक्ष त्याच्या उत्पन्नाचा बराच भाग हिरावून नेत. या संस्थांना ब्राह्मणवर्गानें दैवी अधिष्ठान दिल्यानें ही शेतकऱ्याची एक तऱ्हेची सोज्वळ धर्मनिष्ठ गुलामगिरीच होती. बलुत्याची पद्धति रूढ असून हे बलुतेदार ग्रामसंस्थेचा महत्त्वाचा भाग होता. ही संस्था स्वतंत्र व स्वयंपूर्ण असून तिचा साऱ्यापुरताच राजसत्तेशीं संबंध असे.

सामाजिक व धार्मिक क्षेत्रांत यज्ञयाग, व्रतवैकल्यें, जपजाप्य येवढ्यापुरतेंच धर्मभावनेचें क्षेत्र आकुंचित बनलें होतें. कर्मठपणाचें अवास्तव

बंड माजल्यामुळें नैतिक मूल्यांची चाड राहिली नव्हती. उच्चवर्णीयांत सुखासीनतेची व भोगविलासाची प्रवृत्ति वाढली होती. ब्राह्मण व क्षत्रिय कर्तव्यपराङ्मुख झाले होते. यादवांच्या कारकीर्दीत वैदिक विद्येस पाठिंबा असूनहि ठराविक चाकोरींतून जुन्या ग्रंथांचें चर्वित-चर्वण करण्यापलीकडे या पंडितांच्या हातून विशेष कामगिरी झाली नाहीं. बहुसंख्य समाज मूढ व अज्ञानी होता. त्याच्या धर्मश्रद्धेला उच्च विचाराची बैठक लाभली नाहीं. म्हणून अज्ञानानें, भीतीनें किंवा स्वार्थबुद्धीनें क्षुद्र देवतांची भक्ति करण्यापलीकडे धर्मश्रद्धेची मजल गेली नाहीं.

अशा तऱ्हेनें संतकवींच्या काळांत महाराष्ट्रीय समाज सांस्कृतिक व भौतिक दृष्टया,म्हणजे उत्पादन-साधनांच्या विकासाच्या अभावीं, मागासलेला होता. तो असंतुष्ट, असहाय व असंघटित होता. धर्मदृष्टया तो ' जन्मना जायते शूद्रः'च राहून दुर्लक्षित व पददलित राहिला होता. त्याचें असमाधान तीव्र असूनहि त्याला तें व्यक्त करण्याची वाट माहीत नव्हती. बलुतेदारांचा वर्गच काय तो आपल्या आजच्या कनिष्ट–मध्यमवर्गाप्रमाणें थोडीफार जाणीव असलेला होता. म्हणूनच त्यानें वारकरी पंथाच्या कार्यास हातभार लावला असला पाहिजे. हेंहि त्याकडून होण्याचें कारण त्याचें ठराविक काम व ठराविक उत्पन्न. त्यामुळें स्वस्थता व सवड मिळून पंथ–कार्याला मदत करतां येई. मग त्यानें तरी समाजव्यवस्थेविरुद्ध बंड करावयास हवें होतें असें म्हटल्यास, त्याचें उत्तर सुरक्षिततेच्या मोहामुळें झगडा करण्यास तो उद्युक्त झाला नाहीं हें आहे. शिवाय सत्तेचें अनेक संस्थांतून विभाजन झाल्यानें पिळणुकीचें स्वरूप एकदम जाचक वाटलें नाहीं. अशी एकंदरींत महानुभावीय व वारकरी या पंथांचें वाङ्मय निर्माण झालें त्या वेळची परिस्थिति होती.

महानुभाव साहित्याच्या परंपरेंत वैदिक परंपरेप्रमाणेंच शेंकडों ग्रंथ निर्माण झाले आहेत. महानुभावांनींहि भाष्यें, टीकोपटीका इ० लिहून आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रपंच थाटला आहे. काव्य, तत्त्वज्ञान, छंदःशास्त्र,

व्याकरण इ० अनेक विषयांवर त्यांनीं रचना केली आहे. सांकेतिक लिपिबद्धतेमुळें आणि अतिगुप्ततेमुळें त्यांच्या ग्रंथांतील भाषेचें स्वरूप कायम राहण्यास मदत झाली. कित्येक जुन्या अस्सल मराठी शब्दांची जणूं काय खाणच असा हा संप्रदाय आहे. महाराष्ट्राचा अभिमान बाळगणारा, महाराष्ट्रांत तीर्थस्थानें असणारा, असा हा भाषावैभवसंपन्न संप्रदाय व त्याचें साहित्य प्रदीर्घ काळपर्यंत महाराष्ट्रास तिरस्करणीय वाटत होतें. याचें आजच्या धार्मिक सहिष्णुतेच्या काळांत आपणांस वाईट वाटतें !

**महानुभावीय काव्य**

महानुभावांचे १३ व्या शतकांतील प्रमुख सप्तग्रंथात्मक साहित्य हें मराठी वाङ्मयाच्या प्रासादांतील एक स्वतंत्र दालन आहे. दामोदरपंडित, नरेंद्र व भास्करभट्ट यांच्याजवळ प्रतिभा व पांडित्य दोन्ही आहेत. या तिघां कवींच्या कवितेंत कल्पनाविलासाचें स्वतंत्र वैशिष्ट्य आहे. दामोदर-पंडिताच्या उपमा-दृष्टान्तांत वर्णनाचा तपशील, अध्यात्म व निसर्गवर्णनच्छटा आढळेल, तर नरेंद्राच्या सायंकाळवर्णनांत कल्पना व वास्तवता यांचें गमतीदार मिश्रण दिसून मराठींतील मुक्तेश्वरपूर्व दोन कवींची निसर्गवर्णन-पद्धति पाहून मन उल्हसित होईल. या काळींहि रससिद्ध कवि हास्यरसाचा पाक कसा उतरवीत हें भास्कराच्या उद्धव-नारदांनीं दाखवून दिलें आहे. कालमान लक्षांत घेऊन हा हास्यरस संस्कृतांतील हास्यरसापेक्षां अधिक हृद्य वाटतो कीं नाहीं याविषयीं वाचकांनीं विचार करावा. कोटि, संवाद-चातुर्य, स्वभावनिष्ठता किंचित् हिणकस चमत्कृति इत्यादि गोष्टींचें हें विनोदरसायन पुराणवाङ्मयांतील विनोदमूर्तींच्या रूपानें अवतरलें आहे. शिशुपालाच्या अत्याचारवर्णनांत ऐतिहासिक छटा असल्याचा संशय येणें साहाजिक आहे. 'शिशुपालवधांत भास्करानें शृंगार,वीर व हास्य आणि 'उद्धवगीतें'त भक्ति व कारुण्य हे रस यथाप्रसंग खेळविले आहेत. त्यांतील हास्याप्रमाणें शृंगाराचाहि नमुना येथें घेतला आहे. संस्कृतांतील प्रेमावस्थाविषयक संकेतांचा,

सांकेतिक कल्पनांचा व आतिशयोक्तीचा उपयोग जरी सढळ हस्तानें केलेला दिसला तरी त्याबरोबर विवेचकता व योजकताहि दिसेल. नारो-व्यासांचें 'ऋद्धिपुरवर्णन' हें कांहीं प्रापंचिक भावांचें उत्पत्तिस्थान नाहीं. तेथें भक्तीचा उदात्त भाव, सात्त्विक जीवनाचें प्रतिबिंब व थोर विभूतींच्या पवित्र स्पर्शानें पुनीत झालेल्या स्थलांचें तपशीलवार वर्णन, यांच्या योगानें वाचकाच्या हृदयांत पावित्र्याचा स्रोत निर्माण होतो. नरेंद्र व भास्कराप्रमाणें दामोदरपंडित व नारो व्यास यांना काव्यात्मकतेचा फुंद चढलेला दिसत नाहीं. त्यांच्या आलंकारिक वर्णनांत शालीनता आहे, दिमाख नाहीं. हें महानुभाव साहित्य या काळांत चरित्रवर्णन करतें, मराठी भाषेला पहिली कवयित्री महदंबेच्या रूपानें देतें, महाकाव्याचा थाट-माट दाखवितें, आख्यानक काव्याला चालना देतें आणि हें अपूर्व कार्य करून कदापि तुल्य व एकत्र नसणाऱ्या विद्वत्व, कवित्व व वैराग्य या गुणांना एकत्र आणतें.

**तात्त्विक काव्य**

तात्त्विक खंडांत मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, दासोपंत, रामदास व वामन या कवींचे वेंचे घेतले आहेत. ते अशा दृष्टीनें कीं सामान्य शिक्षित व रसिक वाचकांस रुक्ष व कठीण वाटणारा भाग टाळून त्यांतील भाषेचें व विचाराचें स्वरूप कळावें, किंवा काव्याच्या सौंदर्याचा अधिक आस्वाद घेण्यास यथाकाल त्याची प्रवृत्ति व्हावी व विषयवैचित्र्यहि यावें. या खंडांत साहित्यिक, आध्यात्मिक, सामाजिक व राजकीय विषय आले आहेत.

'अध्यात्मयोग' व 'स्वानुभव-खाजें' हे दोन्ही उतारे अध्यात्मपर आहेत. पहिल्यांत एकान्तस्थळीं बसून यौगिक पद्धतीनें आत्मस्वरूपचिंतन कसें करावें तें वर्णिलें आहे. सर्व वृत्ती आवरून विषयांवरून दृष्टि काढावी. स्थूलेंद्रियांतून मन अंतराकाशांत स्थिर करावें. हृदयाकाशांत

आत्मतत्व स्फुरत असतें तेंच विवेकानें पाहिलें असतां निरालंब परमात्मतत्त्वांत विलीन होतें आणि मग देहोपाधि राहात नाहीं. नदी उगमावरच स्थिर झाली तर जसा तेथेंच समुद्र होईल त्याप्रमाणें या आत्मस्थितींत जीव ब्रह्म कां होणार नाहीं? साधकानें विषयनिवृत्त होऊन अंतःकरणांत प्रवेश केला कीं ज्ञानस्वरूप आत्मारामच सर्वत्र व्यापून राहतो इ० या मुकुंदराजांच्या वर्णनांत कठिण विषयास जशी विशदता आहे तशीच दृष्टान्तांची मार्मिकता आहे. किंबहुना या मार्मिक दृष्टान्तांमुळेंच जटिल अध्यात्मकल्पना स्पष्ट होतात. 'स्वानुभव-खाजें' या उताऱ्यांत चांगदेवास ज्ञानेश्वरांनीं स्व-रूपविषयक तत्त्वज्ञान सांगितलें आहे. त्यांत 'तूं नि मी एक असल्यानें मीच नाहीं तर तूं कुठला असणार?' असें सांगून आपली भेट, 'मी' 'तूं' या शब्दांशिवाय आहे, या उपाधी गळाल्यावर सर्व एकच आत्मतत्त्व आहे हा सिद्धान्त व्यावहारिक दृष्टान्तांनीं विशद केला आहे. त्यांत आई व मूल, डोळा व चित्र, लवण-पाणी इ० दृष्टान्तांनीं विषय विशद केला आहेच. शिवाय समजावणीचा प्रेमळ कोमल भावहि आहे. 'गुरुलक्षण' व 'बंधमोक्ष' या उताऱ्यांतहि अध्यात्मविषय गुरूच्या निमित्तानें आला आहे. त्यांत खऱ्या व खोट्या गुरूंतील अंतर स्वच्छपणें दर्शविलें आहे. खरा गुरु आत्मज्ञानी, निर्मळ हृदयाचा, कामक्रोधांस भस्म करणारा, ब्रह्मसाक्षात्कारी, नुसत्या स्वसंनिधानानें शिष्यास ज्ञानी करून सोडणारा, शांत, उदार व वासनारहित असतो. याउलट खोटा गुरु आत्मतत्व न ओळखणारा, दांभिक, रजोगुणी, क्रोधशील, पादार्थिक, वासनामय, ज्ञानपण्य, अधिकाऱ्यास विद्यादान करणारा, मंत्रतंत्रवादी व विरुद्धमतवादी असतो इ० हे दासोपंतांचे अनुभवाचे खडे तात्त्विक बोल असले पाहिजेत हें त्यांच्या लेखनांतून दिसतें.

या तात्विक उताऱ्यांत समाजाचें प्रतिबिंबहि पडलेलें दिसतें. 'स्त्रिया, वैश्य व शूद्र' या उताऱ्यांत ज्ञानेश्वरांचें अवतारकार्य कोणास अधिक उपयोगी पडलें तें दिसतें. पापयोनी, अश्रुताधीत, दैत्य, वैश्य, शूद्र, अंगना,

सर्वांना एका भक्तानें ईश्वर पावतो. शत्रु, मित्र, कुळ, जात, वर्ण कांहींच त्याआड येत नाहीं. याविषयींचा ज्ञानेशांचा विस्तार ओघानें आला म्हणून केला अशापैकीं नाहीं. त्यांत पोटतिडीक आहे. 'पसाय-दानांत' ज्ञानेश्वरांचा मानव्याचा आदर्श आढळतो. भूतमात्राचा अज्ञाननाश व्हावा, संतमंडळींच्या गांठी-भेटी व्हाव्यात, सर्वांनीं सुखी व ईशभक्त व्हावें. इहपरलोकीं विजय मिळवावा, स्वधर्माचा सूर्य उगवावा, प्रत्येकास आपापलें मनोवांछित प्राप्त व्हावें, हा तो आदर्श आहे. नाथांच्या 'स्वधर्मांत' त्यांच्या काळीं ब्राह्मण किती अवनत झाले होते याचें अप्रत्यक्षपणें प्रतिबिंब पडलें आहे. ब्राह्मणांनीं स्वधर्माची उपेक्षा केली होती, वेदांविषयीं आदर नव्हता, या गोष्टींचे त्यांत उल्लेख असून त्यांना स्वधर्म व वेदाध्ययनाचें समर्थन करावें लागलें आहे शिवाय स्वधर्मानें संसारीं राहून 'पद्मपत्रमिवांभसा' राहतां येतें हें स्वोदाहरणानें त्यांनीं दाखवून दिलें तें वेगळेंच. 'निःस्पृहलक्षणांत' रामदासकालीन महाराष्ट्रांत देश म्लेंच्छमय झाला, स्वभूमि राहिली नाहीं, शिलेदाऱ्या करणारे उन्मत्त झाले, व्यापारी केवळ पोटार्थी झाले, स्मार्त–वैष्णवांची नसतीं भांडणें सुरू झालीं, वैदिकांना युक्तायुक्त विचार राहिला नाहीं, ही राष्ट्रस्थिति चित्रित झाली आहे.

राजकारणाचे दोन्ही समास, रामदासांचें संघटनाचातुर्य, त्यांचें आध्यात्मिक उद्दिष्ट, त्यांचे प्रपंचविषयक विचार, सूक्ष्मावलोकन, आलेला अनुभव यांचा मूर्तिमंत वस्तुपाठ आहे. ते सांगतात कीं, राजकारणाला आध्यात्मिक अधिष्ठान असल्यानेंच समयोचितता व दूरदर्शित्व येतें. राजकारण मानव्याच्या भूमिकेवर आधारलेलें असावें. हरिकथा, राजकारण सावधपण, क्षमा, परोपकार, न्याय, समयज्ञान, लीनता, ( अशक्यास शक्य करणारा ), दीर्घप्रयत्न संघटना, प्रसंगावधान, सहनशीलता, (नाहीं तर स्थानत्याग,) लोकांशीं एकात्मता, पाठांतर, कर्मयोग व कार्यें करवण्याची शक्ति, पीडा न देणारें राजकारण, लोकपरीक्षा, निराभिमानिता, वैभवनिराशा हे गुण राजकारणी मनुष्यास आवश्यक असल्याचें ते

म्हणतात. तसेंच असा मनुष्य ज्ञानी असून उदास, समुदायाचा हव्यासी, एकान्तसेवी, बित्तंबातमी ठेवणारा, अखण्डजागृत, कार्यरत, व उपासना-मार्गी असला पाहिजे. त्यानें जशास तसें वागावें, स्वतः कोणावर विश्वास न टाकतां कष्ट करावेत, लोकांकरवीं कार्य करवावें, मठीं राहून ताठा करूं नये, दुर्जनास महत्त्व देऊन सज्जनाप्रमाणें आळवावें; शूर स्वपक्षीय राजा आणावा, जशास तसें करून आपण दूर असावें, इतकें सूक्ष्म व तपशीलवार वर्णन रामदासांनीं केलें आहे. महंताचें कार्य भक्ताचें व राजकारणी मनुष्याचें असल्यानें त्यास शुद्ध लिहितां वाचतां येणें आवश्यकच होतें. त्याला विचारपूस करण्याचा, कार्यान्तर सांगण्याचा व अर्थ समजावण्याचा अधिकार होता. सावध, प्रयत्नवादी, धीट, दूरदर्शी असे लोक रामदासांनीं आपल्या कार्यासाठीं बाळगले होते. ही खटपट म्हणजे अगोदरच्या पायऱ्या. अन्तिम पायरीवर जाणाऱ्या उत्तम पुरुषास आधीं करून मग सांगावें, ज्ञानार्जन व ज्ञानदान करावें, हरिभक्तींत राहून मरणाचें स्मरण ठेवावें, धिक्कारल्यावरहि शांत राहावें, कीर्ति पाहावी, सुख पाहूं नये, लोकांस समजेसें हळू हळू शिकवावें, अशा प्रकारचें आचरण ठेवावें लागे.

भाषा-साहित्यदृष्ट्या ज्ञानेश्वरांच्या उताऱ्यांत लीनता, मार्दव, कोमलता यांचा सोनियाचा दिवस उगवून एकाहून एक सुंदर उपमा, रूपकें, दृष्टान्त, उत्प्रेक्षा यांच्या यथाकाल, यथोचित, यथास्थान सरींच्या सरी येऊन अमृतवर्षाव करतात. त्यांत त्यांचें सृष्टीचें, सांसारिक व्यवहारांचें मार्मिक व सूक्ष्म अवलोकन व अपार शब्दसंपत्ति-सुवर्ण दिसतें. प्रतिभा, कल्पना, अलंकार, पौराणिक संदर्भ, अर्थाच्या व भावनेच्या अनंत छटा, रसार्द्र द्राक्षपाकात्मक रचना, निवृत्तिनाथ, स्वतः, श्रीकृष्ण इ. चे स्वभावविशेष, भक्तिभावानें खुलविण्याची आगळी पद्धति, या सर्व गोष्टी ऐकून, पाहून, समजून त्यांपासून होणाऱ्या सुखानें वाचक वेडावून जातो.

नाथांच्या जवळ ज्ञानेश्वरांची प्रतिभा व विदग्ध रसवृत्ति नसली तरी

त्यांची वाणी रसाळ असून रसिकांस डोलावयास लावणाऱ्या चमत्कृति-पूर्ण व हृद्य रूपकांचा रम्य व ललित विलास, भक्ताचें भावोत्कट अंतःकरण व ज्ञानेश्वरांची निरहंकार लीनता 'एकादशस्कंधमाहात्म्यांत' प्रकट झालेली आढळेल. त्यांनीं या उताऱ्यांत भागवतक्षेत्राचें मोठें थोरलें रूपक वापरून त्यांत पवित्र, उदात्त व ' यद् यद् विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ' अशा प्रकारचीं उपमानें उपयोजिलीं आहेत.

दासोपंत व रामदास हे दोघे एकाच वेळीं मनश्चक्षूंपुढें आणले म्हणजे त्यांची लेखनपद्धति परस्परांशीं किती मिळती-जुळती आहे हें दिसून येतें. सुबोध व चटकदार असूनहि बोजड व विद्वज्जड नसलेली, गंभीर, प्रौढ, आटोपशीर व रोखठोकपणा असलेली दासोपंतांची शैली आणि ' राजकारणा ' च्या समासांत व ' महंतलक्षण ' किंवा ' उत्तमपुरुष-निदर्शनां ' त आढळणारी रामदासांची शैली आणि गुरु-शिष्य संवाद, स्पष्टोक्ति, क्वचित् आढळणारी एखादी चमत्कृतिजनक कल्पना हे विशेष पाहून व दोघांतहि काव्यांतील भावनेचा व कल्पनेचा साधारणपणें असलेला अभाव बघून दोघांमधील साम्य नजरेस आल्याशिवाय राहात नाहीं. इतकेंच नव्हे तर दासोपंताची धाटणी रामदासांनीं उचलली असावी असेंहि वाटतें.

**संतवाणी**

' संत-वाणी ' वेगळी पडण्याचें कारण तींतील रचनेचें विशिष्ट असें त्रुटित स्वरूप. यथासमय नामदेव, जनाबाई व तुकाराम यांनीं जे भावोत्कट उद्गार काढले तत्समान रचना यापूर्वीं केवळ याच माध्यमाद्वारें केली गेली नव्हती. ' सुश्लोक वामनाचा अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ओवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंतांची ' या आर्येत आढळणारें प्रत्येक कवीचें भावव्यक्तीचें माध्यम मराठी कवितेंत आध्यात्मिकतेपासून सहज आकलन होणाऱ्या ' परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ' इ० मानव-धर्मी लौकिक आचारधर्माकडे कसें चाललें होतें तें दिसेल. संन्यासाची

बुद्धि व भक्तीची भावना असें दुहेरी स्वरूप या संतकवींच्या वाङ्मयांत आढळेल. त्यांत दैनंदिन जीवनांत सामान्य मनुष्यावर होणाऱ्या आघात प्रत्याघातांचें हृदयाचा वेध घेणारें चित्र आढळेल. साधकाच्या हृदयांत सिद्ध होईपर्यन्त काय काय घडामोडी होतात तें दिसेल. ज्ञानेश्वरादिक अतिमानुष कोटींतल्या संतांपेक्षां ही 'संतवाणी' प्रेमळपणें आळवणारे संत आमच्याप्रमाणेंच मानसिक द्वंद्वाच्या तडाख्यांत सांपडले होते हें पाहून समानधर्मत्वाचा व सहानुभवाचा कांहीं एक वेगळाच, उच्च पातळीवर नेणारा आनंद होतो. या संतांनीं देवाशीं सलगी केली आहे. आई-बापाचें नातें जोडलें आहे. त्याशीं भांडणें केलीं आहेत. वेळीं त्याला शिव्या घातल्या आहेत. त्यांच्या धर्मोपदेशाचें सार एकच आहे. देवाला भक्त अत्यंत आवडते असतात, पंढरीस सर्व सुख आहे, नामच धर्माचें सार आहे, देव हृदयांत आहे, दगडांत नाहीं, शिव व विष्णु एक आहेत, विठ्ठल सर्वत्र भरला आहे, सद्‌गुरु हाच संसार-तरणोपाय आहे, लौकिक-भक्तिज्ञान क्रियाकर्मकलापांचा अभिमान व्यर्थ आहे, ज्ञानापेक्षां भक्ति बरी कारण तेथें अहंकार निर्माण होण्याची भीति नाहीं, भक्ताला कळिकाळाचें भय नसतें, अशा प्रकारचा उपदेश नामदेवांनीं केला आहे. नामदेवांप्रमाणें तुकाराम व जनाबाई यांनींहि देवाच्या शंखचक्रधारी रूपाचें आवडीनें वर्णन केलें आहे. नामदेवांनीं निवृत्तिनाथादिक भावंडें अनाथ झाल्यावर झालेला आकान्त वर्णिला आहे. पांडुरंग–भक्तीचा दृढ निश्चय केला आहे. ईश्वराला 'कां छळतोस?' म्हणून जाब विचारला आहे. आणि 'माझी कींव तरी कर नाहीं तर जीव तरी घे' असें निर्वाणीचें बोलणें केलें आहे. उलट प्रेमभरानें आपली म्हणजे भक्ताची श्रेष्ठता दर्शविण्यासाठीं 'तुझ्याजवळ आहे काय? जें तुजजवळ नाहीं तें नाम मजजवळ आहे' असें सांगितलें आहे. जनाबाईच्या अभंगांत कष्टाळु दासीचे स्त्रीसुलभ उद्‌गार वैशिष्ट्यानें दिसतात. तिनेंहि देवाचें गोड वर्णन केलें आहे. तिला देव काम करूं लागतो. धांवा करतांच जेवतांना

उठून येतो. नामदेवांमुळेंच परमेश्वरभक्तीचें सुख मिळाल्यानें त्यांच्याविषयीं ती कृतज्ञ आहे. तिच्या मतें देवाची एकान्त-भक्ति केल्यावर तो भक्तास सोडणें शक्य नाहीं. भक्ति हा याति, धर्म इ० पलीकडे असणारा भाव असल्याचें ती सांगते. 'जातें,' 'वेश्या' इ० रूपकांमध्यें तिचें चमत्कृतिपूर्ण वैशिष्टय दिसतें. तसेंच तें तिच्या स्त्रीहृदयांतून निघणाऱ्या तळमळीच्या बोलांतहि आढळतें.

तुकारामांच्या अभंगांत त्यांचें आत्मचरित्र, सगुण प्रेम, संत्रस्त स्थिति, छळ, नम्रता, सर्वनाशोत्तर झालेली निस्संग उदासीन वृत्ति व मिळालेला निराशेचा गांव, आत्मविश्वास, अध्यात्माधिकाराची जाणीव, कधीं कधीं त्यांना होणारा मनस्ताप, त्यांचें सच्चारित्र्य, त्यांच्या पत्नीचें त्यांच्या विषयींचें मत, कौटुंबिक जीवन व शिवाजी महाराज व रामदासांचें उल्लेख आढळतात. खरा धर्म व खोटा धर्म, खरे संत व भोंदू संत यांना त्यांनीं निवडून काढलें आहे. आम जनतेस त्यांनीं प्रापंचिक व धार्मिक उपदेश केला आहे व सांगितलें आहे कीं, व्रतवैकल्याचा केवळ कर्मठपणाचा धर्म खरा नसून नाम हेंच धर्माचें सार आहे. गृहस्थ-धर्माचें पालन कसें करावें हें सांगून साधकाला सन्मार्ग–प्रवृत्त केलें आहे. त्यांच्या या अभंगांत मेणाहून मऊ व वज्राहून कठीण असणारे विष्णुदास दिसतील. जितक्या प्रेमळ व मृदु शब्दांत ते देवाची आळवणी करतील तितक्याच कडक शब्दांत ढोंगी संतांचा ते उपहास करतील. निवृत्त असल्यानें संसाराकडे त्यांना विनोदी दृष्टीनें पाहतां येते. जन हें दुतोंडी सावज असल्यानें प्रपंच कसाहि केला तरी सुखार्थ होत नाहीं हें मोठया परिणामकारक रीतीनें त्यांनीं सांगितलें आहे.

नामदेव आणि तुकाराम यांच्या रचनेंत पुष्कळ साम्य आहे. एकाच विषयाचें दोघांनीं विवेचन केलें आहे. दोघांची वाणी उत्स्फूर्त आहे. तींत भावना व कल्पना यांचें अकृत्रिम व मनोहर मिश्रण दिसतें. व्यावहारिक रूपकें व दृष्टान्त त्यांना चटकन् सुचतात. जन्मजात व

जातिवंत असे हे कवि आहेत. पुनरुक्ति व विरोधानें एकच कल्पना मनांत ठसवण्याची काव्यमय पद्धति, लीनता, हृदयस्पर्शी कल्पना व विचार, उपमा, रूपकें व दृष्टान्त हे विशेष नामदेवांच्याकडे साहित्यदृष्टीनें पाहिलें असतां दिसतात. तुकाराम हें नामदेवांचें विकासित व 'कळसा'स पोंचलेलें रूप आहे असें म्हटलें तर तें उचितच होईल. काव्य, विचार, तत्त्वज्ञान, व्यवहाराचा अनुभव, कळकळ व तळमळ, भाषेचें 'शब्द थोडे, अर्थ फार' असें स्वरूप, या सर्व दृष्टींनीं तुकारामाची थोरवी 'तुका झालासे कळस' या शब्दांत सार्थ झाली आहे.

या आमच्या संतकवींनीं वेदान्ताचें तत्त्वज्ञान जनसामान्यापुढें विशद करून मोक्षमार्गाची वाट दाखविली त्याहिपेक्षां त्याच्यापुढें त्यांनीं जो नैतिक आदर्श घालून दिला त्याचें महत्त्व आपणांस अधिक वाटतें. 'ना विष्णुः पृथिवीपतिः' म्हणून त्यांनीं राजकारणाकडे (रामदास अपवाद) लक्ष दिलें नसेल; पण लोकांचें बाह्यतः दरिद्री जीवन आपल्या तत्त्वज्ञानानें त्यांनीं सुसह्य केलें एवढेंच नव्हे तर लोकांचें आंतरिक जीवन आनंदमय व समृद्ध केलें. ही क्रान्ति नसली तरी सुधारणा व लोकजागृति तर खासच होती. त्यांच्यामुळें लोकांत जीवननिष्ठा उत्पन्न झाली. ते दुःखास हंसत तोंड देण्यास तयार झाले. त्यांची सुप्त शक्ति जागृत झाली. त्यांच्या जीवनांत त्यांना क्षमा, कर्तव्य, भूतदया, परोपकार इ० नवीं मूल्यें मिळालीं. मोठेंपण प्रतिष्ठेवर अवलंबून नसून चारित्र्यावर असतें याची मनोमन जाणीव झाली.

**आख्यानक काव्य**

वामनपंडितांच्या काळीं संतकाव्याचें युग संपून पंतकाव्याचें युग सुरू झालें. अध्यात्मविवेचनाऐवजीं भगवद्गुणगान होऊं लागलें. लोकाभिरुचीच्या दृष्टीनें त्याला कथात्मक स्वरूप येणें आधिक इष्ट होतें तें आलें. रामायणें व महाभारतें तयार होऊं लागलीं. त्यांतील आख्यानोपाख्यानांवर रचना होऊं लागली. कविमंडळी व्युत्पन्न असल्यानें

संस्कृतांतील महाकाव्याचा थाट उतरविण्याचा प्रयत्न सुरू झाला. मग त्यांत शृंगारवीरादि लोकाभिमत रसांनीं आर्द्रता आली. ओव्या, अभंग हीं साधीं वृत्तें जाऊन, सुसंस्कृतांना आवडणारी संस्कृतांतील वृत्तरचना, श्रुतिमनोहर अनुप्रास, यमकें यांनीं ठाण मांडलें; भावनेची ऊब जाऊन कल्पनाविलासाचें चांदणें पडलें. आणि म्हणून तें 'पंडितकवींचें युग' झालें. मराठी काव्यांत जे निरनिराळे साहित्यप्रकार येथून दिसूं लागतात, ते नाथांनीं रूढ केले आहेत. किंबहुना तेच त्यांचे जनक आहेत. नाथांनीं 'रुक्मिणीस्वयंवर' लिहून महाकाव्याच्या थाटाच्या रचनेला चालना दिली, त्यांनीं लहान चरित्रें लिहिलीं, रामायण व भागवत यांवर रचना केली, रूपकें पूर्वी लिहिलीं जात त्यांना नवी चमत्कृति आणली, अनेक रसांचा परिपाक रसिकांपुढें मांडला, पदें लिहिलीं. एवंच, उत्तरकालीं आलेले सर्व साहित्यप्रकार नाथांनीं हाताळलेले आहेत. त्यांच्यापासून स्फूर्ति घेऊन इतरांनीं आपली रचना अधिकाधिक कलाकुसरीनें सजवली. कथाकाव्याच्या नद्या ज्या नंतर वाहूं लागल्या त्यांची गंगोत्री नाथांचें 'रुक्मिणीस्वयंवर'च आहे. त्यांत त्यांचा संस्कृत साहित्याचा व्यासंग, रासिकता, अध्यात्मरूपक ग्रंथभर पसरवण्याचें कौशल्य, अलंकारांनीं नटलेली वाणी, मनोहर शब्दसंहति, समाजदर्शन इ० विशेष दिसून, अध्यात्मिक काव्य व कला यांचा आदर्शच जणूं काय पुढील कवींसाठीं त्यांनीं निर्मून ठेवला आहे असें वाटतें. 'रुक्मीच्या भाषणां'त कृष्णाचें निर्गुणस्वरूपवर्णन व्याजनिंदा करून, पौराणिक दाखले देऊन केलें आहे. रुक्मीचें स्वभाववर्णनहि यांत साधलें आहे. अभिधामूल व्यंजना, व्याजनिंदा इ० साधनांनीं निर्मिलेल्या आध्यात्मिक अर्थाचा रसिक चमत्कृतिपूर्ण आनंदास्वाद घेतो. 'रुक्मिणीवर्णनां'त समाजजीवनाचा एक अंश म्हणजे त्या काळचे दागिने कोणकोणते होते याचें वर्णन आलें आहे. सुंदरीवर्णन असून संस्कृतचा चटोरपणा नाहीं. येथें सात्त्विक भक्ति व अध्यात्म भरलें आहे. सर्वत्र कृष्णार्पण-बुद्धि आहे. नव्या नव्या कल्पना,

अलंकारांची जडणघडण, कल्पनेचा दिलखुलास विलास येथें वाचकानें मनमुराद अनुभवावा.

रुक्मिणी व सीता यांच्या स्वयंवरांविषयींचें या पंडितयुगांत स्वतंत्र स्वयंवर-वाङ्मयच निर्माण झालें आहे. नाथांच्या अनुकरणानें इतर स्वयंवरें वर्णिलीं गेलीं. याशिवाय रामायण, भारत, भागवत व पुराणें इत्यादिकांतील मानवी हृदयाचा ठाव घेणारीं निरनिराळीं आख्यानें अनेक कवींनीं पुनःपुनः वर्णिलीं आहेत. 'दुष्यंतशाकुंतलोपाख्यान,' नलोपाख्यान, 'ध्रुवाख्यान,' 'चिलयाख्यान,' 'शिवधनुर्भङ्ग' इ० आख्यानें पाहून वाचकांस या आख्यानांतील कथानकाचें वैविध्य, मानवी मनांत मूलभूत भावनांच्या जागृतीनें उत्पन्न होणारे शृंगार, करुण, अद्भुत, भक्ति इ० रसांचे प्रवाह, कोणाची रंजकतेची, कोणाची ज्ञानभक्तीची, कोणाची कलासक्तीची अशी भिन्नभिन्न प्रकारची दृष्टि, मुक्तेश्वराचा यथास्थल स्वैर व रसार्द्र कथासंकोच व विस्तार तर मोरोपंताची संक्षिप्तता, सघनता व प्रमाणबद्धता; सोपी रसाळ, प्रौढ, अलंकृत, कृत्रिम अशी अनेकविध लेखनशैली इ० अनेक अंगांचा परिचय या पंडित-काव्यांत होईल, आणि यावरून हें सर्व कथात्मक साहित्य कंठाळी व साचेबंद कवित्व नाहीं अशी खात्री होईल. तोच तो पौराणिक कथाभाग असूनहि 'कौशल्य मोठें रचनेंत आहे' हें या कवींनीं दाखवून दिलें आहे.

एकनाथांच्या वेळीं संस्कृत भाषेचें व कर्मकांडाचें पुन्हा प्रस्थ माजलें होतें. मराठी भाषेची उपेक्षा होत होती. ज्ञानेश्वरानंतर तिचा उद्धार करण्याचें कार्य एकनाथांनीं केलें व मराठी या लोकभाषेचा आवेशानें पुरस्कार केला. वामनपंडितासारख्या गाढया पंडितांनीं व रघुनाथपंडित-सामराजांसारख्या व्युत्पन्न कवींनीं ही एकनाथांची परंपराच पुढें चालविली. संस्कृत-वाङ्मय-भांडाराचा भरपूर उपयोग करून त्यांनीं मराठी काव्यकलेला निराळेंच सौंदर्य व ऐश्वर्य प्राप्त करून दिलें.

दत्तसंप्रदाय व वारकरी संप्रदाय यांचा मेळ नाथांच्या आचार-विचारांत

घातला गेला होता. दत्तसंप्रदायांतील वर्णवर्चस्वाचें पुनरुज्जीवन करण्याच्या व कर्मकांडाचें स्तोम माजविण्याच्या प्रवृत्तीला त्यांनीं आळा घातला व सगुण भक्तीचा पुन्हा जोरानें पुरस्कार करून, वारकरी संप्रदायाच्या पुनर्घटनेचें कार्य केलें. संग्राहकता व समन्वय हे त्यांच्या कार्याचे विशेष होते. या विशेषांचे परिणाम त्यांच्या नंतरच्या काव्यावर झालेले दिसतात.

एकनाथांचा नातू मुक्तेश्वर यानें आपल्या काव्याची स्फूर्ति नाथांच्या पासूनच घेतली असावी. कलाविलासांत रममाण होऊन जाण्याच्या त्याच्या वृत्तीमुळें व असामान्य प्रतिभेमुळें मुक्तेश्वराचें सारेंच काव्य लोकोत्तर झालें आहे मुक्तेश्वराच्या काव्याच्या विलक्षण मोहिनीचें, त्याच्या निसर्गमनोहरत्वाचें, त्याची दिव्य ओजस्विता व सृष्टिसौंदर्य–वर्णनाची अनुपम शोभा यांचें वर्णन अनेकांनी केलें आहे. या गोष्टी त्याच्या असामान्य प्रतिभेच्या व अलौकिक काव्यशक्तीच्या द्योतक आहेत. त्यांचें श्रेय त्याला स्वतःलाच द्यायला हवें हें निश्चित. तरी देखील त्याच्या काव्याचे कांहीं विशेष एकनाथांच्याकडूनच त्यानें घेतले असावेत असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं. मराठी भाषा व महाराष्ट्र देश यांविषयींचे त्याचे अभिमानपूर्ण उद्गार, त्याच्या वाङ्मयांत व्यक्त होणारा उल्हास, उत्साह व समाजस्थितिनिदर्शक अशीं त्याचीं वर्णनें यांची मूळ देणगी त्याला एकनाथांकडूनच मिळाली असली पाहिजे. मुक्तेश्वर हा एक उत्कृष्ट नीतिशिक्षक आहे असें पांगारकर म्हणतात व त्याच्या 'शुकरंभासंवादा'चा या संदर्भात उल्लेख करतातः "शुकरंभा-संवाद" हें प्रकरण सुंदर आहे, त्यांत शृंगार आहे, जुगुप्सा म्हणजे विषय–विडंबन ऊर्फ वैराग्य आहे, शुद्ध परमार्थहि आहे. पण शुकाच्या उत्तरानें तो शृंगारभाव मोडून वैराग्याचाच बोध होतो. अशी या प्रकरणाची मांड झाली आहे. सुशील सासूच्या नजरेखालीं नांदणाऱ्या कुलवंत सुनेच्या शृंगारासारखा या प्रकरणांतील श्रृंगार आहे. म्हणजे प्रकरण वाचतांना शृंगार–रसाचा उठाव होतो, पण तो लगेच वैराग्याच्या उठावणींत लय

घावतो. " ही नीति-शिक्षणाची धाटणी त्यानें एकनाथांपासून उचलली आहे असें म्हणणें मुळींच चूक होणार नाहीं.

मुक्तेश्वराच्या 'नलोपाख्यानांत' त्याचें वातावरण-निर्मितीचें कौशल्य, समकालीन पापपुण्याच्या कल्पना, पतिपत्नींची एकमेकांवांचून असहायता, कौटुम्बिक दुःखांच्या कडेलोटाचें कारुण्यपूर्ण वर्णन, प्राचीन आचार-विचार, पतिपत्नीप्रेमाची दिव्यता व उदात्तता, किंबहुना एतद्विषयक तत्कालीन आदर्श दिसून येतो. त्याच्या 'दुष्यंतशकुंतलोपाख्यानांत' चटकदार मुक्तेश्वरी कथनशैली, वनवर्णनांत आढळणारें निसर्ग-सौंदर्य, आदर्शराजा ( व राज्य ) याविषयींची कल्पना व स्त्रीपुरुषांचीं शब्दचित्रें रेखाटणारी प्रतिभा, यांचा आढळ होतो.

वामन-पंडितांनीं एकनाथांची सगुण भक्तीची परंपरा पुढें चालविली. त्यांच्या पावलावर पाऊल टाकून 'यथार्थदीपिके'सारखी टीका, निगम-सारासारखीं अध्यात्मपर प्रकरणें व भागवत व रामायण यांतील प्रकरणां-वर रसाळ अशीं स्फुट काव्यें त्यांनीं रचलीं. त्यांच्या मराठी काव्याला पांडित्याचें अधिष्ठान होतें. तरी त्यांचीहि वाणी एकनाथांप्रमाणें अस्सल मराठी वाटते, गीर्वाण वाणीची छाया वाटत नाहीं. वामन-पंडित, प्राधान्यानें व आशयाच्या दृष्टीनें पाहतां, ज्ञानी भक्त व पंडितच आहेत. 'वनसुधें'त पांडित्याइतकेंच लालित्यहि आहे. वेदान्ती कल्पना व पंचमहाकाव्यांतील अलंकृत शैली, यमकासक्ति, वृत्तवैविध्य, उपदेशजडता हे विशेष असूनहि संत-कवितेपेक्षां वेगळेंपण व वैदग्ध्य असल्यानें त्यांचें काव्य लोकप्रिय झालें. अशा कवितांतून वनलीला निमित्तमात्र असून पंडितांचें ज्ञानभक्तीचें प्रवचनच महत्त्वाचें आहे.

एकनाथांनीं संस्कृत व मराठीच्या समन्वयाचें जें कार्य केलें, त्याचा परिपाक आपल्याला रघुनाथपंडित, आनंदतनय व सामराज यांच्या काव्यांत प्रामुख्यानें दिसून येतो. सामराजानें आपलें 'रुक्मिणीहरण' थेट महाकाव्याच्या धर्तीवरच रचलेलें आहे. त्याचे पंचमहाकाव्याप्रमाणें

सर्गहि पाडले आहेत. लोकव्यवहाराचें सूक्ष्म निरीक्षण, विनोद व वर्णनें या बाबतींत एकनाथांचें अनुकरण त्यानें निश्चितच केलें आहे. त्यांच्या-प्रमाणें लौकिक जीवनाचें चित्रण करून व्यावहारिक सद्‌गुणांचा परामर्श त्यानें घेतला आहे. रघुनाथपंडिताच्या काव्यावर संस्कृत काव्याच्या अलंकारयुक्त शैलीची किती छाप आहे हें सांगायला नकोच. त्यानें केलेलें उद्यानाचें वर्णन आपल्याला संस्कृत काव्यांतील सृष्टिवर्णनाची आठवण करून देतें.

रघुनाथपंडिताच्या 'दमयन्तीस्वयंवरांत' त्याचा नैषधीयचरिताचा सूक्ष्म अभ्यास, रूपान्तरास लागणारी दोन्ही भाषांतील गति, कलासक्ति, कल्पनाविलास, भाषा व वृत्तालंकारांवरील प्रभुत्व, त्याची सौंदर्याची कृत्रिम कल्पना, मानवी व्यवहाराचें व स्वभावाचें अवलोकन हे विशेष ठळक आहेत

संवाद व वर्णनें यांची गोडी रघुनाथपंडित व सामराज यांच्यांत विशेषत्वानें चाखावयास मिळते. रुक्मिणीस केलेल्या उपदेशांत तिची माता जो उपदेश करते तो जरी कायम ठशाचा असला तरी त्यांत कळकळ, जिव्हाळा, अनुभवाचा तपशील, ईश्वरी संपर्कानें येणारी दैवी अद्‌भुतता, तात्त्विकतेचा हलका स्पर्श आणि स्थल, काल इत्यादिगत वास्तविकताहि आहे. त्यांतील लगीनघाईचें वर्णन हृद्य असून कवीचें कथाप्रसंग, वर्णनें इत्यादींस गोडी आणण्याचें कसब आणि विविधवृत्तात्मक रचनेची सहजता व सफाई हे विशेष कौतुकास्पद आहेत.

श्रीधरांनी आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या वरील व इतराहि कवींच्या ग्रंथांचें चांगलें अध्ययन केलें असावें. मुकुंदराज—ज्ञानदेवांचा ते उल्लेख करतात. त्यांच्या कांहीं ग्रंथरचनेवर दासबोधाची छाप आहे. तुकारामाच्या अभंगांचा अनुवाद त्यांनीं अनेक स्थलीं केलेला आढळतो. त्यांच्या 'पांडव-प्रताप' या ग्रंथाचा कांहीं भाग तर मुक्तेश्वराच्या महाभारताच्या पर्वांचा संक्षेप करून तयार केलेला आहे. अत्यंत श्रेष्ठ दर्जाची काव्यशक्ति त्यांच्यांत वसत होती. कथेचा संक्षेप करून, रसहानि न होतां प्रसादयुक्त व प्रौढ

भाषासरणी वापरून ती सांगण्याचें त्यांचें कौशल्य अप्रतिम आहे. त्यांच्या काव्यांतहि दृष्टान्त, उपमा, रूपकें यांची रेलचेल आहे. समाजस्थितिनिदर्शक विस्तृत वर्णनें त्यांच्या ग्रंथांत आढळून येतात व त्यामुळें तत्कालीन लोक-स्थितीवर चांगला प्रकाश पडतो. शिवलीला, रामलीला व कृष्णलीला यांचें सारख्याच तन्मयतेनें वर्णन करून श्रीधरांनीं 'ते एक असती दोघेजण। शिव–विष्णु नामेंचि भिन्न । अभेद अनाम निर्गुण । तेथिंचे कोंब असती हे ॥ असा संदेश दिला. 'पांडवप्रतापा'च्या द्वारें त्यांनीं 'न सोडावी आंगवण, पुरुषार्थ सांडूं नये' अशी शिकवण समाजाला दिली. श्रीधर, मराठ्यांच्या उत्कर्ष-कालांत म्हणजे छत्रपती शाहूच्या कालांत, आपली ग्रंथ-रचना करीत होते. त्यामुळें त्यांचेंहि वाङ्मय उत्साह, उल्हास व पुरुषार्थाची आकांक्षा यांनी परिपूर्ण आहे. श्रीधरांची विशेष कामगिरी अशी कीं, सामान्य समाजासाठीं विशेषतः स्त्रियांसाठीं त्यांनीं ग्रंथरचना केली व पुराणांतील गोष्टी माजघरांतच नव्हे तर स्वयंपाकघरापर्यंतहि नेल्या. श्रीधरांच्या काव्याचा स्थायी रस वीर आहे. त्याच्या खालोखाल करुण आणि हास्य हेहि रस त्यांनीं वापरले आहेत. त्यांच्या एकंदर वर्णनावरून किंवा त्यांनीं दिलेल्या दृष्टान्तांवरून जातिभेदाचें प्रस्थ पुन्हा वाढत होतें, अस्पृश्यता अगदीं कडकपणें समाजांत पाळली जात होती असें दिसतें.

श्रियाळ व चांगुणा यांच्या सत्त्वपरीक्षेंत श्रीधरांची प्रौढ, प्रासादिक रसाळ, गंभीर, अकृत्रिम शैली, वर्णनांतील कल्पनाशक्तीचा प्रदीर्घ प्रसर, करुणरसाचा प्रतिक्षणीं अधिकाधिक उठाव, कथा–संघर्ष निर्माण करण्याची हातोटी, अतिशयोक्ति, अद्भुत काव्यमय वर्णन, कथानकाच्या गाभ्याची पकड घेणारी व पाल्हाळ टाळणारी कथन–पद्धति, चांगुणेच्या छळाचा चिलयाच्या प्राप्तींत होणारा काव्यन्यायात्मक गोड परिणाम, पुत्रमाहात्म्य व रूढ समजुती हे लक्षणीय विशेष आहेत. ज्याप्रमाणें या सत्त्वपरीक्षा-वर्णनांत श्रियाळ व चांगुणा यांच्या धीरोदात्त व सत्त्वशील वृत्तीचें व चांगुणेच्या मातृहृदयाचें दर्शन घडतें. त्याचप्रमाणें 'धनुर्भंगांत'हि सीतेच्या मनांतील खळबळीचें व मुग्धा वृत्तीचें दर्शन घडून श्रीधरांच्या कल्पना-

शक्तीचा मधुर विलासहि पाहावयास मिळतो. पारदर्शक जलाशयांत लहरी-मागून लहरी निर्माण होतांना पाहून आल्हाद व्हावा तसा यांतील उपमोत्प्रेक्षा व दृष्टान्तमाला पाहून आनंद होतो. भाविक, सांसारिक हृदयास हवें असणारें सर्व कांहीं मिळून त्याची सात्त्विक तृप्ति होते. जन-चर्चेच्या रूपानें रामाविषयीं सहानुभूति निर्माण करण्याची पद्धति व धनुर्भङ्गानें झालेल्या परिणामाच्या वर्णनांतील हृद्य अतिशयोक्ति यांचा उपयोग श्रीधरांच्या काव्याविषयीं कोणाच्याहि मनांत आदर निर्माण करील.

अमृतरायाची कविताहि अपूर्व प्रतिभेचें व भाषाप्रभुत्वाचें उदाहरण म्हणून देतां येईल. शब्दमाधुर्य, वर्णनाचा अनुपम थाट, अनेक विषय सारख्याच कौशल्यानें हाताळण्याचें सामर्थ्य, शृंगार, वीर, हास्य, बीभत्स इत्यादि मिश्र रसांचा परिपोष करण्याची हातोटी हे अमृतरायाचे विशेष आहेत. त्यांच्या विविध विषयपर कवितेचा एकंदर रोख भक्तीचें मंडन करण्याकडे आहे. त्यांच्या वर्णनशैलीचा व विषयप्रतिपादनाच्या धाटणीचा त्यांच्यानंतरच्या रामजोशांसारख्या शाहिरांवर व कीर्तनकारांवर प्रभाव पडला आहे. अमृतरायांची कविता जशी कीर्तनकारांच्या तशी श्रोत्यांच्याहि उच्च पातळीची निदर्शक आहे. ध्रुवचरित्रांतच काय, सर्वच आख्यानांत अमृतरायाच्या अमृतस्राविणी वाणीचा चापल्ययुक्त विभ्रम असूनहि कथागति मंद आहे. प्रासानुप्रासांची खेंचाखेंच, अपूर्व कल्पना-चमत्कृति, ठायींच उभी राहून विश्वाचा गरका घेणारी प्रतिभा, प्रचंड संस्कृत–प्राकृत-भाषा-प्रभुत्व, प्रदीर्घ सामासिक रचना, कटावादि छंदांचा छंद, शब्दसंपत्तीचें अपार भांडार इत्यादींचा पसारा पाहून आपली मति गुंग होते.

मोरोपंत हा पंडित कवींच्या उज्ज्वल मालिकेंतील शेवटचा तेजस्वी माणि होय. संस्कृत काव्यरचनेची छाया मोरोपंतांच्या काव्यावर पडली आहे हें स्पष्टच आहे. कमावलेली भाषा, प्रसंग व पात्रें यांना अनुरूप शब्द-योजना, नाटयात्मक प्रसंगजन्य व आकर्षकता, हे मोरोपंतांच्या काव्याचे

विशेष आहेत. पांडित्य व कवित्व यांचा गोड संगम म्हणजेच मोरोपंती काव्य. मोरोपंतांच्या काव्यांत कांहीं स्थळीं क्लिष्टत्व आहे. यमकांचा क्वचित् हास्यास्पद होणारा सोसहि आहे. शब्दांची कसरत आहे, चमत्कृति साधण्याचा हव्यासहि आहे हें खरें, परंतु सीतागीतासारखीं प्रसादपूर्ण, सरळ व भावरम्य रचनाहि ते करूं शकतात. आपल्या समासबहुल रचनेंतूनहि रुक्मिणीचें पात्र बरोबर रंगवितात, व तिच्या उत्कंठेचा व उत्सुकतेचा प्रत्यय वाचकाला आणून देतात 'सीतागीत' व 'रुक्मिणी-विवाह–कथा' यासारख्या काव्यांनीच मोरोपंतास बारामतीकरांकडे वृत्ति मिळाली व महाराष्ट्रास मोरोपंतांचा लाभ झाला व तलवार किंवा पळी-पंचपात्री हातीं राहण्याऐवजीं मोरोपंतांच्या हातीं लेखणीनें वास केला. सीतेनें किंवा रुक्मिणीनें आपली कथा सांगणें या विचारांतच अभिनव कल्पना दिसते. मग स्त्रीसुलभ भाषा, आत्मीयता, सरळ, सोपी रसाळ रचना, हृदयवेध घेणारें व त्याचें स्पंदनहि क्षणैक थांबवणारें वर्णन, ओवी व आर्या यांचें वृत्तवैशिष्ट्य, रसिकांस सोत्कंठ ठेवून कथा सांगण्याची पद्धति यांची जोड असल्यावर रसिकांचा आनंद काय सांगावा !

ख्रिस्तपुराणांतील उतारा त्यांतील धार्मिक आशयामुळें अगदींच वेगळा पडतो. परंतु भाषादृष्टीनें पाहिलें असतां जशी एकनाथांच्या लेखनावर ज्ञानेश्वरीची छाप दिसते, तशीच फादर स्टीफन्सच्या या पुराणावरहि दिसते. उताऱ्यांतील प्रास्ताविक भाग ख्रिस्ती धर्माच्या ख्रिस्त व देवविषयक ठळक कल्पनांनीं व्यापला असून अखेर मराठीची महनीयता वर्णिली आहे. ती वाचून मानी मराठ्याचा अभिमान उचंबळून येईल. मराठींतील ख्रिस्ती वाङ्मय किती जुनें आहे हेंहि यावरून कळेल.

**स्फुट काव्य**

आरत्या, रूपकें व पदें हा मराठी साहित्याचा एक साधारणपणें न पाहण्यांत येणारा असा भाग आहे. एतद्विषयक वाङ्मय अत्यंत रसाळ व भावोत्कट असून रूपकांत कवींचें बुद्धिचातुर्य व समाजावलोकन

इष्टोत्पत्तीस येतें. प्रस्तुत खंडांत आध्यात्मिक अनुभवाचा आनंद 'आरतींत' दिसला तर ' कानोबा ! ' पांखरूं ' ' बोबडा ' यांतील चमत्कृतिजनक रूपकांनीं बुद्धिजन्य आनंद व बोध प्राप्त होईल. ' भूपाळी ' हें अशाच प्रकारचें रूपक असून त्यांतील भाषेचा व कल्पनेचा विलास मनोहर आहे. रामदासांचीं करुणाष्टकें निराळेंच भावसौंदर्य दर्शवितात. त्यांतील उत्कटता व कारुण्य यांनीं आपलें मन द्रवून जातें. आर्तता हा त्यांच्या अनेक स्फुट-काव्यांचा विशेष आहे. त्यांच्या 'श्रीवनभुवनी ' सारख्या प्रकरणांतहि उच्च दर्जाचें काव्य आहे. अलंकार बेताचे असले तरी उपमा, दृष्टान्त आणि रूपक यांचा योग्य उपयोग रामदास करतात. शुद्धतेकडे दुर्लक्ष, अनुप्रासाचा बेताल हव्यास, वर्णनांतील पुनरुक्ति अथवा अतिरंजितत्वाची आवड हे त्यांचे कांहीं सहज दिसून येणारे दोष आहेत. वामनानें ' मनास बोध ', ' मनाचे श्लोक ' पुढें ठेवून केलेला आहे हें अगदीं स्वच्छ आहे. तीच सरळ, सोपी भाषा, तेंच आत्म-परीक्षण. ' उमा-रमा-संवाद ' व ' संशयरत्नमाला ' हीं उत्तर काळांतील काव्यें मराठींत केव्हां ना केव्हां त्रुटित काव्यें येणार याची जणूं पूर्व-सूचनाच आहे. त्यांत भावने-पेक्षां विचाराला प्राधान्य असून शब्द–चमत्कृतीवर व कल्पना–चमत्कृतीवर भर आहे. ' केकावलि ' एक प्रदीर्घ भाव–काव्य आहे. त्यांत दाखले, कोटया, वादकौशल असा बुद्धीचा भाग असूनहि भावमन्थरता सर्वत्र गोचर होते. स्फुटकाव्य-खंडांत घेतलेल्या कांहीं पदांवरून मराठी वाङ्मयांतील पदभांडाराची कल्पना येणें शक्य नाहीं.–असें म्हणावें लागेल कीं, जें कार्य आज भावगीतानें होतें तेच भक्तियुगांत या पदांनीं केलें आहे. आधींच रसाळ रचना, त्यांत मृदु झंकार करणारी अक्षरपंक्ति; यांस संगीताची अनुकूलता असल्यावर हवा तो भाव कवीला रसिक हृदयावर उमटवण्यास काय वेळ लागणार ? तशांत अमृतरायासारखा जिव्हेवर सरस्वतीस नाचवणारा भाषाप्रभु ! शब्द, अर्थ व नाद यांचें मधुर संमेलनच त्यानें या पदांत घडवून आणलें आहे.

**सिंहावलोकन**

मराठी कविता ही निव्वळ अध्यात्मपर नसली तरी केवळ कलाविलासासाठीं ती लिहिण्यांत आलेली नाहीं. काव्य हें भगवन्नामसंकीर्तनासाठीं आहे ही भावना महानुभावांपासून मोरोपंतांपर्यंत अव्याहतपणें चालत आलेली दिसते. लोकव्यवहारांचा, या जगांतील उलाढालींचा, प्रपंचाचा, कौटुंबिक व सामाजिक संबंधांचा, ही कविता परामर्श घेत नाहीं असें नाहीं. प्रसंगीं त्यांत ती रंगते देखील. परंतु तिची एकंदर वाटचाल मोक्षाच्या दिशेनें आहे, हें विसरतां कामा नये. म्हणूनच वीर, शृंगार, रौद्र, भयानकादि अनेक रसांनीं ती नटली तरी भक्तिरसाला व शांतरसाला तींत प्रामुख्य आहे. प्रपंच मिथ्या नसला, तो नेटका करणें हेंहि मानवाचें कर्तव्य असलें, तरी परमार्थसाधन हेंच त्याचें अंतिम व अत्युच्च ध्येय आहे अशी या कवितेची दृष्टि आहे. कित्येक शतकांच्या आपल्या वैचारिक परंपरेला अनुसरूनच ती आहे. आणि अशी परंपराहि देशांत निर्माण होण्याचें कारण होतें. मोठमोठीं युद्धें झालीं, कांहीं साम्राज्यें स्थापिलीं गेलीं व कांहीं रसातळाला गेलीं, तरी भारतीय समाजाचे किंबहुना अखिल मानवसमाजाचे व्यापार व व्यवहार ज्या भौतिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर चालले होते, ती अचल व अपरिवर्तनशील अशीच राहिली होती. शेंकडों वर्षे, किंबहुना हजारों वर्षे तिच्यांत कांहींहि फरक घडून आला नव्हता. निसर्ग आजच्यासारखा मानवाच्या अंकित झाला नव्हता. उलट, मानवच त्याचा दास होता. सृष्टीच्या संपत्तीचा मानवाच्या हातीं येणारा अंश एकंदरीनें अल्प होता. तांत्रिक प्रगतीच्या दृष्टीनें तो अगदीं प्राथमिक अवस्थेंत होता. त्यामुळें ऐहिक सुखांची सामुग्रीच अल्प असणें व तिच्या वांटपांत विषमता असणें अपरिहार्य होतें. या परिस्थितीवर आधारलेली राजकीय व सामाजिक संघटनाहि अचल व अपरिवर्तनीयच असणें क्रमप्राप्त होतें. बहुसंख्यांना संसार एकंदरीनें दुःखमय आहे, "सुख पाहतां जवापाडे। दुःख पर्वताएवढें." असा अनुभव येणें साहजिकच होतें.

त्यामुळें इहलोकींचें जीवन तुच्छ मानण्याची प्रवृत्ति होऊन लोकांची नजर परलोकाकडे लागून राही. भवचक्रांतून सुटणें हेंच त्यांचें ध्येय बने.

आज यंत्रयुगानें घडवून आणलेल्या क्रांतीमुळें हें सारें पालटलें आहे. एक काळ स्थिर व अपरिवर्तनीय असलेलें जग प्रतिक्षणीं बदलत आहे. मानवाच्या हातीं आलेल्या शक्तींमुळें भोंवतालची भौतिक सृष्टि पालटत आहे. आणि तिच्या पालटाचा मानवी जीवनाच्या विविधांगांवर परिणाम होणें अपरिहार्य झालें आहे. प्रथमच्च, आतांपर्यंत स्वर्गांतच कल्पिलेलें सुखाचें व समृद्धीचें नंदनवन भूलोकीं निर्माण होण्याची शक्यता उत्पन्न झाली आहे. त्यामुळें मानवाचें मनच अधिक इहलोकप्रवण बनत आहे. एका शासन-संस्थेची उभारणी व दुसरीचा विनाश यामुळें साऱ्या भौतिक जीवनाची इतकेंच नव्हे तर नैतिक मूल्यांचीहि चौकटहि बदलावी अशी स्थिति निर्माण झाली आहे. त्यामुळें, असले बदल हे आधुनिक कवितेचें विषय बनूं शकतात. त्यांचे पडसाद तिच्यांत उमटतात. त्यांच्यामुळें तिच्या प्रवाहांत क्षोभ माजतो, कधीं कधीं तिचें वळणहि बदलतें. त्यामुळें वेगळेच आदर्श आज आमच्या साहित्यिक जीवनांत निर्माण झाले आहेत. ते अगदीं भिन्न परिस्थितींत नांदलेल्या व वाढलेल्या प्राचीन काव्याला लावणें अयोग्य व अन्याय्य ठरेल.

पण प्राचीन मराठी कविता आपल्या भोंवतालच्या जगाविषयीं किंवा जीविताविषयीं संपूर्णतया उदासीन आहे असें आपणांस वाटतें, तें मात्र तितकेसें खरें नाहीं. नाथांच्या रुक्मिणी-स्वयंवरांत किंवा भावार्थ–रामायणांत तत्कालीन परिस्थितीचें प्रतिबिंब अप्रत्यक्षपणें कां होईना निश्चितच उमटतें. सामराज–रघुनाथपंडितांसारखे कवि शहाजीसारख्या बलाढ्य व ऐश्वर्य-शाली पुरुषांच्या वैभवाचें व विलासीपणाचें वर्णन आपल्या राजदरबाराच्या वर्णनांत किंवा शृंगारिक प्रसंगाच्या आख्यानांत करतात. कथेंतील ते ते प्रसंग वर्णितांना आपल्या भोंवतालच्या समाजस्थितीचे, चालीरीतींचें व लोकव्यवहारांचें वर्णन ते करीत असतात. आनंदतनय, अमृतरायासारखे कवि सीतास्वयंवराला काबूल-कंदाहार रुमशामचेहि भूप आणवितात.

बऱ्यावाईटांच्या कल्पनांचें किंवा सामाजिक आदर्शांचेंहि चित्रण काव्यांतून केलें जातें. सामराजाच्या 'रुक्मिणीहरणां'तील यादवकुळींच्या राण्यादेखील ' रांधून वाढून महाशहाण्या ' असतात. मुक्तेश्वर कुलकामिनीचें वर्तन कसें असावें हें सांगतांना आपल्याच काळच्या स्त्रीजीवनविषयक कल्पनांचें वर्णन करतो. ऐहिक उत्कर्षाच्या काळांत काव्यांतहि जोम, उल्हास व उत्साह यांचें वातावरण नांदूं लागतें. अवनतीच्या काळांत निराशा, उद्विग्नता व आर्तता यांचे सूर त्यांत उमटतात. मानवी मनाच्या भोंवतालच्या जगाला उद्देशून होणाऱ्या साऱ्या प्रतिक्रिया त्यांत व्यक्त होतात. दारिद्र्या-मुळें होत असलेल्या कुचंबणेचा उबग, अन्यायाबद्दल चीड, जे दुःखी आहेत, दलित आहेत त्यांविषयीं आर्त सहानुभूति, सौंदर्याविषयीं प्रीति, निरागस शैशवाविषयीं कौतुक, उच्च ध्येयाविषयीं किंवा ध्येयपुरुषांविषयीं आदर या साऱ्या भावनांचा आविष्कार त्यांत झालेला आढळून येईल. एवढेंच कीं, या काव्याचें स्वरूप बहुशः प्राकरणिक, पौराणिक, वीर पुरुषांच्या किंवा संतांच्या जीवनाचें वर्णन करणारें असल्यामुळें, भाव-काव्यांत जितकें प्रत्यक्षपणें कविमन प्रगट होतें तितकें यांत होऊं शकत नाहीं. त्याच्या आविष्कारावर काव्यप्रकाराचें एक आवरण येतें. पण शोधक आणि सहानुभूतिपूर्ण दृष्टीनें जो प्राचीन काव्याचें परिशीलन करील त्याला मानवी हृदयाचें स्पंदन त्यांतहि आजच्या इतक्याच उत्कटपणें होत आहे, माणसाच्या मनाच्या निःश्वासांचे पडसाद त्यांत उमटत आहेत असें कळून आल्याखेरीज राहणार नाहीं.

प्राचीन मराठी वाङ्मयाचें अवलोकन केलें असतां, मराठी साहित्याची अमोल दौलत अजून किती तरी प्रकाशित व्हायची राहिली आहे, असा विचार मनांत आल्याशिवाय राहात नाहीं. तें वाङ्मय प्रकाशित व्हावें, महाराष्ट्रीय वाचकांना त्याचा छंद लागावा आणि प्राचीन साहित्याच्या या प्रचंड भांडारानें त्यांना ब्रह्मानंद स्वादसहोदर आनंदाचें निधान स्वाधीन करून द्यावें यापेक्षां वेगळी अशी आमची काय इच्छा असणार ?

# अनुक्रमणिका

# १ : महानुभावीय काव्य

## १. यमुनावर्णन

कालिंदीजळ निर्मल : श्रीकृष्णकांती श्यामल
प्रतिबिंबैली भणऔनि सुनील : होऔनि ठेलीं १

भक्तिभावें ऊ्ळगितां : केवि वर्णावी सायुज्यता
जेआंचिआ सान्निधी सरूपता : जडा आली २

देखौनि श्रीचक्रपाणी : कैसी संभ्रमीतु जाली तरंगिणी
कीं आनंदैली अंतःकरणीं : ते रोमांचु दाटिले ३

कीं आलिंगावेआं श्रीकृष्णराजा : तिआं बहुतीं केलिआं भुजा
तैसे तरंगु पाढियासले मज : कालिंदिअेचें ४

मग आनंदसागरीं मीनिली : तैसी निश्चलु जाली
कीं देहभाऊ विसरैली : श्रीकृष्णवेधें ५

कीं जन्मैली देवांचा चरणीं : ते उतावेळु फुण असे मणी
भणऔनि भेटों आली मंदाकिणी : कालिंदी नोहे ६

कीं श्रीकृष्णाचिआं संगतीं : आमुची फिटैलु अधोगति
भणऔनि भेटों आली भोगावती : पाताळौनि ७

आधींची पढिजे पुराणीं : वरि स्पर्शैली देवाचां चरणीं
तेथौनि तिर्थी शिरोमणी : ऐसे बिरुद जाळें ८

सोमकांती बांधिले घाट : जेथ हीरे नग वाळवंट
मुक्तागर्भ सूक्ति संपुट : दीसताती ९

श्रीकृष्णकांतीची फांकितुसे किळ : तैसें ठाईं ठाईं इंद्रनीळ
रत्नकूटांचीं के वाळु मौवाळ : ऊदकाजवळीं १०

कीं तें रत्नाकराचें अर्धांग : भणऔने आंगाथिलें ठीकलग
तैसें एकेवेळें सप्तांग : लेणें लेइलीं ११

कीं कैवाल्यनाथां श्रीचक्रपाणी : नवां रत्नांची ओवाळनी
करी कमलांची उचलनी : तैसी दीसतुसे. १२

उभअे कुळीं द्विजवृन्दें : निजकर्मरंते निःशब्दें
दृष्टीपूतें ठेविती पदें : जैसे मुनीराजु १३

एकांगुष्ट तपिअे बक : नासाग्रीं दृष्टी घालिती ढोंक
यज्ञदीक्षित तैसे चक्रवाक : प्रियातें सांडिती ना १४

प्रकृती–पुरुष–विवेकातें : जैसे परमहंस जाणते
तैसे क्षीरानीरा निवाड्र करीते : निर्मल राजहंस १५

जेआचेनि जडें वेधिती : लता तरु रोमांचु दाटेती
पशु चरों विसरेंती : तो ध्वनी आईकौनेआं १६

जेआचेनी दृष्टिपातें : पांखिरुवें जाली आनंदभरितें
हें कांई वाणावें श्रीकृष्णातें : जेआंचां नामीचि वेधु १७

मेघीं झाकोळलेआं रवीचा प्रकाशु : न धरे पद्मिनीचा विकाशु
तैसा गोपवेखें गुप्त परेशु : परि वेधु संचरताती १८

हातिरुवें सिंहेसीं खेळतु : मृगव्याघ्रासीं कुरवाळें करितु
मोरांचा पाखवा विश्रामतु : फणिकु देखा १९

मूखकु मार्जारांचिअें पालखती : अश्वमाहिखां परमप्रीति
जमुनेचा पानिअेडा दीसती : निर्वैरें भूतें २०

धन्य तेथिचीं जलचरें : जिअें अवलोकिलीं ईश्वरें
वरौती एऔनि आनंदभरें : पाळांति श्रीमूर्तितें २१

श्रीकृष्णांचें रूप सांवळें : जळांभीतरीं प्रातिबिंबैलें
तें उतवेळुपणें आळंगिलें : सकळ मत्स्यांदिकीं २२

ब्रह्मादीकु मुलवीलें विज्ञानें : देवांगणा बरवेपणें
चरांचरां वेधु जिअेचेनि गुणें : ते शक्ति वाणौं नेणें २३

ब्रह्मचारी गृहस्छ : वानप्रस्छ यती सुस्नात
नित्यक नैमित्यकें कर्मे करीत : आश्रमु भेदें २४

एक अघमर्षणीं रीगत : एक मृत्तिकास्नानें करीत
एक कर्मेचि तारकु मानित : नेणती परब्रह्मातें २५

घार्टी जपिआंचिआं कोडीं : कूर्मासनीं बैसले त्रिदंडी
नमस्कारीं व्याकुळ एकदंडीं : जवळांचि देऊ देखती ना २६

अधर्माचेनि अभिमानें : कर्मयागाचेनि यजनें
ईश्वरतत्त्वांचें जाणणें : तें अरुतेंचि ठेलें २७

नसतां प्रकाश-संपत्ती : अंधकारातें दवडौं पांती
ईश्वरकृपेवीणु जाणौं मणती : परावस्तूतें २८

जैसा जवळां असतां परमात्मा : ठाउवा न होअे विषयारामां
तैसा श्रीकृष्णमूर्त परब्रह्मा : न देखती कर्मासक्तें २९

हा अपराधु नाहीं जना : प्रवृती निवृतीची कारणां :
साउमाली आइकां कथानुसंधाना : भणे मुनी केशवराजु ३०

## २. अस्तमान समय

तंव उचित-चंद्रिका म्हणे : " सूर्या अस्ताचळीं होत उपेणें
जैसें तेजाचें साटवतें वोपणें : मढीं पवळेयाचां १

कीं कुंकुमवनीं सरागू : झेपावत शृंघार–विहिंगू
कीं त्रिनेत्रें तातला अनंगू : रिगत पाश्चिम-समुद्रीं २

कीं ठेविला प्रकाशाचा मुडा : पाताळीं पेणें होत गरुडा
कीं श्रीकृष्णु आर्घिला पाश्चिमिली कडां : कमळ कांतीचेनि ३

कीं संध्या-सरोवरीं सारासिचा गिवसू : करूं आला सोनेयाचा सारसू
तैसा सूर्या होताय प्रवेशु : अस्ताचेळीं ४

तेथ फुटले इंद्रनिळाचे बोरे : तैसा माथा उधविला आंधारें
कीं डोंगर उन्मळीले गरुडोद्गारें : पाचिचे हे ५

कीं दाटत कस्तुरीयेचे मेघ माजिरे : कीं पिल्लीं पसारिलीं गगनसागौरें
कीं ब्रह्म-गोकुळ मरला पुरे : कृष्ण-गंगेचानि ६

कीं वांबळैली तमाळाची वाडी : कीं महामोहाची धुपाडी
कीं चरत द्यावा-पृथ्वीचेयां पाडीं : ठौळ कांति-लोहाचें ७

ना तरी कमळौनि असासितें : कंदर्पाचोनि दळवयें वसंतें
भंवरांचे घाळणें घातलें अवाचितें : विराहेणींवरी ८

कीं भूगोळकाचां देउळीं : रती अनंगें पूजिली गगन-काळी
ते पुजा दिसतसे निळी : निळोत्पळांची ९

संकोचलीं कमळें : पाक्षिये टाकिती आवेसाळें
चक्रवाकें होति व्याकुळें : वीयोगें प्रियाचोनि १०

नानाविद्रा फुलांचां आमोदी : सैग उधांति राज-बिदी
तेथ दाटत शृंघारियांची मांदी : पेठेफुल-सांतेचां ११

द्विजीं सारिलीं संध्यावंदनें : शोडषोपचारीं देवता-पुजनें
अग्निहोत्रें केली उपासनें : मौनें विसर्जलीं १२

नगरीचां प्रासादीं : मंगळ तुरांचां शब्दीं
पेखनेकारांचा मांदी : आकास अवतरलें १३

शृंघारु करौनि गणिका : उगाणा घेत कामुकां
स्वैरिणीतें नेति दूतिका : खागेयासी १४

कैसी मेहळर्नी माजिरी : उजियेडातें आंधळेया करी
दिवे नेइजाति घरोघरीं : हातीं धरूनियां १५

## ३. नारदाचे निवेदन

तंव भणे उद्धवदेउँ : तुमचा नीका भक्तिभाउँ
गोसावी एतखेउँ : जाणीतिला १

आतांची भणतु होतें : सापें नारद न एती एउतें
कांइ लावकैआं केउतें : आराती चि ना २

तंव मेयां भणितिलें : नाजी अधुनां तेहीं तें सांडिलें
हळूं हळूं चि धरलें : पदस्थपणा ३

तेंवी चि तुम्ही केलें बीजें : तरी आलेंती कह्वणें काजे
तें सविशेषें विणविजे : झडकरी ४

देशकाळें निम्हां राडिकें : कांई कळीचा कामठा न पिकें
कीं बांधिलेंती आरोचकें : झाविआं विणूं ५

न होऐचि जुंझ भांडण : तऱ्ही तुम्हां नाही खाजें जेवण
कांइ पुसों रोडकेपण : जिआं हाचि लाभू ६

नाही केउता झोंट धरणीं झडाडा : तरी कांइसा वेळु फुडा
काळु जातुसे खडाडा : कळी वीणां ७

जादवांचिऐ राणिवे : कह्वणाही जुंझ नोवे
श्रीकृष्णाचेनि नांवें : तंव रागूंचि नाही ८

भणौनि तुझां आयास : पडिताति उपवास
आतां गमाल दीस : कह्वनीं परीं ९

देशी कांई वळे वर्ते : हें सांगा पां निरुते
लावाल कलहो नह्वतें : हें फुडें कीरूं १०

तुमतें एतां देखिलें : तैची माझां जीवें धुस गेलें
कांइ सांघाल उदैलें : तें जाणवें ना ११

तंव कें नारदु भणे : धुरांचा ठांई एसनें बोलनें
हें तुम्हां साजें मंत्रिपणें : एरां बोलों नऐ १२

आमुतें भणती कळिलावें : तरी आम्ही कांइसेआं बोलावें
कां निवांतूची नसावें : आपुलां ठांई १३

फुन तुमचेनि रागें : जरी असोंचि उगें
तरी आमुचें पोट फुगें : न बोलतां १४

आपुलेनि रागिटपणें : जगीं होती भांडणें
कीं मातें भणती नारदें एनें : लावकें केली १५

एनेंचि कारणें : मियां सांडिलें कैलासां जाणें
भणती शंभूसी विघडणें : एणेंचि केलें १६

एकु वेळु मी कैलासां गेलां : तंव भणती हा कळिलावा आला
टाटाउँग्नि बांधा वहिला : एऱ्हवीं जाइलु हा १७

ते ह्वळि घेऊँनि त्रिवसी : मी जाला तापसी
जपतुसे वारानशी : तिये दीऊँनी १८

एऱ्हवी चाहाडा चाहाडींची गोडी : ब्रह्मविद्यें नाही फुडी
स्वर्गू न लहाजे एकु कवडी : तें पाऊँनी १९

आनंदु होअे गोडू : फुन तो ही नावेकु रांकडू
भणौनि करौ न अे पाडूं : लावकें ऐसीं २०

याची गोडिया सांडौ न शके : एऱ्हवीं हें कांई नीकें
जें लिपिजें पातकें : पायांवीण २१

आतां सांडिलें उटेरटें : मज कोन्हांचें कांहीं न वटे
पुण्य जोडावें गोमटें : हाची लाभु २२

तनु जाली म्हातारी : जिआवे दीसु दोनिच्यारीं
तंव भणावें हरि हरि : माणेकर्णिकेसीं २३

एकु वेळु मणिकर्णिकेसीं असे जपतु : तंव मानुषें देखिलीं पळतु
उदेलें आकांतु : एके वेळे २४

अक्षयतृतीअेचां दीसीं : विश्वेश्वरापासीं
बहुतें मारिले तापसी : एनें शिशुपाळें २५

मैत्रावरुणा जवळां : भगवंत् एकु मारीणिला
ते वेळीं मी पळालां : जीवु घेऊँनी २६

आरेरे टाकौनि घोडा : भणती याचियां जटै उपडा
आतां कें जाइलु साबडा : आह्मां पासौनि २७

ते ह्वळि हातीं काष्ठदंड घेतलें : कृष्णाजिनाचें ऊन्दुण केलें
मग मिआं हीं पाचारिलें : कां पितयाची आण २८

पळतु–पळतु पाचारीं : एके हातीं नीरी धरीं
तवी चि भणें हरि हरि : जीवा भेणु २९

भणत नारायणु नारायणु : पळाला सार्ध योजनु
मग केलें संध्यावंदनु : सायंकाळीचें ३०

आपुलेचि आपणुं : काइं सांघौ धाकटपणु
एऱ्हवी तुझी आनु : भलों पळालों ३१

दैवें देह वांचलें : भणौनु तुझे चरणुं देखिले
आतां माझें विणविलें : अवधारिजें ३२
दैत्या दानवाचिआं लोथां : दाटला वसूंधरेचां माथां
तो भारु फेडावेआ जगन्नाथा : अवतरलासी तूं ३३

## ४. विरही रुक्मिणी

तंव भणे रुक्मिणी : एसिआं तुम्ही साजनी
तरी माझिया विरिणी : तियां कैसिआं १
कैसेवो तुमचें करण : जें पुटिलां एऊ पाहे मरण
जें आपुलें ढिसाळपण : सांडा ना तुम्ही २
हें काळें पाखिरू : मजसी सदा चिंती विरू
की यां तें उपच्यारू : पुसों जातसां ३
कां भीमकाची आण : हे चंद्रकिरण
मज सूती आहान : अनेग वेळां ४
एणें मळयानिळें : मज श्रीखंडाचे विख सूदलें
तें सर्वांगु जालें काळें निळें : नखां सकट ५
चांपेआंचोनि परिमळें : मज मारें घातिलें
तें मज पुढां मालतिआं सांधितिलें : सांब्रेआ आंतु ६
च्यूतांकुरांच्या थोरकांडी : प्रमदांचे हृदयपाखाण फोडी
तो विरहो वनीं अवघडी : वसंतु मारो पांताअे ७
माझा काळां केशीं : सदा वैरू भ्रमरासीं
कीं स्वभावें तेआं पाशीं : जातुसा तुम्हीं ८
ऐसें बोलु दोंनि बोलली : तंव वारेआची झुळुक आली
तैसीचि निचेष्ट पडली : वैदर्भी ते ९
तंव वदे प्रभावती : सरा वो सरां परौतीं
चैतन्य गेलें नेणों केउतीं : तें मज पाहों देआं पां १०
चांदिनेयाचिआं दुपाहारीं : वायां निनिली बाहिरीं
कैसीं सर्वांगें सुन्दरी : खिरडली हें ११

नलवी वो कर्पुरु : सर्वांगी येतुसे उप्दरुं
अधिकांचि विरहोज्वरूं : उधावतु दिसें १२

लेपु न करी वो कस्तूरिअेंचा : सवडा जातसें आंगिचा
स्पर्शु जालेआं कमळाचां : तनु करपतुसे १३

ओलिया मोतियांचें उटणें : लाविलेयां पोळली कोणें मानें
न घालिवो वारं वीजनें : कमळदळांचे १४

ऐसी कवण वो ढसाळ : जें घातिलें मकरंदजळ
कैसें पांचवनें जाळ : मुखें नीगताती १५

कोणी गे निःपरंवसा : उघाइली वसंताची दिशा
वारी वो पढतेया पुंसा : कोप कलहंसांसी १६

माधवी मंडपा आणली : हें कुडी बुद्धी केली
कैसी दिहें दिहूं उप्सावली : वैदर्भी हे १७

खुडी वो च्यूतांकुरू : हें खुपती सकडतरू
तोहि हे तोवरू : अशोक तरूंचे १८

उप्भावी वो मधुकरू : विसारी वो चकोरू
यांसी पडिलेसें वैरू : अघवेयांसी १९

## ५. ऋद्धिपुर महात्म्य

जें आर्तासि कारणें : संसार श्रमाचें विसंबणें :
तें श्रीऋद्धिपुर देखिलें तेणें : दुरौनिया : १

मोळिकारां धांडोळितां रानें : जेवि मोळिए जोडलें बावनें :
नातरि दुर्भक्षी पक्वानें : रांकु लाहे : २

दारिद्रीं आडुखुळे रिद्धी : अनाचार्यातें वरीति सिद्धी :
निःकंचना उपाधि : टाकौनि ए : ३

रोगिया अमृत पानु : लाहे तान्हेला जीवनु :
स्वामि जालेआ प्रसन्नु : जैसें सेवकां होए : ४

सासुरवासे शीणली : तिये भेटे जेवि माउली :
असो हे तैसी परी जाली : श्रीऋद्धिपुर देखिलेआ: ५

धांडोळितां तीनि लोकां : मी उपमा न देखे आणिका :
जें जालें जगदेकनायका : क्रीडास्थानु : ६

तें हें कैवल्यबीजाचें क्षेत्र : कीं निवृतांचें परत्र :
कीं परसुखाचे छत्र : मांडिलें आर्तांसि : ७

कीं धर्माची उत्तर वेंठ : कीं सिद्धीची ओळगवट :
ना तो संशृतीसि ताठ : वज्रलेप : ८

किंवा समर्थाचें कवण जाणे : उठवावेआ संसाराचें ठाणें :
पाळेगण उभिले मी भणे : देवराआंचे : ९

कीं संसार नगरी : वसिजे ही अनाचारी :
तेआ वेगळी ब्रह्मपुरी : केली ब्रह्मण्य देवें : १०

शृती स्मृतीचेनि अर्थे : स्वधर्मे अनुष्ठाते :
जेथें सदाचार नांदते : ब्रह्मवीद : ११

ते देखौनि देवनगरी : साष्टांगें नमस्करी :
जाली तापासि बोहरी : ते परिऐसां पां : १२

उदय भास्कराचेनि वासें : नुरेचि दुर्गंधितम जैसें :
नातरि आर्ती जळद वरुषें : कृषीवळी : १३

दोनि लक्षाचेनि अंतरें : जोवि ताप फीटती अमृतकरें :
तैसें केले श्रीऋद्धिपुरें : दुरौनिया : १४

.............

## २ : तात्त्विक काव्य

### ६. अभ्यासयोग

पाहिजे एकांतस्थान। जेथें चंचळ न होय मन।
सकळ वृत्तींतें आवरून। बैसावें तेथें ॥ १ ॥

करूनि विषयाची निवृत्ती। चित्तासी प्रत्यगावृत्ती।
धरीं दृश्यमात्रीं विरक्ती। त्यागबुद्धि ॥ २ ॥

बैसोनि आसनीं सावकाशें। अंतरामाजीं प्रवेशे।
एकवटी इंद्रियद्वारीं बैसे। मनोवृत्ति जे ॥ ३ ॥

सांडून अभिमान स्थूळाचा। भाव धरी अंतराचा।
अभाव करूनि सर्वांचा। गगन पाहीं ॥ ४ ॥

स्थूळ इंद्रियांमधून। युक्तीनें एकवटीं मन।
अंतराकाशीं नेऊन। स्थिर करीं ॥ ५ ॥

जें जें वृत्ती बाहेर धांवे। तियेतें परतोन आणावें।
येणें अभ्यासें मन स्थिरावें। आपेआप ॥ ६ ॥

नातरी जिकडे मनाची राहाटी। लागावें ना तयाचे पाठीं।
माघारीं घालोनियां दृष्टी। स्वस्वरूपीं ठेविजे ॥ ७ ॥

मन जो जो विषय धरी । तो तो विवेकें विदारीं ।
तरी तो स्थिरावे अंतरीं । सांडूनि कल्पना ॥ ८ ॥

तेथें हृदयाकाशीं । मीपण स्फुरे जीवासी । ।
तेंचि विवेकेंसीं । पाहिजे जंव ॥ ९ ॥

तंव तें निरालंबी स्फुरे । पुनरपि तेथेंचि मुरे ।
तरी जीवदशा बारे । नास्तिक्य पावे ॥ १० ॥

नदी उगमीं स्थिरावे । तरी सिंधू पण कां न पावे ।
तैसे जीवाचें ब्रह्म कां न व्हावें । या स्थितीं राहतां ॥ ११ ॥

म्हणूनि परतावें अभ्यंतरीं । अभ्यास करावा ऐशियापरी ।
मग कल्पना अभ्यंतरीं । समरसोनि जाय ॥ १२ ॥

सोडोनि स्थूळगती । ऐशी राहे अंतर स्थिती ।
तोंवरी अभ्यास निगुतीं । करावाचि लागे ॥ १३ ॥

तेथें जें जें दृश्य स्फुरे । तें तें सोडून होयीं माघारें ।
ज्ञानस्वरूप निर्धारें । आपण होइजे ॥ १४ ॥

देखणेंचि देखण्यावरी । परतोन राहे जरी ।
तरी दृश्याकारा उरी । कैसेनि होय ॥ १५ ॥

साकारादि आघवें । शून्य होय स्वभावें ।
तेथें आपण पाहावें । आत्मस्वरूप ॥ १६ ॥

जैसे वाढलिया प्रळयनीर । नुरे कांहीं आकार ।
अंतःकरणादि व्यवहार । तैसा होय ॥ १७ ॥

जैसें कूर्मे आकुंचन केलें । करचरण शिर अंतरीं नेलें ।
मग आपाणिया आपण उरलें । अखंडित ॥ १८ ॥

जाणिव याचिपरी । प्रवेशतां अंतरीं ।
तेथें एकलीच उरे उरी । आपाणियाची ॥ १९ ॥

आपण एकी एकला । दुजा नाहीं देखिला ।
ज्ञानमात्र संचला । आत्माराम ॥ २० ॥

## ७. ग्रंथपरिहार

परी गा श्रीनिवृत्तिराया । हातातळीं सुखविलें तूं या ॥
परी निवांतचि मियां । भोगावें की ॥ १ ॥

परी महेशें सूर्याहातीं । दिधली तेजाची सुती ॥
तया भासा अंतर्वर्ती । जगाचि केलें ॥ २ ॥

चंद्रासि अमृत घातलें । तें तयाचि कायि येतुलें ॥
कीं सिंधु मेघा दिधलें । मेघाचि भागु ॥ ३ ॥

दिवा जो उजेडु । तो घराचाचि सुरवाडु ॥
गगनीं आथी पवाडु । तो जगाचाचि कीं ॥ ४ ॥

अगाधेंहि उचंबळती । ते चंद्रीचि ना शक्ती ? ॥
वसंतु करी तैं होती । झाडांचे दानीं ॥ ५ ॥

म्हणोनि हें असंवर्य । दैविकीचें औदार्य ॥
वांचोनि स्वातंतर्य । माझें नाहीं ॥ ६ ॥

आणि हा येवढा ऐसा । परिहारु देवू कायसा ॥
प्रभुप्रभाव विन्यासा । आड ठाकूनी ॥ ७ ॥

आम्हीं बोलिलों जें कांहीं । तें प्रगटचि असे ठायीं ॥
मा स्वयंप्रकाशा काई । प्रकाशावें बोलें ? ॥ ८ ॥

नाना विपायें आम्ही हन । कीजे ते पां मौन ॥
तरी काय जनीं जन । दिसते ना ? ॥ ९ ॥

जनातें जनीं देखतां । द्रष्टेचि दृश्य तत्वतां ॥
कोण्ही न होनि आइता । सिद्धांत हा ॥ १० ॥

यया परौते कांहीं । संविद्रहस्य नाही ॥
आणि हें तया आधीं ही । असताचि असे ॥ ११ ॥

तऱ्ही ग्रंथप्रस्तावो । न घडे हें म्हणो पावो ॥
तऱ्ही सिद्धानुवाद लाहों । आवडी करूं ॥ १२ ॥

पढियंते सदा तेंचि । परी भोगीं नवी नवी रुचि ॥
म्हणोनि हा उचितचि । अनुवाद सिद्ध ॥ १३ ॥

या कारणें मियां। गौप्य दाविलें बोल्लानियां ॥
ऐसे नाहीं, आपसया। प्रकाशुचि ॥ १४ ॥
आणि पूर्ण अहंता वेठलों। सैंघ आम्हीच दाटलों ॥
मा लोपलों ना प्रगटलों। कोणा होऊनी ॥ १५ ॥
आपणया आपणपें। निरूपण काय ओपे ? ॥
मा उगेपणे हरपे। ऐसे आहे ? ॥ १६ ॥
म्हणोनि माझी वैखरी। मौनाचेंहि मौन करी ॥
हे पाणियावरी मकरी। रेखिली पां ॥ १७ ॥
एवं दशोपनिषदें। पुढारी न ढळती पदें ॥
देखोनि बुडी बोधें। येथेंचि दिवली ॥ १८ ॥
ज्ञानदेवो म्हणे श्रीमंत। हें अनुभवामृत ॥
सेवोनि जीवन्मुक्त। हेंचि होतु ॥ १९ ॥
मुक्ति कीर वेल्हाळ। अनुभवामृत निखळ ॥
परी अमृताही उठी लाळ। अमृतें येणें ॥ २० ॥
नित्य चांदु होये। परी पुनवे आनु आहे ॥
हें कां मी म्हणों लाहें। सूर्यदृष्टीं ॥ २१ ॥
प्रिया सावायिली होये। तै अंगीचे अंगीं न समाये ॥
येऱ्हवी तेथेंचि आहे। तारुण्य कीं ॥ २२ ॥
वसंताचा आला। फळीं फुलीं आपला ॥
गगनाचिया डाळा। पेल्ती झाडें ॥ २३ ॥
ययालागीं हें बोलणें। अनुभवामृतपणें ॥
स्वानुभूति परगुणें। वोगरिलें ॥ २४ ॥
आणि मुक्त मुमुक्षु बद्ध। हें तववरी योग्यता भेद ॥
अनुभवामृतस्वाद। विरुद्ध जंव ॥ २५ ॥
गंगावगाहना आली। पाणीयें गंगा झालीं ॥
कां तिमिरें भेटलीं। सूर्या जैशी ॥ २६ ॥
नाहीं परिसाची कसवटी। तंववरीच वानियाच्या गोठी ॥
मग पंधरावयाच्या पटीं। बैसावे कीं ॥ २७ ॥

तैसें जे या अखरा । भेटती गाभारां ॥
ते वोघ जैसे सागरा । आंतु आले ॥ २८ ॥
जैशा आकारादि अक्षरा । भेटती पन्नासही मात्रा ॥
तैसें या चराचरा । दुसरें नाहीं ॥ २९ ॥
तैसी तये ईश्वरीं । अंगुळी नव्हेचि दुसरी ॥
किंबहुना सरोगरीं । शिवेसीचि ॥ ३० ॥
म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृतें येणें ॥
सणु भोगिजें सणें । विश्वाचेनि ॥ ३१ ॥

## ८. स्वानुभव-खाजें

घेवो पाहे तुझें दर्शन । तंव रूपा येवों पाहे मन ।
तेथें दर्शना होय अवजतन । ऐसें गमों लागे ॥ १ ॥
कांहीं करी बोले कल्पी । कां न करी न बोले न कल्पी ।
ये दोन्ही तुझ्या स्वरूपीं । न घेति उमसू ॥ २ ॥
चांगया तुझेनि नांवें । करणें न करणें न व्हावें ।
हें काय म्हणों परि न धरवे । मीपण हें ॥ ३ ॥
लवण पाणियाचा थावो । माजि रिघोनि गेलें पाहो ।
तंव तेंचि नाहीं मा काय घेवो । माप जळा ॥ ४ ॥
तैसे तुज आत्मयातें पाही । देखों गेलिया मीचि नाहीं ।
तेथें तूं कैचा काई । कल्पावया जोगा ॥ ५ ॥
जो जागोनि नीद देखे । तो देखणेपणा जेंवि मुके ।
तेंवि तूंतें देखोनि मी ठाके । कांहीं न होनि ॥ ६ ॥
आंधाराचे ठायीं । सूर्यप्रकाश तंव नाहीं ।
परी मी आहे हें कांहीं । न वचेचि जेंवि ॥ ७ ॥
तेंवि तुंते मी गिवसी । तेथें तूंपण मीपणेंसीं ।
उखतें पडे ग्रासीं । भेटीचि उरे ॥ ८ ॥
डोळ्याचे भूमिके । डोळा चित्र होय कौतुकें ।
आणि तेणेचि तो देखे । न डंडाळिता ॥ ९ ॥

तैसी उपजतां गोष्टी । न फुटतां दृष्टि ।
मी तूंवीण भेटी । माझी तुझी ॥ १० ॥
आतां मी तूं या उपाधी । ग्रासूनि भेटी नुसधी ।
ते भोगिली अनुवादीं । घोळ घोळू ॥ ११ ॥
रुचतयाचेनि मिसें । रुचितें जेविजें जैसे ।
कां दर्पणव्याजें दिसे । देखतें जेंवि ॥ १२ ॥
तैसीं अप्रमेयें प्रमेयें भरलीं । मौनाचीं अक्षरें भरलीं ।
रचोनि गोष्टी केली । मेळियेचि ॥ १३ ॥
इयेचें करूनि व्याज । तूं आपणयातें बुझ ।
दीप दीपपणें पाहे निज । आपुलें जैसे ॥ १४ ॥
तैसी केलिया गोठी । तया उघडिजे दृष्टी ।
आपणिया आपण भेटी । आपणामाजी ॥ १५ ॥
जालिया प्रळयीं एकार्णव । अपार पाणियाची धांव ।
गिळी आपुला उगव । तैसें करी ॥ १६ ॥
ज्ञानदेव म्हणे नामरूपें । विण तुझें साच आहे आपणपें ।
तें स्वानंद जीवनपें । सुखिया होई ॥ १७ ॥
चांगया पुढत पुढती । घरा आलिया ज्ञानसंपत्ति ।
वेद्यवेदकत्वही अतीतीं । पदीं बैसे ॥ १८ ॥
चांगदेवा तुझेनि व्याजें । माउलिया श्रीनिवृत्तिराजे ।
स्वानुभव रसाळ स्वाजें । दिधलें लोभे ॥ १९ ॥
एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोन्ही डोळस आरिसे ।
परस्पर पाहतां कैसें । मुकले भेदा ॥ २० ॥
तिये परि जो इया । दर्पण करील ओंविया ।
तो आत्मा एवढिया । मिळेल सुखा ॥ २१ ॥
नाहीं तेंचि काय नेणों असें । दिसें तेंचि कैसें नेणों दिसे ।
असें तेंचि नेणों आपैसे । तें कीं होइजे ॥ २२ ॥
निदे परौतें निदैजणें । जागृति गिळोनि जागणें ।
केलें तैसें गुंफणें । ज्ञानदेवो म्हणे ॥ २३ ॥

# ९. श्रोत्यांस विनवणी

तरि अवधान एकलें देइजे। मग सर्व सुखांसि पत्र घेइजे।
हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड आइकां ॥ १ ॥
परि प्रौढि न बोलों हो जी। तुम्हां सर्वज्ञाचां समाजीं।
देयां अवधान म्हणे हे माझी। विनवणी सलगी ॥ २ ॥
कां जे ललेयाचे लले सरति। मनोरथाचे मनौरे पुरति।
जरि माह्येरें श्रीमतें होंति। तुम्हां ऐसीं ॥ ३ ॥
तुमचेया दीठिवेयाचिये खोलें। सांसिनले प्रसन्नतेचे मळे।
ते साउली देखौनि लोले। श्रांतुजी मी ॥ ४ ॥
तुम्हीं सुखामृताचे डोहो। म्हणौनि आपुलिया सवें बोल्हावों लाहों।
आणि एथ ही सलगि करुं जरि बिहों। तरि निवों कें पां ॥ ५ ॥
आणि बालक बोबडां बोलीं। कां वांकुडां विचुकीं पाउलीं।
चोज करुनि माउली। रिझवी जेवि ॥ ६ ॥
तेवि तुम्हां संतांचा पढियो। कैसेनि तऱ्हीं आम्हावरि हो।
इया बहुवा अलुकी जी आहों। सलगि कारित ॥ ७ ॥
वांचूनि माझिये बोलतिये योग्यते। सर्वज्ञ भवादृश श्रोते।
काइ धडेयावरि सारस्वतें। पढों सिकिजे ॥ ८ ॥
अवधारां आवडे तेसणा धुंधुरु। परि महातेजीं न मिरवे काइ करुं।
अमृताचां ताटीं वोगरुं। ऐसि रसोयें कैचीं ॥ ९ ॥
हां हो हिमकरा वीजणे। किं नादापुढां आइकवणें।
लेणेयांसि हें लेणें। केहीं आहे ॥ १० ॥
सांघां परिमळें काइ तुरुंबावें। सागरें कवणी ठाइं नाहावें।
हें गगनचि अडे आघवें। ऐसा पवाडु कैचा ॥ ११ ॥
तैसें तुमचें अवधान धाए। आणि म्हणो हें देखों होये।
ऐसें वक्तृत्व कवणातें आहे। विचारिजो ॥ १२ ॥
तऱ्हीं विश्व प्रकाटितेया गभस्ती। हाथिवेनि किजे काइ आरति।
कीं चूळोदकें अपांपती। अर्घ्यु न दीजे ॥ १३ ॥

प्रभु तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबळा अर्चितसे भक्ति ॥
म्हणौनि बोलु जरी गंगावती । तऱ्हीं स्वीकाराल ॥ १४ ॥

बाळ बापाचां ताटीं रिगे । रिघौनि बापातेंचि जेवउं लागे ॥
किं तो संतोषाचे नि वेगें । मुख ओडवी ॥ १५ ॥

तैसा मी जरी तुम्हाप्रति । चावटै करितसें बाळमतीं ॥
तऱ्ही तुम्हीं संतोषिजे ऐसीचि जाति । स्नेहाचि एया ॥ १६ ॥

आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्हीं संत घेतले आहां बौहें ।
म्हणौनि केलिये सळगेचा नोहे । भारु तुम्हां ॥ १७ ॥

आहो तान्हेयाची लागे झटे । तरि तेणे अधिकेंचि पान्हा फूटे ।
रोसें प्रेम दूणावटे । पढियंतेयाचेनि ॥ १८ ॥

म्हणौनि मज लेंकुरुवाचेनि बोलें । तुमचें कृपाळुपण निदैलें ॥
चेइलें हें जी जाणावलें । एया लागिं बोलिलां ॥ १९ ॥

यऱ्हवि चांदिणें पिकाविजत आहे काइ चेंपणी । किं वारेया घापत
आहाति वाणी ॥ हां हो गगना गवसणी । गुंफिजतसे ॥ २० ॥

आइकां पाणीं वोथिजावें न लगे । नवनीती माथुला न लगे ॥
लाजिलों वारवाणुं न निगे । देखोनि जेयातें ॥ २१ ॥

हें असो शब्दब्रह्म जिये बाजे । शब्दु मावळलेयां निवांत निदिजे ।
तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे । हा पाडु काइ ॥ २२ ॥

परि ऐसाही मज धिंवसा । तो पुडुतीं एयाचि एकी आशा ॥
जे धोटींवं करुनि भवादृशां । पढियंतेयां होआवें ॥ २३ ॥

तरि आतां चंद्रापासौनि निववितें । जें अमृता ही हूनि जिववितें ।
तेणें अवधानें कीजो वाढतें । मनोरथां माझिया ॥ २४ ॥

कां जैं दीठिवा तुमचा वर्षे । तै सकळार्थसिद्धी मति पीके ॥
एऱ्हविं कोंभेला उन्मेखु सुके । जरि उदास तुम्हीं ॥ २५ ॥

साहाजें तऱ्हीं अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होये चारा ॥
तै दोंदें पेलति अक्षरां । प्रमेयाचिं ॥ २६ ॥

अर्थु बोलाची वाट न पाहे । तेथ अभप्राउऽचि अभिप्रायातें विये ।
भावांचा फुल्लौरा होतु जाये । मती वरि ॥ २७ ॥

ह्मणौनि संवादाचा सुवाऊ ढळे। तरि हृदयाकाश सारस्वतें ऊळे।
श्रोता दुर्चिता तरि वितुळे। मांडला रसु ॥ २८ ॥

आहो चंद्रकांतु द्रवता किरु होये। परि ते हातवटी चंद्रिं किं आहे।
ह्मणौनि वक्ता चि वक्ता न्हवे। श्रोतेनि विण ॥ २९ ॥

परि आतां आमुतें गोडां करावें। ऐसें तांदुळिं काइसेयां विनवावें।
साइखेडेनि कां प्रार्थावें। सूत्रधारातें ॥ ३० ॥

तो काइ बाउलेयांचां काजा नाचवी। किं आपुलिये जाणिवेची कळा
वाढवी। म्हणौनि आम्हां येया ठेवाठेवी। काइ काज ॥ ३१ ॥

तवं गुरु म्हणति काइ जालें। हें समस्त ही आम्हां पातलें।
परि आतां सांघै जें बोलिलें। नारायणें ॥ ३२ ॥

## १०. स्त्रिया, वैश्य व शूद्र

पाहे पां सावजें हातिरु धरिलें। तेणें तिया काकुळती मातें स्मरिलें।
किं तियाचें पशुत्व वावो जालें। पातलें मातें ॥ १ ॥

आगा नाव घेतां ओखटी। जे आघवेया अधमाचां सेवटीं ॥
तिये पापयोनीं हीं किरीटी। जन्मले जे ॥ २ ॥

ते पापयोनि मूढ। मूर्ख जैसे दगड ॥
परि माझां ठाइं दृढ। सर्व भावें ॥ ३ ॥

जेयांचिये वाचे माझे आलाप। दीठि भोगी माझें चि रूप।
जेयांचे मनसंकल्प। माझे चि वाहे ॥ ४ ॥

माझेया कीर्तीविण। जेयांचे रीते नाहीं श्रवण ॥
जेयां सर्वांगा भूषण। माझी सेवा ॥ ५ ॥

जेयांचे ज्ञान विषो नेणे। जाणिवा मज चि एकातें जाणे ॥
जेयांसि ऐसें लाभे तरि जीणें। यऱ्हवि मरण ॥ ६ ॥

ऐसां आघवा चि परीं पांडवा। जिहिं आपुलेयां सर्व भावां ॥
जियावेया लागि ओलावा। मीं चि केला ॥ ७ ॥

ते पापयोनी हीं होतु कां। ते श्रुताधीत न्हवतु कां ॥
परि मासिं तूंकितां तूंका। तूटि नाहिं ॥ ८ ॥

पाहें पां भक्तिचेनि आथिलेपणें। दैत्यें देवां आणिलें उणें॥
माझें नृसिंहत्व लेणें। जेयाचिये महिमे ॥९॥

तो प्रह्लाद गा मजसाठीं। घेतां बौहें सदा किरीटी॥
कां जें मियां देयावें तें गोठी। तेयाचिया जोड ॥१०॥

येऱ्हवि दैत्यकुळ साचोकारें। परि इंद्रु ही सरि न लाहे उपरें॥
म्हणौनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण ॥११॥

राजाज्ञेचीं अक्षरें आथि। तियें चर्मा एका जेया पडति॥
तेया चर्मा साठीं जोडति। सकळा ही वस्तू ॥१२॥

वांचूनि सोनेंरुपें प्रमाण नोहे। एथ राजाज्ञा समर्थ आहे॥
तें चर्मचि एक जें लाहे। तेणें वींकेति आघवीं ॥१३॥

तैसें उत्तमत्व तैं तरे। तैंचि सर्वज्ञता सरे॥
जैं मनोबुद्धि भरे। माझेनि प्रेमें ॥१४॥

म्हणौनि कुळें जाती वर्ण। हे आघवें चि गा अकारण॥
एथ अर्जुना माझेंपण। सार्थक एक ॥१५॥

तें चि भलेतेणें भावें। मना मजआंतु एणें होआवें॥
आलें तरि आघवें। मागील तें वाओ ॥१६॥

तैसें तवंचि वाहळा वोहळ। जवं न पवति गंगाजळ॥
मग होउनि ठाकति केवळ। गंगारूप ॥१७॥

कां खैर चंदन काष्ठें। हें विवंचना तवंचि घटे॥
जव नेघपति येकावटे। अग्नी माझि ॥१८॥

तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया। कां शूद्र अंत्यादि इया॥
जाती तंव चि वेगळालिया। जव न भजति मातें ॥१९॥

मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें। जेव्हां भाव होंति मज मीनले॥
जैसें लवण कण घातले। सागरावरि ॥२०॥

तवं चि नदानदीचीं नांवें। तवं चि पूर्वपश्चिमें तेयां धावे॥
जवं नैयंति आघवे। समुद्रापासिं ॥२१॥

हेंचि कव्हणें येकें मिसें। चित्त माझां ठाइ प्रवेशे॥
एतुलें हो मग आपैसें। मी होणें असें ॥२२॥

आगा वर फोडावेया चि लागि । लोह मीलेकां पारसाचां आंगीं ॥
कां जें मिळैल इये प्रसंगीं । सोनें होईल ॥ २३ ॥

पाहे पां वालभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनाचिं नीजें ॥
मज मीनलेयां काइ माझें । स्वरूप नो होंती चि ॥ २४ ॥

ना तरि भियाचेनि मीसें । माते न पविजाचि काइ कंसे ॥
किं अखंडे वैरावेशे । चैद्यादिकिं ॥ २५ ॥

आगा सोइरेपणें चि पांडवा । माझें सायुज्य एयां यादवां ॥
पै ममत्वें वसुदेवा-। दिकां सकळां ॥ २६ ॥

नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हान सनत्कुमारा ॥
ऐयां भक्ती मी धनुर्द्धरा । प्राप्यु जैसा ॥ २७ ॥

तैसा चि गोपीसीं सकामें । तेयां कंसा भय संभ्रमें ॥
एरां घातकें मनोधर्मे । शिशुपाळां ॥ २८ ॥

आगा मी एकु लाणिचें खागें । मज एउन्ये भले तेणें मार्गे ॥
भक्ती कां विषयवैरागें । अथवा वैरें ॥ २९ ॥

ह्मणौनि पाइं । प्रवेशावेया माझां ठाइं ।
उपायांची नाहि । केणि एथें ॥ ३० ॥

आणि भलेंतिये जाती जन्मावें । मग भाजिजो अथवा विरोधावें ॥
परि भक्तां कां वैरियां होआवें । माझेयां चि ॥ ३१ ॥

आगा कव्हणें येकें बोलें । माझें पण जरि झालें ॥
तरि मीं होणें आलें । हाता निरुतें ॥ ३२ ॥

एया लागिं पापयोनी अर्जुना । कां वैश्य शुद्र अंगना ॥
येणें मातें भजतां सदना । माझेयां येंति ॥ ३३ ॥

## ११. गीतामाहात्म्य

एमेयां श्लोकां सें सात । गीतेचिं पदें आंगें वाहात ॥
पदे म्हणों किं अमृत । गीताकाशिचें ॥ १ ॥

किं आत्मराजाचिये सभे । गीते ओडविले खांबे ॥
मज श्लोक प्रतिभे । ऐसे एंती ॥ २ ॥

किं गीता हे सप्तशती- । मंत्र प्रतिपाद्य भगवती ॥
मोहमहिषमुक्ती । आनंदली असे ॥ ३ ॥

ह्मणौनि मनें कानें वाचा । जो सेवकु होईल इयेचा ॥
तो स्वानंदसाम्राज्यींचा । चक्रवर्ति करी ॥ ४ ॥

किं अविद्यातिमिररोखे । श्लोक सूर्याचें सावाइकें ॥
खेळविलें गीता मीखें । रायें श्रीकृष्णे ॥ ५ ॥

किं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडो जाली आहे गीता ॥
संसारपथश्रांता । विसावांवेयां ॥ ६ ॥

किं सभाग्यसंतीं भ्रमरीं । केले ते श्लोक कल्हारिं ॥
श्रीकृष्णास्यसरोवरीं । सांसिनली हे ॥ ७ ॥

किं श्लोक नव्हंति आन । गमे गीतेचें माहिमान ॥
वाखाणिते बंदिजन । उदंड जैसे ॥ ८ ॥

किं श्लोकांचेया आवरां । सात से कल्लनि सौंदरा ॥
सर्वागम गीतापुरा । वसों आले ॥ ९ ॥

कां निजकांता आत्मेयां । आवाडि गीता मिळावेया ॥
श्लोक नव्हंति बाह्या । पसरुं कां जो ॥ १० ॥

किं गीता कमालेचे भृंग । किं गीता सागर तरंग ॥
किं हरिचे हे तुरंग । गीतारथिचे ॥ ११ ॥

किं श्लोक सर्व तीर्थांतु । आली गीता गंगा अद्भुत ॥
जे अर्जुनु जाला सिंहस्थु । ह्मणौनियां ॥ १२ ॥

किं नव्हे हे श्लोकश्रेणी । संतत जाली चिंतामणी ॥
किं निर्विकल्प लावणी । कल्पतरुची हे ॥ १३ ॥

ह्मणौनि जिया तिया सवा । गीता चि येकि सेवा ॥
काइ कराल आघवां । शास्त्रिं एरिं ॥ १४ ॥

आणि कृष्णार्जुनिं मोकली । गोठि केली निराळी ॥
ते व्यासें दाविली करतळीं । घेऊँग्ये ऐसी ॥ १५ ॥

बाळकांते वोरसें । माये जेवऊं बैसे ॥
तेव्हाळिं तेया ठाकति तैसे । घांस करी ॥ १६ ॥

कां अफांटा समीरणा । आपैतेपणेंसिं आणा ॥
केलें जैसें वीजणा । निर्मूनियां ॥ १७ ॥
तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनु अनुष्टुभें ॥
स्त्रीशूद्रादिप्रातिभे । सामाविलें ॥ १८ ॥
स्वातीचेनि पाणियें । न्हवंति जरि मोतियें ॥
तरि आंगीं सौंदराचियें । कां शोभती तियें ॥ १९ ॥
नादु वाद्या नैयंता । तरि कां गोचरु होंता ॥
फुलें नव्हतां घेपता । आमोदु केवि ॥ २० ॥
गोडें नव्हंति पक्वान्नें । तरि कां फावती रसनें ॥
दर्पणेंविण नयनें । नयनु कां दीसे ॥ २१ ॥
द्रष्टा श्रीगुरुमूर्ति । न रिगतां दृश्यपंथीं ॥
तरि काह्या उपास्ती । आकलता तो ॥ २२ ॥
तैसें वस्तु जें असंख्यात । तेया संख्या इयें शतें सात ॥
नव्हंति तरि कोण एथ । लागों ये तें ॥ २३ ॥
मेघु सिंधुचें पाणी वाहे । तऱ्ही जग तेयातें चि पाहे ॥
कां जे उमप तें नोहे । टाकतें कोण्हां ॥ २४ ॥
आणि वाचा जें न पवे । तें श्लोक नव्हंति बरवें ॥
तरि कानें मुखें फावे । ऐसें कां होतें ॥ २५ ॥
ह्मणौनि व्यासाचा हा थोरु । विश्वा जाला उपकारु ॥
श्रीकृष्ण उक्ति आकारु । ग्रंथाचा केला ॥ २६ ॥
आणि तो मियां हा आतां । व्यासाचि पदें पाहातपाहातां ॥
आणिला श्रवणपथा । मऱ्हाटिया ॥ २७ ॥
व्यासादिकांचे उन्मेष । राहाटाति जेथ साशंक ॥
तेथ मी रंक एक । वाचाळें करी ॥ २८ ॥
परी गीता ईश्वरू भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा ॥
परि माझिया दूर्वादळा । ना न ह्मणे ॥ २९ ॥
आणि जेया सिंधुतटा । पाणिया येति गजघंटा ॥
तरि काइं मुरकुटां । वारिजतसे ॥ ३० ॥

पांखिफुटें पांखिरुं । गगनीं नुडे तरि काइ करुं ॥
नभ क्रमूनि थोरु । गरुडु देखै ॥ ३१ ॥

राजहंसाचें चालणें । भूतळिं चालावें कवणे ॥
तरि आणिकिं ही कुंटेपणें । चालावें लागे ॥ ३२ ॥

जी आपुलेनि अवकाशें । अगाध घेपे कलशे ॥
चूळु चूळु पाणी ऐसें । घेउनि निगे ॥ ३३ ॥

दिवियेचां आंगि थोरी । तरि ते बहुतां तेजातें करी ॥
वाति आपुलिया परी । आणीकीं ना ॥ ३४ ॥

जी समुद्राचे नि पैसें । समुद्रीं आकाशें आभासे ॥
थिळरीं थिळरा ऐसें । बिंबेचि पै ॥ ३५ ॥

तेवि व्यासादि महामती । वावरों ये इये ग्रंथीं ॥
मां आम्ही ठाकों हें युगुति । निमलें चि कीर ॥ ३६ ॥

जिये सागरीं जलचरें । संचरति मंदराकारें ॥
तेथ काइ सफरें । पव्हों न ल्हांति ॥ ३७ ॥

अरुणु आंगा जवळिके । ह्मणौनि सूर्यातें तो देखे ॥
मा भूतळिं चि नेदखे । मुंगी काई ॥ ३८ ॥

इया लागिं आह्मां प्राकृतां । देशिकारें बांधों गीता ॥
ह्मणणें हें अनुचिता । कारण नव्हे ॥ ३९ ॥

आणि बापु पुढां जाये । देखां उचलतां पायें ॥
आणि बालक हळू हळू ये । तरि तें न पवों काइ ॥ ४० ॥

तैसा व्यासाचा मागोवा घेंतू । भाष्यकारातें पूसतु ॥
अयोग्यु ही मी न पवतु । कें जाइन ॥ ४१ ॥

## १२. मराठी गीता

आतां आइती गीता जगीं । मीं सांगे मराठिया भंगीं ॥
एथ कैचा विस्मया लागिं । ठाउ असे ॥ १ ॥

श्रीगुरुचेनि नांवें माती । डोंगरीं जेया पासिं होती ॥
तेणे कोळियें त्रिजगती । एकावद केली ॥ २ ॥

चंदनें वेधिलीं झाडें । जालिं चंदनाचोनि पाडें ॥
वासिष्ठें मानिली कीं भांडे । भानुसीं षाठी ॥ ३ ॥

मा मी तवं चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ॥
जो दीठिवेनि आपुला । बैसवी पदीं ॥ ४ ॥

आधीं चि देखणी दीठि । वरि सूर्यु पुरवि पाठि ॥
तैं न दिसे ऐसी गोठि । कोठें असे ॥ ५ ॥

ह्मणौनि माझे नीच नवे । श्वास ही प्रबंध होआवे ॥
गुरुकृपा काइ न्हवे । ज्ञानदेउ ह्मणे ॥ ६ ॥

या कारणें मियां । गीतार्थु मऱ्हाटिया ॥
केला लोका लागिया । दीठिचा विखो ॥ ७ ॥

परि मऱ्हाटे बोल रंगे । कवळितां जै गीतांगें ॥
तैं गा तेयाचेनि पांगें । एकावट जाले ॥ ८ ॥

ह्मणौनि गातां गाउँ ह्मणे । तैं गाणिवे होये नेणें ॥
ना मोलें तरि उणें । गीता ही न आणिती ॥ ९ ॥

सुंदर आंगिं लेणे न सूए । तैं तो मोकला श्रिंगारु होये ॥
ना लेइलें तरि आहे । तैसें कें उचित ॥ १० ॥

कां मोतियाची जैसी जाति । सोनेयां हि मानु देति ॥
नान यऱ्हवि तऱ्हीं मानवाति । आंगे चि गुणु ॥ ११ ॥

नाना गुंफिली कां मोकळीं । उणीं न्हवाति परिमळीं ॥
वसंतागमिन्चि वाटौळीं । मोगरिं जैसिं ॥ १२ ॥

तैसी गाणीव तें मिरवी । गीतें विण रंगु दावी ॥
ते लोभाचां बंधु उऱ्वी । केली मियां ॥ १३ ॥

तेणें आबाळ सुबोधें । उवियेचेनि बंधें ॥
ब्रह्मरसुस्वादें । आखरें गुंफिलीं ॥ १४ ॥

आतां चंदनाचां सेजारीं । परिमळा लागि निमिष भरी ॥
पारुखणें जिया परीं । न लगे तेथ ॥ १५ ॥

तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागत खेउ समाधी आणी ॥
आइकिलेयां वाखाणी । व्यसन न लवी ॥ १६ ॥

पाकु करिति व्याजें। पांडित्यें एथ वेखजें ॥
तें अमृतातें नेणिजे। पातलेयां ॥ १७ ॥

तैसेनि आइतेपणें। कवित्व जाले उभणें ॥
मनननिदिध्यासश्रवणें। जींतलें आतां ॥ १८ ॥

हें स्वआनंदभोगाची सेल। भलतेयासी चि देइल ॥
सर्वेंद्रियें पोसवील। श्रवणा करवीं ॥ १९ ॥

चंद्रातें आंगवणें। भोगुनि चकोर सिहाणे ॥
तर्‍हीं फावे जैसें चांदिणें। भलतेया ॥ २० ॥

तैसे अध्यात्मशास्त्रीं इये। एक अंतरंगचि अधिकारिये ॥
येरि लोक वाक्चातुर्यें। होईल सुखिया ॥ २१ ॥

## १३. पसायदान

आतां विश्वात्मकें देवें। एणे वाग्यज्ञें तोषावें ॥
तोखौनि मज देयावें। पसायदान हें ॥ १ ॥

जे खळांची वाकुडे मांडे। तेयां सत्संगी रति वाढे ॥
भूतां परस्परें पडे। मैत्र जीवाचें ॥ २ ॥

दुरिताचें तिमिर जाऊ। विश्वा स्वधर्मसूर्यें पाहो ॥
वांछिल तें तें लाहो। प्राणिजात ॥ ३ ॥

वर्षतें सर्व मंगलीं। ईश्वरनिष्ठांची मांदियली ॥
अनवरत भूतलीं। भेटोतु भूतां ॥ ४ ॥

चला कल्पतरूचे आरव। चेतनाचिंतामणिचे गांवं ॥
बोलते पां अर्णव। पीयूखांचे ॥ ५ ॥

चंद्रमे जे आलंछन। मार्तंड जे तापहीन ॥
ते सर्वी ही सदा सज्जन। सोयरे होतु ॥ ६ ॥

किंबहुना सर्व सुखीं। पूर्ण होउनि तिहिं लोकिं ॥
भजिजो आदिपुरुषीं। अखंडित ॥ ७ ॥

आणि ग्रंथोपजीविये। विशेषें लोकीं इये ॥
दृष्टादृष्ट विजयें। होआवें जी ॥ ८ ॥

एथ म्हणे विश्वेसरुराउ । हा होईल दाओ पसाउ ॥
एणें वचनें ज्ञानदेउ । सुखिया जाला ॥ ९ ॥

## १४. स्वधर्म

अनादि जो स्वधर्माचार । जो कां मोक्षकर साचार ॥
तेणें स्वधर्में सकाम नर । लोकांतर वांछिती ॥ १ ॥
झालिया लोकांतर प्राप्ती । तेथूनि होय पुनरावृत्ती ॥
न करूनियां माझी भक्ति । स्वधर्म नाशिती सकाम ॥ २ ॥
ब्राह्मणा आला भद्रजाती । आम्हां न पोसवे निश्चिती ॥
मग तो देउनियां घेती । वाहावया पोथी वृद्ध ढोर ॥ ३ ॥
यापरी स्वधर्म जाण। उपेक्षिती गा ब्राह्मण ॥
मग लोकांतरीं कोरान्न । मागावया कण धावती ॥ ४ ॥
घरीं आणोनि दिधली कामधेनू । आम्हां न पोसवे म्हणून ॥
ताकासाठीं देती हेळसूनू । आली नागवणू ते नेणें ॥ ५ ॥
तेवीं म्यां जाण गायत्रीमंत्र । दीधला ब्राह्मणासी स्वतंत्र ॥
तो उपेक्षूनियां मंत्रतंत्र । शूद्राचार आचरती ॥ ६ ॥
सौर शाक्त गाणपत्यादि जाण । नाना मंत्रदीक्षा घेती ब्राह्मण ॥
परी गायत्रीचें अनुष्टान । एकाहि जाण न करिती ॥ ७ ॥
वेदीं प्रतिपाद्य कर्मफळ । तो वेदू मिथ्या नव्हे केवळ ॥
तो वेदवाद समूळ । नेणोनि बरळ हें मानिती ॥ ८ ॥
घ्यावया वोखदाची वाटी । माता साखर दे चिमुटी ॥
तें फळ मुख्य नव्हे दृष्टी । जावया पोटींचा महारोगू ॥ ९ ॥
तेवी वेद बोले जें फळ । ते प्रवृत्ति रोचना केवळ ॥
स्वधर्म विचारितां समूळ । चित्तमळ क्षालक ॥ १० ॥
स्वधर्म सांडूनि सर्वथा । सकाम कर्म करूं जातां ॥
तेंहि शिणल्या वेगळे तत्त्वतां । क्षुद्रकामता फळेना ॥ ११ ॥
जेणें द्रव्यें अमृत ये हाता । तें वेचूनि मद्य घेतां ॥
अधर्म आणि उन्मत्तता । पिशाचता जग थुंकी ॥ १२ ॥

स्वपतीसी काम भोगितां । परलोक पावे पतिव्रता ॥
तेचि परपुरुषासी रमतां । अधःपाता नेतसे ॥ १३ ॥
जिव्हा दुरुक्ती बोलतां । यम प्रहार वाजती माथां ॥
तिनेंचि 'रामराम' म्हणतां । हरिभक्तां यम कापे ॥ १४ ॥
तेंवी पावोनि उत्तम जन्म । कर्म करुनि सकाम ॥
भोगावें दुःख परम । मरण जन्म अनिवार ॥ १५ ॥
स्वधर्म करणें आवश्यक । तेथें सांडणे फळाभिलाख ॥
तेंचि मदर्पण चोख । न करितां देख संकल्पू ॥ १६ ॥
हो कां घरिंच्याचि रांजणीं । निघती मुक्ताफळांच्या श्रेणी ॥
तरी कां ताम्रपर्णी । समुद्र मिळणी शोधावी ॥ १७ ॥
आपुलेच घरींचीं झाडें । फळती कल्पतरूचेनि पाडें ॥
तरी अमरावतीचे चाडें । वृथा वेडे कां शिणती ॥ १८ ॥
हो कां सद्‌गुरुचें तीर्थ घेतां । पाविजे परम पवित्रता ॥
तरी धावावया नाना तीर्थां । विशेषता ते कायी ॥ १९ ॥
कां ईश्वरत्वें पिता पूजितां । निजमोक्ष लाभे आइता ॥
तरी भजावें देवां देवतां । कोण्या अर्था सज्ञानीं ॥ २० ॥
माझिया प्राप्तीलागी स्वकर्म । नैराश्यें आचरावा स्वधर्म ॥
हें ज्यासी कळे वर्म । तया पुरुषोत्तम सदा वश्य ॥ २१ ॥
स्वधर्मा ऐसे निज अमृत । जे निर्विकल्पें सेवूं जाणत ॥
त्यांसी जन्ममरणाचा आवर्त । मी श्रीअनंत लागों नेदीं ॥ २२ ॥
स्वधर्मा ऐसा स्पर्शमणी । सांपडल्या निर्विकल्पपणीं ॥
तो लाविल्या दृश्यस्थानीं । चिन्मात्र सुवर्णी ते उठी ॥ २३ ॥
एवं स्वधर्म यापरी । तारक होय संसारीं ॥
स्वधर्माचे नावेवरी । तरले भवसागरीं निजभक्त ॥ २४ ॥
संसार तरले हा बोलु कुडा । स्वधर्म करितां माझिया चाडा ॥
होय भवसागरीं कोरडा । मी सांपडे पुढां निजात्मा ॥ २५ ॥

## १५. एकादशस्कंधमाहात्म्य

श्रीभागवत महाक्षेत्र । तेथें ब्रह्म मुख्य बीजधर ॥
नारद तेथ मिरासी कर । पेरणी विचित्र तेणें केली ॥ १ ॥

तेथ श्रीव्यासें अतिशुद्ध । बांधारे घातले दशविध ॥
पीक पिकले अगाध । स्वानंद बोध निडारे ॥ २ ॥

तेथ शुक बैसला सोंकारा । तेणे फोडिला हरिकथा पागोरा ॥
पापपक्ष्यांचा थारा । उडविला पुरा निःशेष ॥ ३ ॥

त्याची एकादशीं जाण । उद्धवें केली संवगण ॥
काढिले निडाराचे कण । अति सघन कृष्णोक्तीं ॥ ४ ॥

तेथ नानायुक्ति पडिपाडीं । उत्तमोत्तम प्रश्न परवडी ॥
केलीं पक्कान्नें चोखडीं । त्यांची नीच नवी गोडी अविनाशी ॥५॥

ते अविनाशी निजगोडी । पदोपदीं अति चोखडी ॥
एकादशामाजिं रोकडी । उद्धवाचिये जोडी उपकार जगा ॥ ६ ॥

त्या उद्धवाचे मागले पंक्तीं । त्यक्तोदक श्रवणार्थी ॥
शुकमुखें परीक्षिती । निजात्मतृप्तीं निवाला ॥ ७ ॥

त्या समर्थाचिये पंक्तीं । भावार्थदीपिका धरोनि हातीं ॥
श्रीधरें दावितां पदपदार्थीं । निजात्मस्थिती निवाला ॥ ८ ॥

जेथ देशभाषापद पक्षेंसी । एकाजनार्दनकृपेची माशी ॥
तृप्ती होय अवघ्यांसरसी । निषेध तिसीं असेना ॥ ९ ॥

एकाजनार्दनी मांजर वेडें । भावार्थदीपिकाउजियाडे ॥
हे रस देखोनि चोखडे । ताटापुढें पै आलें ॥ १० ॥

मीयों मीयो करितां स्मरण । कृपेनें तुष्टले सज्जन ॥
शेषप्रसाद देऊनि जाण । संतृप्त पूर्ण पैं केलें ॥ ११ ॥

एकाजनार्दनाचें पोसणें । मी मांजर जाहलों नीचपणें ।
चाटितां संतांचें शेष भाणें । म्यां तृप्ती पावणे परिपूर्ण ॥ १२ ॥

हो कां त्या समर्थाचियां ताटीं । पूर्ण ब्रह्मरसें भरली वाटी ॥
ते मी अत्यंत प्रेमें चाटी । स्वानंदपुष्टीं संतोषें ॥ १३ ॥

जो काया मनें आणि वाचा । सद्भावें विनीत होय नीचा ॥
तो अधिकारी एकादशाचा । हा जनार्दनाचा उपदेश ॥ १४ ॥
जंव जंव देहीं ज्ञानाभिमान । जंव जंव योग्यता सन्मान ॥
तंव तंव एकादशाचें ज्ञान । सर्वथा जाण अनोळखचि ॥ १५ ॥
सर्व भूतीं भगवद्भजन । सद्भावें जंव नुपजे पूर्ण ॥
तंववरी एकादशाचे ज्ञान । सर्वथा जाण कळेना ॥ १६ ॥
यापरी श्रीभागवत क्षेत्र । पीक पिकलें परम पवित्र ॥
एथ सुखी होती साधक नर । ज्यासीं अत्यादर सर्व भूतीं ॥१७॥
एकादश क्षेत्र नव्हे जाण । हाचि समुद्र परिपूर्ण ॥
जो जैसा एक होय निमग्न । तो तैसींच आपण रत्नें लाभे ॥ १८ ॥
हा एकादश नव्हे निर्धारीं । जीवगजेंद्राच्या उद्धारीं ॥
सवेगें पावला हरी । ज्ञानचक्र करीं घेउनी ॥ १९ ॥
हेंही नव्हे एकादशाची थोरी । अहंहिरण्यकशिपू विदारी ॥
तो हा प्रकटला नरहरी । भक्त कैवारी कृपापूर्ण ॥ २० ॥
गंगा यमुना दोनी सांग । कृष्ण उद्धव उत्तम चांग ॥
गुप्त सरस्वती ज्ञानबोध । त्रिवेणी प्रयाग एकादश ॥ २१ ॥
तेथ वैराग्य माघमासीं जाण । श्रद्धा अरुणोदयीं नित्य स्नान ॥
करितां होऊनी पावन । कृष्णपदवी पूर्ण पावती ॥ २२ ॥
हेही एकादशाची नव्हे कोटी । कृष्णउद्धवांची गुह्य गोठी ॥
हे बहुकल्प कापिलाषष्ठी । पर्वणी गोमटी निजसाधकां ॥ २३ ॥
ते पर्वकाळीं जे निमग्न । ते तत्काळ पावती कल्याण ॥
बाधूं न शके जन्ममरण । ब्रह्म परिपूर्ण स्वयें होती ॥ २४ ॥
हा एकादश नव्हे जाण । एकातिसां खणांचें वृंदावन ॥
एथ नित्य वसे श्रीकृष्ण । स्वानंदपूर्ण निजसत्ता ॥ २५ ॥
एथ पंधरा शते जे श्लोक । तेचि अत्यंत पानें चोख ॥
माजी ज्ञानमंजरीचे घोख । अति सुरेख शोभती ॥ २६ ॥
तेथ जे घालिती निजजीवन । ते होती परम पावन ॥
स्वयें ठाकती कृष्णसदन । ब्रह्मपरिपूर्ण स्वानंदे ॥ २७ ॥

जे वंदिती मुळींचे उदका । जे लाविती मूळमृत्तिका ॥
ते वंद्य होती तिहीं लोकां । नित्य निजसखा श्रीकृष्ण जोडे॥२८॥
भागवतामाजीं एकादश । जैसा यतींमाजी परमहंस ॥
कां देवामाजी जगन्निवास । तैसा एकादश परम वंद्य ॥ २९ ॥
पक्ष्यांमाजी राजहंस । रसांमाजी सिद्धरस ॥
तैसा भागवतामाजी एकादश । परम सुरस अतिवंद्य ॥ ३० ॥
तीर्थ क्षेत्र वाराणसी । पावनत्वें गंगा जैसी ॥
जीवोद्धारी एकादशी । माहिमा तैसी अनिर्वाच्या ॥ ३१ ॥
त्या एकादशाची टीका । जनार्दनकृपें करी एका ॥
तो एकत्वाच्या निजसुखा । फळे भाविकां सद्भावें ॥ ३२ ॥
धरोनि बाळकाचा हात । बाप अक्षरें स्वयें लिहवीत ॥
तैसा एकादशाचा अर्थ । बोलविला परमार्थ जनार्दनें ॥ ३३ ॥
जनार्दनें नवल केलें । मूर्खाहातीं ज्ञान बोलविलें ॥
ग्रंथीं परमार्थरूप आणिलें । वाखाणविलें एकादशा ॥ ३४ ॥
जनार्दनें ऐसें केलें । माझें मीपण निश्शेष नेलें ॥
मग परमार्थी अर्थविलें । बोलवूनि बोलें निजसत्ता ॥ ३५ ॥
खांबसूत्री बाहुलीं । सूत्रधार नाचवी भलीं ॥
तेवीं ग्रंथार्थाची बोली । बोलविली श्रीजनार्दनें ॥ ३६ ॥
अवघा जनार्दनाचि देखा । तोचि आडनांवे जाहला एका ॥
तेणें नामें ग्रंथ नेटका । अर्थी सात्त्विकां तत्त्वार्थ दावी ॥ ३७ ॥
कवित्वीं घातलें माझें नांव । शेखीं नांवाचा नुरवीच ठाव ॥
ऐसें जनार्दन वैभव । अति अभिनव अलौलिक ॥ ३८ ॥

## १५. गुरुलक्षण

प्रथम गुरु तो कैसा । कैसी तयाची पूर्ण दशा ॥
ते संक्षेपेचि विदूषां । प्रति बोलिजैल ॥ १ ॥
मंत्रमार्गी येक निपुण । उपदेशिती यंत्रादि साधना ॥
क्रियातंत्र परम गहन । प्रशंसिती जे ॥ २ ॥

ते गुरुत्वें मानावे । परंतु सद्‌गुरु तैसे न म्हणावे ॥
ईश्वरावतार स्वभावें । तारक जे ॥ ३ ॥
जे उपदेशिती भेदु । अन्य मतंसी विरोधु ॥
ब्रह्मत्मविषयीं बोधु । दुर्लभ जयां ॥ ४ ॥
कां वेदविरुद्धें मतें । उपदेशिती शिष्यांतें ॥
ते असद्‌गुरु निरुतं । जाणावें वर्म ॥ ५ ॥
दृष्टिवेधें वेधिती । कां हाठयोगु उपदेशिती ॥
ते सद्‌गुरु मानिती । अविवेकी जन ॥ ६ ॥
दृष्टीचें लक्ष मानून । लक्षिती निरालंब गगन ॥
तेथें आभास आन आन । उमटों लागती ॥ ७ ॥
व्यापक अथवा येकदेशी । स्वरूप लक्षिती आकाशीं ॥
जे मत वेदशास्त्रासी । मिळेचना ॥८ ॥
ऐसीं नाना मतें निमूळें । वेद विरुद्धें सकळे ॥
सांगती तें आंधळे । न होती सद्‌गुरु ॥ ॥ ९ ॥
अंधे अंधु वागविजे । तै दोघीं अडीं पडिजे ॥
सद्‌गुरु नेणौनि येरां भजि जे । ते तैसे होये ॥ १० ॥
असद्‌गुरुचें लक्षण । थोर तेथीचीं येकी खूण ॥
जें प्रथम आधी मी कवण । हेचिं न कळे ॥ ११ ॥
विशेषें मुद्रा दांभिक । रजःप्रवृत्ती ते अधिक ॥
क्रोधु बहुसाळु पादार्थिक । वासना भोगाची ॥ १२ ॥
अर्थ स्वार्थे उपदेशिती । अधिकारिया विद्या वंचिती ॥
ज्ञान विकरां घालिती ॥ ते न होती सद्‌गुरु ॥ १३ ॥
आतां सद्‌गुरु तें कवण । जे शांत उदार सर्वज्ञ ॥
सकळीं अर्थी निर्वासना । दंभे सुटले ॥ १४ ॥
आत्मज्ञानाची कळा । संपूर्ण हृदयीं निर्मळा ॥
काम क्रोधु भस्म जाला । जयां पुरुषांचा ॥ १५ ॥
रोकडा ब्रह्म साक्षात्कारू । करूं जाणे तो सद्‌गुरु ॥
मोक्षाचा नाही उधारू । जयाप्रती ॥ ॥ १६ ॥

जयाचेनि संनिधानें। शिष्यें सर्वज्ञ होणें॥
तया सद्गुरुची चिन्हें। किती वर्णावी ॥१७॥

## १६. बंधमोक्ष

भेद् सात्यकी अभेद्। जीवा ईश्वराचा बोधु॥
हा शाब्दिकु ज्ञानवादु। पुरे आतां ॥ १ ॥
बंधमोक्ष हें विवरण। कार्य कैसें कारण॥
ऐसेंनि ज्ञानेंकरून। विश्रांती न पवसी ॥ २ ॥
निर्मळ जें आत्मज्ञान। तेंचि सत्याद्वय ब्रह्मदर्शन॥
जेथें जीवपण आणि ईश्वरपण। उडाली दोन्ही ॥ ३ ॥
प्रपंचाची व्यवस्था। ते पुसावीचि नलगे सर्वथा॥
सत्य स्वरूप तत्वता। कळोनि गेले ॥ ४ ॥
बंधमोक्ष भेदाभेद। हा खुंटला अवघा वादविवाद॥
या लागीं आत्मज्ञानशुद्ध। तेचि पुसावे ॥ ५ ॥
जाणपणाचिया कळा। आत्मज्ञानेंविण विकळा।
दृष्टी नाहीं तो डोळा। सुंदरु जैसा ॥ ६ ॥
प्राणेविण शरीर। दीपकेंविण मंदीर॥
मनुष्यहीन नगर। न शोभे जैसे ॥ ७ ॥
प्राणेविण वदन। गळसरीविण अलंकरण॥
वायां गेलें सुंदरपण। कामिनीचें ॥ ८ ॥
शस्त्रपरिग्रही जाला। तो धैर्येविण वायां गेला॥
क्षत्री कुळवंतु भला। परंतु न शोभे ॥ ९ ॥
आपणां तेचि जो नेणे। तयाचे काय तें जाणणें॥
वर्णु नाहीं तें सोनें। मानी कवण ॥ १० ॥
षड्रस अन्न वोगरिलें। परि घालावें तें मुख न कळे॥
तेथें काय तेणे जालें। सार्थक कांहीं ॥ ११ ॥
म्हणोनि कांहीं न पुसे। आधीं स्वरूप जाण कैसें॥
मग पुसावें तें अनयासें। जाणसील तूंचि ॥ १२ ॥

ऐसें सद्‌गुरूचें वचन । शिष्यराजे करुनि श्रवण ॥
नमस्कारिले चरण । तया स्वामीचें ॥ १३ ॥

## १८. जुनाट पुरुषग्रंथ

श्रीराम समर्थ ॥ सकळ संत साधूजन । भूत भविष्य वर्तमान ॥
तया सकळांस नमन । साष्टांगभावें ॥ १ ॥
झालें सकळांस नमन । नमस्कारोन श्रोतेजन ॥
आतां कथानुसंधान । सावकाश ऐका ॥ २ ॥
जुनाट पुरुषाची कथा । नेमस्त मिळवी परमार्था ॥
जी समागमें महत्तीर्था । पाविजेत ॥ ३ ॥
पवनाचेनि तारूं । लंघोनि जाय सागरू ॥
श्रवणें तैसा विश्वंभरु । पाविजे तो ॥ ४ ॥
जाणिवेरहित ज्ञानी । तोचि योग्य निरूपणीं ॥
जैसा क्षुधित भोजनीं । तृप्त होय ॥ ५ ॥
बहुसाल व्युत्पत्ति झाली । कां बुद्धि क्षीण झाली ॥
तरी समाधानाची किल्ली । वेगळीच आहे ॥ ६ ॥
ती कैसी आहे सांगा स्वामी । ऐसा आक्षेप केला तुम्हीं ॥
सुचित होवोनि अंतर्यामी । ऐका सांगतों ॥ ७ ॥
नव्हे रेटमकहाणी । दाटून लावूं लावणी ॥
चंचळमनें श्रवणीं । बैसों नये ॥ ८ ॥
जें सावधास न कळे । तें चंचळा कैसें कळे ॥
ज्ञानेंसहित मावळे । विज्ञान जेथें ॥ ९ ॥
हातींचें रत्न जळीं गेलें । खडूळ होतां तें नाढळे ॥
निवांत जळ निवळे । तरीच लाभे ॥ १० ॥
तैसें शुद्ध निरूपण । एकाग्र करावें श्रवण ।
तेणें कारितां बाणे खूण । समाधानाची ॥ ११ ॥
होतां अद्वैत निरूपण । पडे देहाचें विस्मरण ॥
ऐसें एकाग्र लक्षण । श्रोतयांचें ॥ १२ ॥

वृत्ति स्वरूपीं भरे। आपोंआप विस्तारे॥
एक नसतां दुसरें। आठवेल कैंचें ॥ १३ ॥
जेव्हां आपुला ध्यास तुटे। आशंका मात्र तेव्हां फिटे॥
मग समाधान लिगटे। वळेंचि अंगीं ॥ १४ ॥
शब्द टाकोनि अंगीं। अर्थी धांवों लागे वेगीं॥
दृढ अर्थाचे संगीं। निःसंग होय ॥ १५ ॥
अहं सोहं आपण। याहीवेगळें मीपण॥
मीपण गेलिया खूण। समाधानाची ॥ १६ ॥
समूळ अहंता विराली। ही समाधानाची किल्ली॥
जेथें व्युत्पत्तिशीं निमाली। तीक्ष्ण बुद्धि ॥ १७ ॥
बुद्धि जाऊं न पवे जेथें। व्युत्पत्ति काय करी तेथें॥
सद्गुरुकृपेचें भातें। अंगीं रमलें पाहिजे ॥ १८ ॥
स्वरूपज्ञान जया झालें। त्याचें निर्मूळ नाहीं झालें॥
तोंवरी समाधान बारे। घडेना सर्वथा ॥ १९ ॥
असो हें बोलणें आतां। अवधान द्यावें श्रोतां॥
जुनाट पुरुषाची कथा। सांगिजेल ॥ २० ॥
सकळांचा महापुरुष। जो ब्रह्मादिकांचा ईश॥
शिवादिक असती अंश। तो हा अनामी ॥ २१ ॥
सकळ सृष्टीचा व्यापक। जो मूळमायेचा जनक॥
तो हा पुरुष कोणी एक। बहु दिवसांचा ॥ २२ ॥
जयाचे आज्ञेप्रमाणें। ब्रह्मादिकांस वर्तणें॥
चंद्र-सूर्य तारांगणीं। जयाची सत्ता ॥ २३ ॥
मही अचळ मेघमाळा। नाना सरिता सिंधुजळा॥
मर्यादा चाले अवलीळा। जयाचेनि ॥ २४ ॥
ऐशा ब्रह्मांडमाळा अनंत। इच्छामात्रें होत जात॥
तरी जयाचा एकान्त। मोडलाच नाहीं ॥ २५ ॥
आपण एकला सर्वकाळ। कन्या खेळे नाना खेळ॥
एकटी असे लडिवाळ। नाना छंद ॥ २६ ॥

तये गलबला नावडे । म्हणोनि खेळे एकीकडे ॥
ब्रह्मादिक केले वेडे । तये कुमारीनें ॥ २७ ॥

अनंत ब्रह्मांडें उतरंडीं । खेळ मांडिला परवडीं ॥
काळ करी कडाफोडी । पुत्र तयाचा ॥ २८ ॥

शीण पावे कुमारी । नावेक निद्रा करी ।
तेणें खेळा बाहेरीं । होवोनि जाय ॥ २९ ॥

कन्या परम सुलक्षण । राहीना पित्याविण ॥
पिता तयेचा निर्गुण । माता असेना ॥ ३० ॥

ते क्षणीं उठोनि पाहे । तों खेळ मोडिला आहे ॥
पुनरपि लवलाहे । खेळ मांडी ॥ ३१ ॥

ऐसी निरंजनीं एकट । करी खेळाची खटपट ॥
खेळ खेळता वीट । मानूं नेणे ॥ ३२ ॥

खेळ मांडिला विचित्र । उतरंडीचें एक पात्र ॥
तें हें ब्रह्मांड स्वतंत्र । जाणिजे तुवा ॥ ३३ ॥

खेळ खेळे महा सबळ । अत्यंत वाढली प्रबळ ॥
वेड लाविलें सकळ । प्राणिमात्रांसी ॥ ३४ ॥

नकळे तयेचें लाघव । बहुत पडिले मानव ॥
पात्रीं साठविले जीव । कोऱ्यानकोटी ॥ ३५ ॥

बहुत लोभाची आवडी । घातली इच्छेची बेडी ॥
ऐशा बहुत उतरंडी । संपूर्ण केले ॥ ३६ ॥

प्राणी जाऊं नेदी बाहेरी । जिववून मागुते मारी ॥
चुकों नेदी वेरझारी । वासनासूत्रें ॥ ३७ ॥

बहुत प्राणी केले गोळा । लाविला विषय टकळा ॥
तेण येती पूर्वस्थळा । स्वेच्छ प्राणी ॥ ३८ ॥

ऐसें गोविलेंच गोवी । मारून मागुता जन्म दावी ।
तयेपासून सोडवी । तो विरळा कोणी ॥ ३९ ॥

पळोन जावें दिगंतरा । तेथें आहे ते सुंदरा ॥
त्या सांगाती दुसरा । कोणीच नाहीं ॥ ४० ॥

संतान वाढलें लक्षावरी । तरी ते ठाईंची कुमारी ॥
नांव ठेवितां उदरीं । पिता आला ॥ ४१ ॥

पिता उदरास आला । तरी तो नाहीं जन्मला ॥
भर्ता स्वयें आपला । होवोनि ठेली ॥ ४२ ॥

भ्रतारास प्रसवली । मग ती माय राणी झाली ॥
सासू माता आपुली । आपणाचि ॥ ४३ ॥

वायु फुंकोन केला वन्ही । पोटीं लाविलें पाणी ॥
आपापासून धरणी । कळों आली ॥ ४४ ॥

ऐसी खेळास गुंतली । तेणें पिता विसरली ॥
ते पाउली मुरडली । मागुती मागे ॥ ४५ ॥

जन्मभूमी वास पाहे । बाप म्हणोनि आस वाहे ॥
मागुती निवांत राहे । स्तब्ध होवोनी ॥ ४६ ॥

पिता न दिसे डोळां । म्हणोनि शोक करी बाळा ॥
भोंवतीं पाहे वेळोवेळां । अष्ट दिशांतें ॥ ४७ ॥

वेध पित्याचा लागला । मग खेळ मोडोनि गेला ॥
उतरंडी फोडून पळाला । काळपुत्र ॥ ४८ ॥

पिता पाहतां खेळ मोडे । खेळ पाहतां पिता दडे ॥
पाहती झाली दोहींकडे । उभी राहोन ॥ ४९ ॥

मग ते लोभें झळंबली । पित्याकडे चालली ॥
खेळ विसरोन गेली । जन्मस्थाना ॥ ५० ॥

आपणा विसरोन पाहे । तंव पिता पुढें आहे ॥
ऐसें देखोन लवलाहें । भेटती जाली ॥ ५१ ॥

पिता तापसी जैसा वन्ही । तया निःसंगाची मिळणी ॥
कन्या नासली तत्क्षणीं । पित्या देखतां ॥ ५२ ॥

तंव पिता झळंबला । कंठ सद्गदित झाला ॥
म्हणे आज संग सोडला । कुमारीनें ॥ ५३ ॥

ऐसा नावेक वरी । विलाप पिता करी ॥
पाहे तंव अभ्यंतरी । कन्या उभी ॥ ५४ ॥

मग तयेसी भेटला । उभयतां आनंद झाला ॥
मागुता खेळ मांडला । तये कुमारीनें ॥ ५५ ॥

## १९. राजकारण

### – १ –

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें ॥
विवरलेंचि विवरावें । पुनः निरूपण ॥ १ ॥
तैसें आम्हास घडलें । बोलिलेंचि बोलणे पडलें ॥
कां जें बिघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान ॥ २ ॥
अनन्य राहे समुदाव । इतर जनास उमजे भाव ॥
ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ३ ॥
एक हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ॥
तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥ ४ ॥
चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप ॥
अन्याय थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावें ॥ ५ ॥
जाणावें पराचें अंतर । उदासीनता निरंतर ॥
नीति न्यायास अंतर । पडोंच न द्यावें ॥ ६ ॥
संकेतें लोक वेधावा । एकोनएक बोधावा ॥
प्रपंचहि सांवरावा । यथानुशक्त्या ॥ ७ ॥
प्रसंग समय वोळखावा । धीर बहुत असावा ॥
संबंध पडों न द्यावा । अति परिचयाचा ॥ ८ ॥
उपाधीस निस्तारावें । उपाधींत न सांपडावें ॥
नीचत्व पहिलेंच घ्यावें । आणि मूर्खपण ॥ ९ ॥
दोष देखोन झांकावे । अवगुण अखंड न बोलावे ॥
दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनी ॥ १० ॥
तऱ्हे भरोंच नय । सुचावे नाना उपाय ॥
नव्हे तेंचि करावें कार्य । दीर्घ प्रयत्नें ॥ ११ ॥

फड नासोंच न द्यावा । पडिला प्रसंग सांवरावा ॥
अतिवाद न करावा । कोणी एकासी ॥ १२ ॥

दुसऱ्याचें अभिष्ट जाणावें । बहुतांचें बहुत सोसावें ॥
न सोसे तरी जावें । दिगंतरासी ॥ १३ ॥

दुःख दुसऱ्याचें जाणावें । ऐकोन तरी वांटोन घ्यावें ॥
बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥ १४ ॥

अपार असावें पाठांतर । सन्निध असावा विचार ॥
सर्वदा सर्व तत्पर । परोपकारासी ॥ १५ ॥

शांति करून करवावी । तऱ्हें सांडून सांडवावी ॥
क्रिया करून करवावी । बहुतांकरवी ॥ १६ ॥

करणें असला अपाय । तरी बोलोन दाखऊं नय ॥
परस्परेंचि प्रत्यय । प्रचीतीस आणावा ॥ १७ ॥

जो बहुतांचें सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना ॥
बहुत सोसितां उरेना । महत्त्व आपुलें ॥ १८ ॥

राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच न द्यावें ॥
परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥ १९ ॥

लोक पारखून सोडावे । राजकारणें अभिमान झाडावे ॥
पुनः मेळवूनि घ्यावे । दुरील दोरे ॥ २० ॥

हिरवटासि दूरी धरावें । कचरटासि न बोलावें ॥
संबंध पडतां सोडूनि जावें । एकीकडे ॥ २१ ॥

ऐसें असें राजकारण । सांगतां तें असाधारण ॥
सुचित असतां अंतःकरण । राजकारण जाणिजे ॥ २२ ॥

वृक्षारूढास उचलावें । युद्धकर्त्यास ढकलून द्यावें ॥
कारभाराचें सांगावें । अंग कैसें ॥ २३ ॥

पाहतां तरी सांपडेना । कीर्ति करूं तरी राहेना ॥
आलें वैभव अभिलाषिना । कांहीं केल्या ॥ २४ ॥

एकाची पाठी राखणें । एकास देखों न शकणें ॥
ऐसी नव्हेत कीं लक्षणें । चातुर्याचीं ॥ २५ ॥

न्याय बोलतांहि मानेना । हित तेंचि नये मना ॥
येथें कांहींच चालेना । त्यागाविण ॥ ॥ २६ ॥
श्रोतीं कळोन आक्षेपिलें । म्हणोन बोलिलेंचि बोलिलें ॥
न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ २७ ॥
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके राजकारण-
निरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५ ॥

— २ —

श्रीगणेशाय नमः ॥ ज्ञानी आणि उदास । समुदायाचा हव्यास ॥
तेणें अखंड सावकाश । एकान्त सेवावा ॥ १ ॥
तेथें तजविजा कळती । अखंड चाळणा निघती ॥
प्राणिमात्रांची स्थिति गति । कळों येते ॥ २ ॥
जरी हा चाळणाच करीना । तरी कांहींच समजेना ॥
हिशेब झाडाचि पाहिना । दिवाळखोर ॥ ३ ॥
एक मिराशी साधिती । एक थित्या गमविती ॥
व्यापकपणाची स्थिति । ऐशी आहे ॥ ४ ॥
जेणें जें जें मनीं धरिलें । तें तें आधींच समजलें ॥
कृत्रिम अवघेचि खुंटलें । सहजचि येणें ॥ ५ ॥
अखंड राहतां सलगी होते । अतिपरिचयें अवज्ञा घडते ॥
याकारणें विश्रांतीतें । घेतां नये ॥ ६ ॥
आळसें आळस केला । तरी मग कारभाराचि बुडाला ॥
अंतरहेत चुकत गेला । समुदायाचा ॥ ७ ॥
उदंड उपासनेचीं कामें । लावित जावीं नित्यनेमें ॥
अवकाश कैचा कृत्रिम । करावयासी ॥ ८ ॥
चोर भांडारीं करावा । घसरतांच सांभाळावा ॥
गोवा मूर्खपणाचा काढावा । हळू हळू ॥ ९ ॥
ह्या अवघ्या पहिल्याच गोष्टी । प्राणी कोणी नव्हता कष्टी ॥
राजकारणें मंडळ वेष्टी । चहूंकडे ॥ १० ॥

नष्टासि नष्ट योजावें । वाचाळासि वाचाळ आणावें ॥
आपणावरी विकल्पाचे गांवे । पडोंच नेदी　　　　॥ ११ ॥

कांटीने कांटी झाडावी । झाडावी परी तें कळों न द्यावी ॥
कळकटपणाची पदवी । असों न द्यावी　　　　॥ १२ ॥

न कळतां करी कार्य जें जें । तें काम तात्काळाचि होतें ॥
गिचड्यांत पडतां तें । चमत्कार नव्हे　　　　॥ १३ ॥

ऐकोन आवडी लागावी । देखोनि बळकटचि व्हावी ॥
सलगीनें आपली पदवी । सेवकामध्यें　　　　॥ १४ ॥

कोणी एक काम करितां होतें । न करितां मागें पडतें ॥
याकारणें ढिलेपण । तें असोंचि नये　　　　॥ १५ ॥

जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ॥
जो आपणाचि कष्टत गेला । तोचि भला　　　　॥ १६ ॥

अवघ्यांस अवघें कळलें । तेव्हां तें रितें पडिलें ॥
याकारणें ऐसें घडलें । न पाहिजे कीं　　　　॥ १७ ॥

मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें ॥
कित्येक खल्लक उगवावें । राजकारणामध्यें　　　　॥ १८ ॥

बोलके पहिलवान कळकटे । तयासींच घ्यावे झटे ॥
दुर्जनें राजकारण दाटे । ऐसें न करावें　　　　॥ १९ ॥

ग्रामण्य वर्मीं सांपडावें । रगडून पीठचि करावें ॥
करून मागुती सांवरावें । बुडवूं नये　　　　॥ २० ॥

खळ दुर्जनासी भ्याले । राजकारण नाहीं राखिलें ॥
तेणें अवघें प्रकट झालें । बरेंवाईट　　　　॥ २१ ॥

समुदाय पाहिजे मोठा । तरी तणावा असावा बळकटा ॥
मठ करून ताठा । धरूं नये　　　　॥ २२ ॥

दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रकट न करावे ॥
सज्जनापरी आळवावे । महत्त्व देऊनी　　　　॥ २३ ॥

जनामध्यें दुर्जन प्रकट । तरी मग अखंड खटखट ॥
याकारणें ते वाट । बुझुनी टाकावी　　　　॥ २४ ॥

गलिमाच्या देखतां फौजा । रणशूराच्या फुर्फुरती भुजा ॥
ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी ॥ २५ ॥
तयास देखतां दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे ॥
बंड पाषांडाचे वाखे । सहजचि होती ॥ २६ ॥
हीं धूर्तपणाची कामें । राजकारण करावे नेमे ॥
ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ २७ ॥
कोठेंच पडेना दृष्टि । ठायीं ठायीं त्याच्या गोष्टी ॥
वाग्विलासें सकळ सृष्टि । वेधिली तेणें ॥ २८ ॥
हुंब्यासि हुंबा लावून द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा ॥
लौंदापुढें करावा । दुसरा लौंद ॥ २९ ॥
धटासी आणावा धट । उद्धटासि उद्धट ॥
खटनटासि खटनट । अगत्य करी ॥ ३० ॥
जैशासी तैसा जव्हां भेटे । तेव्हां मजालसी थाटे ॥
इतुके होते परी धनीं खोटें । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकोनविंशातिदशके
राजकारणनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९ ॥

## २०. महंतलक्षण

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ नेटकें ल्याहावें । लिहोन शुद्ध शोधावें ॥
शोधून शुद्ध वाचावें । चुकों नये ॥ १ ॥
विस्कळित मातृका नेमस्त कराव्या । धाट्या जाणोनि मद्द धराव्या ॥
रंग राखोन भराव्या । नाना कथा ॥ २ ॥
जाणायाचें मागतां नये । सांगायाचें नेमस्त नये ॥
समजल्याविण कांहींच नये । कोणी एक ॥ ३ ॥
हरिकथानिरूपण । नेमस्तपणें राजकारण ॥
वर्तायाचें लक्षण । तेंहि असावें ॥ ४ ॥
पुसों जाणे सांगों जाणे । अर्थांतर करूं जाणे ॥
सकळिकांचें राखों जाणे । समाधान ॥ ५ ॥

दीर्घसूचना आधींच कळे । सावधपणें तर्क प्रबळे ॥
जाण जाणोनि निवळे । यथायोग्य ॥ ६ ॥

ऐसा जाणे जो समस्त । तोचि महंत बुद्धिवंत ॥
यावेगळे अंतवंत । सकळ कांहीं ॥ ७ ॥

ताल वेळ तानमानें । प्रबंध कविता जाडवचनें ॥
मजालसी नाना चिन्हें । सुचती जया ॥ ८ ॥

जो एकांतास तत्पर । आधीं करी पाठांतर ॥
अथवा शोधी अर्थांतर । ग्रंथगर्भीचें ॥ ९ ॥

आधींच शिकोन जो शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी ॥
गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ १० ॥

अक्षर सुंदर वाचणें सुंदर । बोलणें सुंदर चालणें सुंदर ॥
भक्ति ज्ञान वैराग्य सुंदर । करूनि दावी ॥ ११ ॥

जयास प्रयत्नचि आवडे । नाना प्रसंगीं पवाडे ॥
धीटपणें प्रकटे, दडे । ऐसा नव्हे ॥ १२ ॥

सांकडीमध्यें वर्तो जाणे । उपाधीमध्यें मिळों जाणे ॥
अलिप्तपणें राखो जाणें । आपणासी ॥ १३ ॥

आहे तरी सर्वांठायीं । पाहो जातां कोठेंचि नाहीं ॥
जैसा अंतरात्मा ठायींच ठायीं । गुप्त जाहला ॥ १४ ॥

त्यावेगळें कांहींच नसे । पाहों जातां तो न दिसे ॥
न दिसोन वर्तवीतसे । प्राणिमात्रांसी ॥ १५ ॥

तैसाचि हाहि नानापरी । बहुत जनांसि शाहणे करी ॥
नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्मा ॥ १६ ॥

आपणाकरितां शाहणे होती । ते सहजाचि सोय धरिती ॥
जाणतेपणासी महती । ऐसी असे ॥ १७ ॥

राखों जाणे नीति न्याय । न करी न करवी अन्याय ॥
कठिण प्रसंगीं उपाय । करूं जाणे ॥ १८ ॥

ऐसा पुरुष धारणेचा । तोचि आधार बहुतांचा ॥
दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९ ॥

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे एकादशदशके महंत लक्षण-
निरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६ ॥

## २१ उत्तमपुरुष निदर्शन

श्रीगणेशाय नमः ॥ आपण यथेष्ट जेवणें । उरलें अन्न तें वाटणें ॥
परंतु वाया दवडणें । हा धर्म नव्हे ॥ १ ॥

तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तेचि ज्ञान जनास सांगावें ॥
तरतें न बुडों द्यावें । बुडतयासी ॥ २ ॥

उत्तम गुण स्वयें ध्यावे । ते बहुतांस सांगावे ॥
वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ॥ ३ ॥

स्नान संध्या देवतार्चन । एकत्र करावें जपध्यान ॥
हरिकथा निरूपण । केलें पाहिजे ॥ ४ ॥

शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें ॥
उणें पडों न द्यावें । कोणी एकाचें ॥ ५ ॥

अडलें गांजलें जाणावें । यथाशक्ति कामास यावें ॥
मृदुवचनें बोलत जावें । कोणी एकासी ॥ ६ ॥

दुसऱ्याचे दुःखें दुःखी व्हावें । परसंतोषें सुखी व्हावें ॥
प्राणिमात्रास मेळवून घ्यावें । बऱ्या शब्दें ॥ ७ ॥

बहुतांचे अन्याय क्षमावे । बहुतांचे कार्यभाग करावे ॥
आपल्यापरी व्हावे । पारिखे जन ॥ ८ ॥

दुसऱ्याचें अंतर जाणावें । तदनुसारचि वर्तावें ॥
लोकांस परीक्षीत जावें । नाना प्रकारें ॥ ९ ॥

नेमकेंचि बोलावें । तात्काळचि प्रतिवचन द्यावें ॥
कदापि रागासि न यावें । क्षमारूपें ॥ १० ॥

आळस अवघाच दवडावा । यत्न उदंडचि करावा ॥
शब्दमत्सर न करावा । कोणी एकाचा ॥ ११ ॥

उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा । शब्द निवडून बोलावा ॥
सावधपणें करीत जावा । संसार आपुला ॥ १२ ॥

मरणाचें स्मरण असावें । हरिभक्तीसि सादर व्हावें ॥
मरोन कीर्तीस उरवावें । येणे प्रकारें ॥ १३ ॥

नेमकपणें वर्तो लागला । तो बहुतांस कळों आला ॥
सर्व आर्जवी तयाला । काय उणें ॥ १४ ॥

ऐसा उत्तमगुणीं विशेष । तयास म्हणावें पुरुष ॥
जयाच्या भजनें जगदीश । तृप्त होय ॥ १५ ॥

उद्दंड धिक्कारून बोलती । तरी चळों न द्यावी शांति ॥
दुर्जनासि मिळोन जाती । धन्य ते साधू ॥ १६ ॥

उत्तम गुणीं शृंगारिला । ज्ञानें वैराग्यें शोभला ॥
तोचि एक जाणावा भला । भूमंडळीं ॥ १७ ॥

स्वयें आपण कष्टावें । बहुतांचें सोशीत जावें ॥
झिजोन कीर्तीस उरवावें । नाना प्रकारें ॥ १८ ॥

कीर्ती पाहूं जातां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ती नाहीं ॥
विचारेंविण कोठेंचि नाहीं । समाधान ॥ १९ ॥

परांतरास न लावावा ढका । कदापि पडों न द्याव्या चुका ॥
क्षमाशील तयाचा तुका । हानि नाहीं ॥ २० ॥

आपलें अथवा परावें । कार्य अवघेंचि करावें ॥
प्रसंगीं कामास चुकावें । हें विहित नव्हे ॥ २१ ॥

बरें बोलतां सुख वाटतें । हें तों प्रत्यक्ष कळतें ॥
आत्मवत् परावें तें । मानीत जावें ॥ २२ ॥

कठिण शब्दें वाईट वाटतें । हें तों प्रत्ययास येतें ॥
तरी मग वाईट बोलावें तें । काय निमित्त ॥ २३ ॥

आपणास चिमोटा घेतला । तेणें कासावीस झाला ॥
आपणावरून दुसऱ्याला । राखीत जावें ॥ २४ ॥

जें दुसऱ्यास दुःख करी । तें अपवित्र वैखरी ॥
आपणास घात करी । कोणी एके प्रसंगीं ॥ २५ ॥

पेरिलें तें उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें ॥
तरी मग कर्कश बोलावें तें । काय निमित्त ॥ २६ ॥

आपल्या पुरुषार्थवैभवें । बहुतांस सुखी करावें ॥
परंतु कष्टी करावें । हें राक्षसी क्रिया ॥ २७ ॥

दंभ दर्प अभिमान । क्रोध आणि कठिण वचन ॥
हें अज्ञानाचे लक्षण । भगवद्गीतेंत बोलिलें ॥ २८ ॥

जो उत्तमगुणें शोभला । तोचि पुरुष महा भला ॥
कित्येक लोक तयाला । शोधित फिरती ॥ २९ ॥

क्रियेविण शब्दज्ञान । तेंचि श्वानाचें वमन ॥
भले तेथें अवलोकन । कदापि न करिती ॥ ३० ॥

मनापासून भक्ति करणें । उत्तम गुण अगत्य धरणें ॥
तया महापुरुषाकारणें । धुंडित येती ॥ ३१ ॥

ऐसा जो महानुभाव । तेणें करावा समुदाव ॥
भक्तियोगें देवाधिदेव । आपला करावा ॥ ३२ ॥

आपण अवचितें मरोन जावें । मग भजन कोणें करावें ॥
याकारणें भजनास लावावें । बहुत लोक ॥ ३३ ॥

आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मागावें शिष्यासी ॥
आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥ ३४ ॥

याकारणें समुदाव । झाला पाहिजे महोत्साव ॥
हातोपाती देवाधिदेव । वोळेसा करावा ॥ ३५ ॥

आतां समुदायाकारणें । पाहिजेत दोनी लक्षणें ॥
श्रोतीं येथे सावधपणें । मन घालावें ॥ ३६ ॥

जेणें बहुतांस घडे भक्ति । ते हे रोकडी प्रबोधशक्ति ॥
बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे ॥ ३७ ॥

मागां बोलिले उत्तम गुण । तयांस मानिती प्रमाण ॥
प्रबोधशक्तीचें लक्षण । पुढें चालें ॥ ३८ ॥

बोलण्यासारखें चालणें । स्वयें करून बोलणें ॥
तयांचीं वचनें प्रमाणें । मानिती जनीं ॥ ३९ ॥

जें जें जनासी मानेना । तें तें जनहि मानेना ॥
आपण एकला जन नाना । सृष्टीमध्यें ॥ ४० ॥

म्हणोनी सांगातीं असावें । मानत मानत शिकवावें ॥
हळू हळू शेवटा न्यावें । विवेकानें ॥ ४१ ॥
परंतु हीं विवेकाचीं कामें । विवेकी करील नेमें ॥
इतर ते बापुडें भ्रमें । भांटोंच लागले ॥ ४२ ॥
बहुतांसि भांडतां एकला । सैन्यावांचून पुरवला ॥
याकारणें बहुतांला । राजी राखावें ॥ ४३ ॥
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उत्तमपुरुषनिदर्शननिरूपणं नाम दशमः समासः ॥ १० ॥

## २२. निःस्पृहलक्षण

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ पृथ्वीमध्यें मानवी शरीरें । उदंड दाटलीं लहान थोरें ॥ पालटती मनोविकारें । क्षणक्षणां ॥ १ ॥
जितुक्या मूर्ति तितुक्या प्रकृती । सारिख्याच नसती आदि अंतीं ॥
नेमचि नाहीं पाहावे किती । काय म्हणोनि ॥ २ ॥
कित्येक म्लेंछ होऊन गेले । कित्येक फिरंगणांत आटले ॥
देशभापेनें रोधिले । कितीएक ॥ ३ ॥
महाराष्ट्रदेश थोडा उरला । राजकारणें लोक रोधिला ॥
अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ ४ ॥
कित्येक युद्धप्रसंगीं गुंतले । तेणे गुणें उन्मत्त झाले ॥
रात्रंदिवस करूं लागले । युद्धचर्चा ॥ ५ ॥
उदम्यास व्यासंग लागला । अवकाश नाहींसा झाला ॥
अथवा पोटधंदा लागला । निरंतर ॥ ६ ॥
षट्दर्शनें नाना मतें । पापांडें उठलीं बहुतें ॥
पृथ्वीमध्यें जेथें जेथें । उपदेशिती ॥ ७ ॥
स्मार्तीं आणि वैष्णवीं । उरली सुरली नेलीं अवघीं ॥
ऐसा पाहतां गथागोवी । उदंड जाल्ली ॥ ८ ॥
कित्येक कामनेचे भक्त । ठायी ठायीं झाले आसक्त ॥
युक्त अथवा अयुक्त । पाहतो कोण ॥ ९ ॥

या गलबल्यामध्यें गलबला। कोणीं कोणीं वाढविला ॥
त्यास देखों शकेनासा झाला। वैदिक लोक ॥ १० ॥
त्यांहीमध्यें हरिकीर्तन। तेथें वोढले कित्येक जन ॥
त्या प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान। कोण पाहे ॥ ११ ॥
याकारणें ज्ञान दुर्लभ। पुण्यें घडे अलभ्य लाभ ॥
विचारवंता सुलभ। सर्व कांहीं ॥ १२ ॥
विचार कळला सांगतां नये। उदंड येती अंतरायें ॥
उपाय योजितां अपाये। आडवे येती ॥ १३ ॥
त्यांहीमध्यें जो तीक्ष्ण। रिकामा जाऊं नेदी क्षण ॥
धूर्त तार्किक विचक्षण। सकळांस मानें ॥ १४ ॥
नाना जिन्नस उदंड पाठ। वदों लागले घडघडाट ॥
अव्हाटांची केली वाट। सामर्थ्यबळें ॥ १५ ॥
प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें। जाणे सकळांचीं अंतरें ॥
निरूपणें तदनंतरें। चटक लागे ॥ १६ ॥
मतें मतांतरें सगट। प्रत्यय बोलोन करी सपाट ॥
दंडक सांडून नीट। वेधी जनां ॥ १७ ॥
नेमकें भेदकें वचनें। अखंड पाहे प्रसंगमानें ॥
उदासवृत्तीच्या गुमानें। उठोन जातो ॥ १८ ॥
प्रत्यय बोलोन उठोन गेला। चटक लागली लोकांला ॥
नाना मार्ग सांडून त्याला। शरण येती ॥ १९ ॥
परी तो कोठें आढळेना। कोणे स्थळीं सांपडेना ॥
वेष पाहतां हीनादीना। सारिखा दिसे ॥ २० ॥
उदंड करी गुप्तरूपें। भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ॥
तेथें यश कीर्ति प्रतापें। सीमा सांडिली ॥ २१ ॥
ठायीं ठायीं भजन लावी। आपण तेथून चुकवी।
मत्सरमताची गोवी। लागों नेदी ॥ २२ ॥
खनाळामध्यें जाऊन राहे। तेथें कोणीच न पाहे ॥
सर्वत्रांची चिंता वाहे। सर्वकाळ ॥ २३ ॥

अवघडस्थळीं कठिण लोक । तेथें राहणें नेमक ॥
सृष्टीमध्यें सकळ लोक । धुंडित येती ॥ २४ ॥
तेथें कोणाचें चालेना । अणुमात्र अनुमानेना ॥
कट घालून राजकारणा । लोक लावी ॥ २५ ॥
लोकीं लोक वाढविले । तेणे अमर्याद झाले ॥
भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६ ॥
ठायीं ठायीं उदंड तांबे । मनुष्यमात्र तितुकें झोंबे ।
चहूंकडे उदंड लांबे । परमार्थबुद्धि ॥ २७ ॥
उपासनेचा गजर । स्थळोस्थळीं थोर थोर ॥
प्रत्ययानें प्राणिमात्र । सोडविले ॥ २८ ॥
ऐसें कैवाड उदंड जाणे । तेणें लोक होती शाहणे ॥
जेथें जेथें प्रत्यय बाणे । प्राणिमात्रासी ॥ २९ ॥
ऐशी कीर्ति करून जावें । तरीच संसारास यावें ॥
दास म्हणे हें स्वभावें । संकेतें बोलिलें ॥ ३० ॥

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचदशदशके निस्पृहलक्षण-
निरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २ ॥

## २३. मंगलाचरण

जय जय भगवन् वासुदेव । जय जय श्रीदेवाधिदेव ॥
जय जय यदुदेव वासुदेव । अर्जुनगुरो ! ॥ १ ॥
जय जय जी ! भगवंता । ऐश्वर्यज्ञानवैराग्यवंता ! ॥
धर्मयश श्रीमंता ! । षड्गुणा ! ॥ २ ॥
तूं गुणातीत निर्गुण । तूंचि सगुण तूंचि त्रिगुण ॥
तूंचि तुझे षड्गुण । तूं प्रत्यक्षीं अपरोक्ष ॥ ३ ॥
इंद्रियें आणि इंद्रियगम्य । तूंचि जो इंद्रियां अगम्य ॥
तोचि तूं ध्येय रम्य । शेषशायी ॥ ४ ॥
तूं निर्गुण अनिर्वाच्य । तोचि तूं षड्गुणत्वें वाच्य ॥
वाच्य तितकें अवाच्य । ठाव नुरतां वाचेसि ॥ ५ ॥

तुझें ऐश्वर्य तूंचि । ऐश्वर्यशक्ति ही दुजी कैंची ? ॥
अवघी सत्ताचि साची । घट मृत्पिंड ही मृत्तिका ॥ ६ ॥

परी षड्गुणांचें विवरण । करितां दिसे कार्यकारण ॥
षड्गुणत्वें षड्विधपण । तें भगवद्रूप जग हेंचि ॥ ७ ॥

जी ! श्रीसच्चिदानंदगुरु ! । जें जें वदलासि कल्पतरू ॥
निर्गुण सुवर्ण सगुण मेरू । तो भेटलासि यतिरूपें ॥ ८ ॥

तूं श्रीगुरु चिद्घन । भगवद्गीता तुझें वचन ॥
प्रत्यक्षीं षड्गुणज्ञान । व्याख्यान तेंचि गीतेचें ॥ ९ ॥

प्रत्यक्ष तुझे साही गुण । पाहे तोचि भक्त निपुण ॥
आत्मा भगवंत ऐशी खूण । तो अनुभवी गीतेचा ॥ १० ॥

ऐश्वर्य म्हणिजे समर्थपण । कीं अघटित तेंही घडवणें ॥
विश्व नसोनि मिरवणें । हें ऐश्वर्य ॥ ११ ॥

तूं तंतु विश्वपट । तूं मृत्तिका विश्वघट ॥
ऐश्वर्य तेव्हां निपट । चराचराचि प्रत्यक्ष ॥ १२ ॥

विश्वपटीं जो तंतू । तो निजात्मा प्रकाशहेतू ॥
भक्त भागवत भगवंत तूं । भेद कोठूनि आणावा ? ॥ १३ ॥

एवं जगाचि ऐश्वर्य जैसें । जगाचि तुझें ज्ञान तैसें ॥
एथेंही द्वैत तें कैसें ? । सांपडलें अणुमात्र ॥ १४ ॥

तूं सुवर्ण विश्व नग । निर्गुणत्वीं हा विश्वयोग ॥
परी तूं न कल्पिसी जग । तों हे रचना घडेना ॥ १५ ॥

अधिष्ठान नेणे विवर्ता । तुज निर्गुणत्वीं न प्रपंचवार्ता ॥
तोचि सर्वसाक्षी विश्वभर्ता । जाणूनि कल्पिसी सर्वज्ञा ! ॥ १६ ॥

श्रुति बोलती सर्व । कीं धाता कल्पी यथापूर्व ॥
सांख्य निरीश्वर त्यांचा गर्व । एथें हरे ॥ १७ ॥

जाणोनि कल्पिजे नगर । कल्पना तुझी चराचर ॥
जन्मादि साही विकार । कल्पना तुझी साक्षित्वें ॥ १८ ॥

भूत भविष्य वर्तमान । हें कल्पका सर्वज्ञाचें ज्ञान ॥
तेव्हां विश्वरूपेंचि ध्यान । जगत्कल्पकाच्या ज्ञानाचें ॥ १९ ॥

वृत्तिरूप ज्ञान जग । निर्धर्मज्ञानीं त्याच्या संयोग ॥
अधिष्ठान कनकीं विवर्त नग । दोन्ही रूपें हेमाचीं ॥ २० ॥
जरी अलंकाररूप । तरी सुवर्णाचें तें स्वस्वरूप ॥
दृष्टीस थिजलें विघरलें तूप । रसनेस रस एकचि ॥ २१ ॥
एवं ज्ञान दुसरा गुण । तोहि जगचि देखे निपुण ॥
ज्यास जगदात्मत्वाची खूण । बाणे दृढ ॥ २२ ॥
विश्व नसोनि दावी । हे ऐश्वर्यशक्ति तुझी वदावी ॥
त्याची सिद्धि अनुभवी । या ज्ञानगुणेंचि देखती ॥ २३ ॥
प्राकृत नरें ही केली कल्पना । परी देहप्रारब्धाचा साचा मना ॥
वाटे तुज तो असेना । तो देह तुझा कल्पिसी ॥ २४ ॥
'पुरुष एवेदं सर्वं' असें । वेद बोले याचि रसें ॥
मंगलाचरण मिसें । गुह्य अनुभवही बोलतों ॥ २५ ॥

## २४. यथार्थदीपिकासमर्थन

आरंभीं ज्ञान सगुण । ज्ञानी सगुण भक्तांमध्यें वर्णिले निपुण ॥
अंतीं सगुण भक्तीची खूण । सर्वोत्कर्षे या अध्यायांत बोलिली ॥ १ ॥
ऐसा अध्याय सप्तम । आणि या सातांत जो सप्तम ॥
तो पुरुषार्थ याकरितां उत्तम । कीं भक्ति हातींची नव जाय ॥ २ ॥
ज्ञान असोनि अनुरक्ती । श्रीकृष्णचरणीं हे भक्ती ॥
अत्यंत थोर चारी मुक्ती । ओवाळिल्या इजवरोनी ॥ ३ ॥
सकळां उपनिषदांचें सार । हे गीता हरी दुःखसंसार ॥
ते वाखाणितां मूलानुसार । भक्तिसम कांहीं तुकेना ॥ ४ ॥
जो स्वयें गीताकार । तोचि स्वयें टीकाकार ॥
भगवत्सुवर्ण वामन आकार । विकार नसे सुवर्णत्वीं ॥ ५ ॥
तथापि कांहीं तो जरी न करी । सर्व सम अकर्ता परी ॥
भक्ति करिती ते तों हरी । करी प्रार्थिला कल्पवृक्ष ॥ ६ ॥
जो मागे जें फळ । कल्पवृक्ष दे तेंचि केवळ ॥
गीता केली तैसा प्रांजळ । अर्थ करीं ह्मणतां करीतसे ॥ ७ ॥

ज्यांस अनन्य शरणागती । ते हेंचि या कल्पवृक्षा मागती ॥
म्हणोनि यथार्थ अनुसंधानगती । तोचि ऐशा करीतसे ॥ ८ ॥

कीं नसे देवतांतराची भीड । अथवा कांहीं फळाची चाड ॥
कीं अभक्तास वाटेल अवघड । हेही शंका असेना ॥ ९ ॥

टीका उदंड जाल्या । परी देवतांस तदुपासकास भ्याल्या ॥
यथार्थ अर्थ नाहीं बोलिल्या । तैसी नव्हे हे टीका ॥ १० ॥

म्हणोनि ' यथार्थदीपिका ' । नांव पावली हे टीका ॥
कीं अद्वैत आणि भजावें एका । श्रीवत्सांका जगद्गुरूतें ॥ ११ ॥

विघ्न न हो म्हणोनी । आरंभीं देवा एका प्रार्थुनी ॥
स्फूर्ती देईल हे इच्छा धरोनी । प्रार्थना एका आणिकाची ॥ १२ ॥

टीका ऐसी आरंभते । आणि भक्ति अव्यभिचारिणी बोलिजेते ॥
आणि पदोपदीं निषेधिजेते । उपासना अन्य देवतांची ॥ १३ ॥

त्यांचें परोपदेशपांडित्य । गीताच प्रकट करिते सत्य ॥
कीं टीकेंत बोलणें लागे अगत्य । तुच्छत्व इतर देवताभजनाचें ॥ १४ ॥

आणि जेथें गहन अर्थ । तेथें घडेना यथार्थ ॥
जरी मानिती कृतार्थ । टीका आपुली ॥ १५ ॥

' अन्तवत्तु फलं तेषां ' म्हणोनी । याच अध्यायांत या श्लोकेंकरोनी ॥
जें बोलिलें तें येतें दिसोनी । तुच्छफळप्रदत्व त्यांतें ॥ १६ ॥

कीं टीका निर्विघ्न जाली । आणि रचनास्फूर्तीहि आली ॥
तथापि होऊनि आली । ते विरुद्ध मुळासी ॥ १७ ॥

इतरदेवताभजन । टीकेंत निषेधिती महाजन ॥
आणि आरंभीं करिती नमन । त्या इतर देवांतें ॥ १८ ॥

वाखाणावी गीता । तिहीं आदि अंतीं एका अनंता ॥
वंदावें, मध्यें ज्या भगवंता । मुख्य सेव्यत्वें वर्णावें ॥ १९ ॥

त्यांस सर्वही ब्रह्म दिसे । म्हणोनी त्या देवां वंदिती ऐसें ॥
ऐसें म्हणावें तर ह्मणतसे । कृष्ण काय गीतेंत ? ॥ २० ॥

सर्व मी सर्व माझे उपासक । परी तें भजन अविधिपूर्वक ॥
उपास्यदैवत मीच एक । इतरें पहावींच मद्भावें ॥ २१ ॥

ब्रह्म जरी विघ्नांचाच हर्ता । तरी म्हैसासूर काय परता ? ॥
अद्वैताश्रयें या वार्ता । फोल अवघिया ॥ २२ ॥
असो तें, हे टीका शेषशयन । स्वयें करी आकर्ण नयन ॥
गीताटीका तो आणि वामन । भिन्न अणुही न दिसती ॥ २३ ॥
आत्मत्वें भजतां तया । त्या जगदात्मयाची होतां दया ॥
हात जोडिती सर्व देवता या । परि कोण पाहे त्यांकडे ? ॥ २४ ॥
कोणाची नसे भीड । आणि कोणाची नसे चाड ॥
अनन्यभाक्ति लागतां गोड । या भगद्गीतेंत ये रीती ॥ २५ ॥
वाचोत जे वाचिती । न वाचो जे वाईट मानिती ॥
संतुष्ट होय एक जगत्पती । या यथार्थनिरूपणें ॥ २६ ॥
जे अनुभवी आणि भक्त । जे इतर फळीं विरक्त ॥
आणि जे समजती युक्तायुक्त । ते क्षणही न सोडिती हे टीका ॥ २७ ॥
भ्रमरा कमळें प्रार्थावें । कीं चकोरा चंद्रें आमंत्रण द्यावें ॥
कीं मयूरास मूळ पाठवावें । धाराधरीं ॥ २८ ॥
चंद्र नावडे तस्करा । म्हणोनि वीट येना चकोरा ॥
कुमुदें लाजती भास्करा । म्हणोनि कमळें मुख न झांकिती ॥ २९ ॥
जगद्वंद्य श्रीमद्भागवत । तेथें अप्रीति धरिती कुश्चित ॥
अभक्त आणि कुमार्गरत । त्यांस तैसी हे टीका ॥ ३० ॥
बौद्धीं वेद दूषिले । तरी काय ते वाया गेले ? ॥
स्वहिततत्पर रसज्ञ भले । तेच वाचिती हे टीका ॥ ३१ ॥
असो तें; आतां अर्जुनरथाचे ठायीं । जो गीता उपदेशितो शेषशायी ॥
प्रतिपदीं अर्पिली त्याच्या पायीं । हे 'यथार्थदीपिका' वामन म्हणे ॥ ३२ ॥

..........

# ३ : आख्यानक काव्य

## २५. रुक्मीचें भाषण

कृष्णासीं शरीरसंबंध । हा तंव बोलचि अबद्ध ॥
वडीलपणें घेतला छंद । बुद्धिमंद म्हातारा ॥ १ ॥
कृष्णासी सोयरीक नये कामा । हें काय कळलें नाहीं तुम्हां ॥
सखा मारिला अहं-मामा । तो काय आम्हां धड होईल ॥ २ ॥
एक म्हणती नंदाचा । एक म्हणती वसुदेवाचा ॥
ठावा नाहीं बापाचा । अकुळी साचा श्रीकृष्ण ॥ ३ ॥
मुळींच नाहीं जन्मपत्र । कवणे जाणे कुळगोत्र ॥
कृष्ण नव्हे जी स्वतंत्र । भक्तपरतंत्र सदांचा ॥ ४ ॥
कर्म पाहतां परद्वारी । गोरसाची करी चोरी ॥
धरितां न धरवे निर्धारीं । चोरटा हरी चित्ताचा ॥ ५ ॥
गाईपाठीं धांवतां । पळूं शिकला तो तत्त्वतां ॥
काळ्यवनापुढें पळतां । झाला रक्षिता मुचकुंद ॥ ६ ॥
कृष्ण वीर नव्हे गाढा । पळाला जरासंधापुढां ॥
भेणें समुद्राचिया अगडा-। माजी दुर्ग वसविलें ॥ ७ ॥

केशिया मारिलें तट्टू । बैल मारिला रिष्टू ॥
इतुकियासाठीं वीर बाट्टू । केवीं सुभट्टू म्हणावा ॥ ८ ॥
मारिलें वत्सासुर वासरूं । बगासुर तें पांखरूं ॥
किरडू मारिलें अघासुरू । इतुकेनि वीरु केंवि होय ॥ ९ ॥
कृष्णासी उघड नाहीं वर्तणें । सदा संसारीं लपणें ॥
त्याची मी जाणें विंदाणें । लपतीं स्थानें तीं ऐका ॥ १० ॥
चढे वैकुण्ठींचे पाहाडीं । क्षीरसागरीं देतसे बुडी ॥
शेषाचिये फणें दडी । मिषें निद्रेचेनि राहे ॥ ११ ॥
विघ्नें देखोनियां थोर । होय मत्स्य कीं सूकर ॥
नातरी पाठी करोनि निबर । रूप धरी कमठाचें ॥ १२ ॥
दैत्य देखोनियां भारी । खांबामाजीं गुरगुरी ॥
बळें काढिलिया बाहेरी । नारसिंह होऊनि ठेला ॥ १३ ॥
दैत्य देखोनियां सबळ । जाहला भिकारी केवळ ॥
बळीनें केला द्वारपाळ । गळां बांधोनि द्वारासी ॥ १४ ॥
सर्वेचि खुजटपण सांडलें । रूप आणिकची मांडिलें ॥
दैत्य फळकट काढिलें । मजूर जाहलें मायेचें ॥ १५ ॥
राखतां इंद्राची गाय । दैत्यें मारिली माय ॥
रडे ये माय ये माय । सांगूं काय तयाचें ॥ १६ ॥
थोर मांडिलें सांकडें । तैं मेळविलीं माकडें ॥
आतांचि पहा रोकडें । गोवाळियांपुढें नाचतसे ॥ १७ ॥
कृष्णाची आणीक कहाणी । तो स्त्री जाहला मोहिनी ॥
सुरां असुरां ठकवूनी । महादेव मोहिला ॥ १८ ॥
शेवीं जाहला म्हाळसा । वास केला त्या निवासा ॥
त्याचेनि धर्मे राहू कैसा । रविचंद्रासी लागला ॥ १९ ॥
कृष्णासी नाहीं रूप गुण । न देखों एका देशीं स्थान ॥
तयासी कैचें सिंहासन । वृत्तिशून्य वर्ततसे ॥ २० ॥
कृष्णासी नाहीं देहाभिमान । कदा नेणें मानापमान ॥
तयाचें गांठीं कैचें धन । भाजीचें पान खातसे ॥ २१ ॥

कृष्णाचा भाव एक । नव्हे स्त्री पुरुष ना नपुंसक ॥
पाहतां निश्चयो एक । नव्हे निष्टंक निर्धारें ॥ २२ ॥

तयाशीं माया दोन पाहीं । दोघी वर्तती दो ठायीं ॥
एक देही एक विदेही । देवकी आणि यशोदा ॥ २३ ॥

एकी स्वबोध उपजविती । दुजी वाढवी विषयप्रीति ॥
दोघी सांडून तळमळती । धर्माप्रती धाविन्नला ॥ २४ ॥

उच्छिष्ट काढी धर्माघरीं । ब्राह्मणाची भीड थोरी ॥
लाथ हाणितली उरावरी । तें पद मिरवी निलाजरा ॥ २५ ॥

तया कृष्णासी सोयरीक करणें । तेंचि आम्हां विटंबवाणें ॥
संसारीं मुख केंवि दाखविणें । लाजिरवाणें लोकांत ॥ २६ ॥

तयासी द्यावें जी भावंड ॥ तैं आमुचें काळें तोंड ॥
या बोलासी म्हणाल पाखंड । तरी ज्ञाते उदंड तुम्हापाशीं ॥२७॥

कृष्ण अतीत चहूं वाचा । तेथ वाङ्‌निश्चयो घडे कैंचा ॥
शब्द निश्चयो नव्हे साचा । सत्य वाचा हे माझी ॥ २८ ॥

बोला भाकें जो सांपडे । तयासीच वाग्निश्चयो घडे ॥
हें तर अवघेंचि कुडें । जाणत वेडे कां होतां ॥ २९ ॥

कुळकर्माचा अंतू । आपणासकट सकळांचा घातू ॥
करणें असेल जीवांतू । तरी कृष्णनाथू वरावा ॥ ३० ॥

## २६. रुक्मिणीवर्णन

नाहीं स्रष्टयानें स्रजिली । कृष्णप्रभावें रूपा आली ॥
बरवेंपणा सीग चढली । साकारली सौंदर्यें ॥ १ ॥

गगन शून्यत्वा उबगलें । कृष्णभेटीसी उदित जाहलें ॥
भीमकी मस्तकासी आलें । नीलालकीं शोभत ॥ २ ॥

मस्तकींचे नील कुंतल । तेंचि नभ अतिसुनीळ ॥
तळीं मुखचंद्र निर्मळ । भीमकी मुखें उगवला ॥ ३ ॥

चंद्र क्षीण कृष्णपक्षीं । म्हणे हा पूर्वील माझा बंधु कीं ॥
म्हणूनी कळवळली भीमकी । निजमुखीं धरियेला ॥ ४ ॥

भीमकी मुख निष्कळंक । क्षयातीत पूर्ण शशांक ॥
कृष्णप्राप्तीसी सम्यक । भीमकी मुखीं उगवला ॥ ५ ॥
चंद्र संपूर्ण पौर्णिमा एकीं । येरवीं क्षयवृद्धी त्या लोकीं ॥
तो सदा संपूर्ण भीमकीमुखीं । निजात्मसुखीं परिपूर्ण ॥ ६ ॥
चंद्रमंडळा मागें पुढें । जैसे तारांगणाचे वेढे ॥
तैशीं मोतिलग तानवडें । दोहींकडे तळपती ॥ ७ ॥
श्रीकृष्णवेधें वेधली खरी । म्हणउनी विसरली ते भोंवरी ॥
भोंवरी कृष्णमाये करी । ये अवसरीं ते नाहीं ॥ ८ ॥
भोंवरी नसतां पक्षपाती । पंखे दोहींकडे झळकती ॥
भोंवरियाभागीं मिरवती । भेटी होईल निजकर्णीं ॥ ९ ॥
भीमकी थोर कपाळाची । कृष्णदैवें ते दैवाची ॥
निढळीं प्रभा श्यामतेची । तोचि कस्तूरी मळवट ॥ १० ॥
चंद्रबिंबीं श्यामरेखा । तैसा भाळीं मळवट देखा ॥
भोंवया रेखिल्या कृष्णरेखा । अतिसुरेखा व्यंकटा ॥ ११ ॥
कृष्ण पाहावया जगजेठी । भोंवई सांडिली व्यंकटी ॥
कृष्णीं मीनलिया दिठी । सहज गांठी सुटेल ॥ १२ ॥
श्रीकृष्ण रंगे सुरंग । अहेवपण तिचें अभंग ॥
तेंचि कुंकुम पैं चांग । मुखचंद्रीं चंद्रमा ॥ १३ ॥
नभीं इंद्रधनुष्य रेखा । तैसा भांगीं शेंदूर देखा ॥
भुलवावया यदुनायका । मोहिनी मुखा पूजियेलें ॥ १४ ॥
ना ते सरस्वती वोघीं । आली कृष्णभेटीलागीं ॥
जीव शिव हांसळिया दोहीं भागीं । मुक्तलगीं तटस्थ ॥ १५ ॥
जैसी नक्षत्रें नभमंडळीं । तैसी मुक्त मोतियांची जाळी ॥
लेइलीसे भीमकबाळी । तेणें वेल्हाळी शोभत ॥ १६ ॥
त्याहीवरी भक्तिफरा । झळकतसे नवरत्नांचा खरा ॥
खुणावीतसे सुरनरां । भजा यदुवीरा निजभावें ॥ १७ ॥
दृश्य देखतां शिणले नयन । धणीचें घ्यावया कृष्णदर्शन ॥
एकत्र होउनी देखणेपण । भीमकीलोचना पैं आले ॥ १८ ॥

पाहावया घनसांवळा । कृष्णश्यामता आली बुबुळां ॥
आसावली दोहीं डोळां । सबाह्य देखणें समदृष्टीं ॥ १९ ॥

कृष्ण देखावया निधान । नयनीं सूदलें अंजन ॥
सोगयाचें सळंबपण । कटाक्षबाण पिसारे ॥ २० ॥

भीमकी कटाक्षाच्या घाईं । मदन पाडिला ठायींच्या ठायीं ॥
सुरनरांचा पाड कायी । निधडा पाहीं श्रीकृष्ण ॥ २१ ॥

मुखा मुख्य शोभनिक । श्लेष्मागमनें शिणलें नाक ॥
तो भीमकी मुखा येउनि देख । नाका बीक पैं चढलें ॥ २२ ॥

कृष्ण सुवास आवडी । तेणें नासिकेसि आली गोडी ॥
दोहीं नाकपुडियांबुडीं । दिधली बुडी वसंतें ॥ २३ ॥

अधर दोन्ही जाले सधर । बिंबफळरंगाकार ॥
ते तंव परिपाकें नश्वर । हे अनश्वर हरिरंगें ॥ २४ ॥

भीमकी अधरामृतगोडी । श्रीकृष्णाची जाणे फुडी ॥
एकाएकींघालोनि उडी । नेईल रोकडी प्रत्यक्ष ॥ २५ ॥

मुखामाजीं दंतपंक्ति । जैशा ॐकारामाजीं श्रुती ॥
चौकींचे चारी झळकती । सोऽहं अस्मि सोलिव ॥ २६ ॥

अधरातळीं हनुवटी । गोरेपणें दिसे गोमटी ॥
तेथेंही श्यामप्रभा उठी । कृष्णवर्ण गोंदिलें ॥ २७ ॥

वनिताअधरीं सुवर्ण फांसा । पडोन मुक्त आलें नासा ॥
भेटावया कृष्णपरेशा । उपाव कैसा देखिला ॥ २८ ॥

भीमकी नाकींचे सुपाणी । सहज देखेल शारंगपाणी ॥
अधोमुख अधिष्ठानीं । बोळकंबुनी हरिलागीं ॥ २९ ॥

हळदी भीनली हेमकळा । तेणें उटिलें मुखकमळा ॥
तेज झळके गंडस्थळा । सूर्यकळा लाजल्या ॥ ३० ॥

भीमकी मुखकमळ सुंदर । कृष्ण कृष्णपणें भ्रमर ॥
आमोदभावाचें शेजार । निजमंदिर हरीचें ॥ ३१ ॥

कृष्णमणी अहेवतंतू । कंठीं धरिला न तुटतु ॥
दिसों नेदी लोकांतु । केला एकांतू निजकंठीं ॥ ३२ ॥

फिटला चिंतेचा दचक । म्हणोनि न घाली चितांक ॥
कृष्णपदींचा पदांक । तोंचि पदक हृदयींचें ॥ ३३ ॥
पृथ्वी नवखंडें खंडिली । जडजाड्यत्वा उबगली ॥
भीमकीचे अंगीं रिघाली । सुनील झाली कांचोळी ॥ ३४ ॥
पावावया कृष्णदेवो । सांडिला सवतीमत्सरभावो ॥
आलिंगावया कृष्णरावो । धरा पाहा वो धाविन्नली ॥ ३५ ॥
एका अंगीं भिन्नपणीं । जीवशिव वाढिन्नले दोन्ही ॥
तेणें झाली घनस्तनी । कुचकामिनी कुचभारें ॥ ३६ ॥
विद्याअविद्या पांखें दोन्ही । आच्छादिलीं दोहींकडोनी ॥
दाटली त्रिगुणांची कसणी । कृष्णावांचोनि कोण सोडी ॥ ३७ ॥
भीमकी कृष्णा आलिंगन । तेणें जीवशिवां समाधान ॥
यालागीं दोनी उचलले जाण । कृष्णस्पर्शन वांछिती ॥ ३८ ॥
मुक्त नांव मुक्ताफळा । नेणती मुक्तीचा जिव्हाळा ॥
म्हणोन पडली भीमकीगळां । भेटी गोपाळा माळ झाली ॥ ३९ ॥
पूर्वी क्षीरसिंधूची बाळा । नेसली क्षीरोदक पाटोळा ॥
नातो पाहावया घनसांवळा । कांसे लागला क्षीराब्धि ॥ ४० ॥
माझी कन्या हे गोरटी । झणी कोणाची लागेल दृष्टी ॥
म्हणोनि घालितसे कंठीं । रत्नमाळा क्षीराब्धि ॥ ४१ ॥
प्रकृतिपुरुषां पडली मिठी । तैसें बिरडें कांचोळिये दाटी ॥
कृष्ण सोडील जगजेठी । आयां बायां न सुटे तें ॥ ४२ ॥
शमदमाचीं सुभटें । हस्तकडगें बाहुवटें ॥
करी कंकणें उद्भटें । कृष्णनिष्ठे रुणझुणती ॥ ४३ ॥
क्षणोक्षणीं दिशा उजळे । तैसी चढती दशांगुळें ॥
दशावतारांचिये लीळें । जडित केलें मुद्रिकां ॥ ॥ ४४ ॥
पाहतां तळहातींच्या रंगा । उणें आणिलें संध्यारागा ॥
करी चरणसेवा श्रीरंगा । तळवा तळहातीं सदा ॥ ४५ ॥
आटूनिया हेमकळा । आटणी आटिल्या बारा सोळा ॥
वोतीव केली कटिमेखळा । मध्यें घननीळा जडियेला ॥ ४६ ॥

दोहोंकडे मुक्तलग । तेणें शोभत मध्यभाग ॥
भीमकी भाग्याची सभाग्य । तेणें श्रीरंग वेधिला ॥ ४७ ॥

चरणीं गर्जती नूपुरें । वांकीं आंदुवाचेनी गजरें ॥
झालें कामासी चेइरें । धनुष्य पुरें वाइलें ॥ ४८ ॥

## २७. पैलें पुराण

चो नमो विश्वभरिता । देवा बापा सर्व-समर्था ॥
परमेश्वरा सत्यवन्ता । स्वर्ग पृथिवीचा रचणारा ॥ १ ॥

तूं ऋद्धिसिद्धीचा दातारु । कृपानिधी करुणाकरु ॥
तूं सर्व सुखाचा साघरु । आदि अंतु नातुडे ॥ २ ॥

तूं परमानंदु सर्व स्वरुपु । विश्वव्यापकु ग्न्यानदीपु ॥
तूं सर्वगुणीं निर्लेपु । निर्मळु निर्विकारु स्वामिया ॥ ३ ॥

तूं अदृष्टु तूं अव्यक्तु । समदयाळु सर्वप्राप्तु ॥
सर्वज्ञया सर्व नीतिवंतु । येकुचि देवो तूं ॥ ४ ॥

स्वर्ग सृष्टि तुवां हेळामात्रें । केला चंद्रु सूर्यु नख्यत्रें ॥
तुझेनि येकें शब्दें पवित्रें । केली सर्व रचना ॥ ५ ॥

तूं आणि तुझा येकुचि सुतु । आणि स्पिरितु सांक्तु ॥
तिघइ जाणा येकुचि सत्यवंतु । देवो जाणावा ॥ ६ ॥

तेया तुझिया दयाळा कुमरा । कृपानिधी अमृतसागरा ॥
स्वर्गसृष्टीच्या स्वस्तकरा । नमन माझें ॥ ७ ॥

नमो विश्वाचिये दीप्ती । नमो वैकुंठसभेचे कांति ॥
देवा बापाचा दक्षिणहस्तीं । सिंहासन तुझें ॥ ८ ॥

जरी तूं आम्हां मनीं रिघावा करिसी । तरी अज्ञानपटल फेडिसी ॥
अमृतासारिखी घोडिव दाविसी । प्रेमभरित करोनि ॥ ९ ॥

नमो स्पिरिटा पवित्र पावना । त्रिंदादिचिया तिसरिआजाणा ॥
तूं आपुलिया सेवकाचिआ मना । प्रकाशु करी ॥ १० ॥

तूं जीवनझारीचें पाणी । अग्निमोहो आणी ॥
जीवीचें प्रेम अंतःकरणीं । अडलेया सारथी ॥ ११ ॥

पितापुत्रु दोघेजण । आणि स्पिरितु सँक्तु आपण ॥
जरी जाहले तिघेजण । तरी तिघे देव न्हवती ॥ १२ ॥
तिघेजणाचें येकचि तत्त्व । येकी प्रकृति येक स्वामित्व ॥
येकचि देवपण येक जाणत्व । म्हणोनि तिघेहि जाणा येकुचि देवो ॥ १३ ॥
या तिघांजणां मितुरा । जो आहे दुसरा ॥
तो मनुष्यदेहीं संसारा । जल्मा आला ॥ १४ ॥
तो आमुचा स्वामी जेसु क्रिस्तु । निज परमेश्वराचा सुतु ॥
ता परमेश्वरु सत्यवंतु । ताचि निजमनुष्यु ॥ १५ ॥
स्वर्गीं देवपणीं असतां । मातेविण तेया असे पिता ॥
मनुष्यपणीं संसारीं वर्ततां । बापाविण माता असे ॥ १६ ॥
म्हणोनि तुज स्वामी जेसु क्रिस्ता । नमस्कारु माझा वैकुंठनाथा ॥
जगद्गुरु देवसुता । जगज्जीवना ॥ १७ ॥
देवें आदिपुरुषू ॲडॅवो रचिला । आपुलें प्रतिस्वरूपीं घातिला ॥
तो मारुवा पासोनि दोषीं पडला । देवकृपा अंतरुनी ॥ १८ ॥
मनुष्यु देवाचार बंदी माझारीं । पडला महा अघोरीं ॥
दुसरा पापी मिळाला संसारीं । देखोनि वैरी संतोषला ॥ १९ ॥
मग उद्धरावेया तेआ पुरुषा । स्वामीयें प्रेत्नु केला ऐसा ॥
प्रॉफेटीं सांगितला तैसा । आला मृत्युलोकीं ॥ २० ॥
देवें मनुष्यजन्मु आदरिला । मनुष्यु होउनि जल्मा आला ॥
अंकुवारी उदरीं संभवला । नवलावो केला स्वामिये ॥ २१ ॥
क्रूसीं वेचूनि आपलें शरीर । मनुष्य केला अमर ॥
अमोलिक रक्त जाहालें मोल थोर । आमचें सोडवणें ॥ २२ ॥
म्हणउनु तुज प्रणिपातु आतां । कृपा करी या शरणागता ॥
ज्ञानमति देईं स्वामी क्रिस्ता । तुझी कथा वर्णावया ॥ २३ ॥
तुझी स्तुती नित्य करूं । तूं विश्वा करुणाकरु ॥
आणि तुझे मातेसी माजा नमस्कारु । क्रिस्तराया ॥ २४ ॥

नमो वैकुंठराणिये स्वामिनी । सकलां रचिलेल्या वस्तू होउना ॥
क्रिस्ताचें मनुष्यपण वेगळें करुनी । तूं आदिकी गे देवमाते ॥ २५ ॥
परमेश्वरु येकु समर्थु । आणि तेयाचा पुत्रु जेसु क्रिस्तु ॥
यांवांचुनि त्रिभुवथु । तुजावरुता नाहीं कवणु ॥ २६ ॥
वर्णावया तुझिया सुता । सांगों आदरिली देवकथा ॥
कथेसी रिघाव होई आतां । ऐसें करी स्वामिनी ॥ २७ ॥
आतां स्वर्गीचिया देवदूतासी । कर जोडुनियां तुमांसी ॥
साष्टांगें करोनि सकळांसी । प्रणिपातु माजा ॥ २८ ॥
तुम्हीं नवें फौजांचे दळभारीं । वैकुंठसभेभीतरीं ॥
दळभारपत्य पुढारीं । मिरवती ॥ २९ ॥
आम्हां तुम्हां सकळांसी । येकुचि स्वामी रचनेसी ॥
तैसा येकूचि मोहो आवघेयांसी । मनीं वसे ॥ ३० ॥
नमो सांतां भक्तां भक्तिणी । जीही भवसागरु उतरुनी ॥
इंद्रियांचें सुख नियमुनी । देवचारातें जितलों ॥ ३१ ॥
जया पॅट्रिआर्का प्रॉफेटां । शास्त्रपालका नीतिवंता ॥
कृपा करोनि शरणगतां । आधारु कीजे ॥ ३२ ॥
जधीं राचिला हा संसारु । तधीं लागोनी जो संसारीं येणारु ॥
तो तुम्हीं जाणितला देवकुमरु । तयाचे कृपें करोनी ॥ ३३ ॥
जैसे रात्रीचिआ अवस्वरा । गगनीं सोभती चंद्रुतारा ॥
कीं दीपवाडु अंधकारा । प्रकासु करी ॥ ३४ ॥
तैसे तुम्ही संसारांतु । ज्ञानदीप अज्ञान लोकांतु ॥
देवभक्ती नाथिलिआ जनांतु । नीति उजुवाडु दाविला ॥ ३५ ॥
आतां क्रिस्ताचेआ ॲपॉस्टोलां । मियां साष्टांगें प्रणिपातु केला ॥
जेहीं संसारीं तारकु देखिला । देहदृष्टी ॥ ३६ ॥
तेणें तारकें तुम्हां बोलाविलें । जनलोकांमाजीं निवडिलें ॥
पृथ्वीचें राज्य घर केलें । आपुले कृपेस्तव ॥ ३७ ॥
धन्य धन्य जीवित्व तुमचें । धन्य मंदिर श्रवणद्वाराचें ॥
धन्य देखणें डोळीयांचे । सुफली दृष्टी ॥ ३८ ॥

तां आश्चर्ये करिते वेळां । तीं तुम्ही देखिलीं डोळां ॥
अंतीचें भोजन तुम्हां जवळां । केलें तेणें ॥ ३९ ॥
नमो मार्टिरां समस्तां । तारकाचेआं परमभक्तां ॥
जेहीं कष्ट साहिले अद्भुत । भक्तिभाव कारणें ॥ ४० ॥
तुमचा मृत्यु आम्हीं देखोनी । सत्व धीरु घेतला मनीं ॥
तुमचा दृढभाव पाहुनी । आम्हां मनाभावो जोडला ॥ ४१ ॥
नमन कन्फेसोरां सकळां । संतां स्वजनां निर्मळां ॥
जेआचे हृदईं जपमाळा । परमेश्वराची ॥ ४२ ॥
जैसा आकाशीं रविभानु । कीं इंधनीं हुताशनु ॥
तैसें संसारीं दीपक होऊनु । वर्तलेति तुम्हीं ॥ ४३ ॥
आतां वंदूं सातां अंकुवारी । तुम्ही सातजण सकुमरी ॥
स्त्रीभाव वर्जूनी शरीरीं । वीरश्री ठाकिली ॥ ४४ ॥
तरुनी वयसा असतां निकी । सांडोनि संसार माया सकाळिकी ॥
पावों ठेवूनी कंदर्प मस्तकीं । क्रिस्तचरण ठाकिले ॥ ४५ ॥
ऐसें सकळ स्वर्गीचे सातसाती । तुम्ही स्वामियातें करा विनंती ॥
मज देआवेया शुद्धमती । कवित्व सिद्धि पावावेया ॥ ४६ ॥
हें कार्य उत्तम भलें । मीआं सांगावया आदरिलें ॥
देवें कैसें सर्व रचिलें । तें सांगेन श्रोतियां ॥ ४७ ॥
कैसें वैकुण्ठ केलें देवें । तेआमाजी असंख्य भोदुवे ॥
कैसीं रचिलीं ॲडंवो इव्हे । आदि पुरुषातें ॥ ४८ ॥
तेआ उपरी काय वर्तलें । उदंड भोदुवे गर्विक ज़ाहलें ॥
पापाचा डोहीं बुडाले । देवचार होउनी ॥ ४९ ॥
आणि आदि पुरुषु होता रचिला । ता देवचारें ठकविला ॥
महादोषीं पडविला । मग काय जाहालें ॥ ५० ॥
तेयां दोषांसी करावया संहारु । पुढां मी संसारी ये नरु ॥
ऐसी भाक देतां होतां सर्वेश्वरु । विश्वजनातें ॥ ५१ ॥
येतुकें तेयां प्रॉफेटांनीं । पवित्र पुस्तकीं लिहुनी ॥
दाविलें प्रगट करूनी । जगत्र जगन्नाथें ॥ ५२ ॥

परमशास्त्र जगीं प्रगटावेया । बहुतां जणां फळसिद्धि होआवेया ॥
भासा बांदोनि मराठिआ । कथा निरोपिली ॥ ५३ ॥

जैसी हरळामाजी रत्नकिळा । कीं रत्नामाजी हिरा निळा ॥
तैसी भाषांमाजी चोखाळा । भाषा मराठी ॥ ५४ ॥

जैसी पुष्पांमाजी पुष्प मोगरी । कीं परिमळांमाजी कस्तुरी ॥
तैसी भाषांमाजी साजिरी । मराठिआ ॥ ५५ ॥

पखीआमधें मयोरु । वृखीआमधें कल्पतरु ॥
भाषामधें मानु थोरु । मराठियेसीं ॥ ५६ ॥

तारांमधें बारा राशी । सप्तवारांमाजी रवि शशी ॥
यां दीपीचिआं भाषांमधे तैसी । बोली मराठिया ॥ ५७ ॥

## २८. रंभाशुक-संवाद

रंभा म्हणे योगीराया । तुवां दुषिल्या मानुषी जाया ॥
तयांसारिखी माझी काया । नव्हें हें काय नेणसी ॥ १ ॥

वस्तुवस्तूसी अंतर बहुत । ऐसें जाणती परीक्षावंत ॥
एऱ्हवीं कुरूप स्वरूपवंत । गर्भांध काय ओळखे ॥ २ ॥

उच्चैःश्रवा रवीचे रथीं । ह्यसहस्त्र आगळे ह्य शती ॥
दोनी योजनें व्योमपंथीं । निमिषार्धे जो क्रमी ॥ ३ ॥

तया ऐसे माझे घोडे । ऐसें नर जो बोले तोंडें ॥
तया तुल्य आन वेडें । कोण असे त्रैलोक्यीं ॥ ४ ॥

काळ खड्गा ऐसी विळी । किंवा असिलतेसारखी पळी ॥
गजवेलीसीं भिडे कोहळी । डोकेतवातैसदर्पण ॥ ५ ॥

ऐरावती देवेंद्राचा । समुद्रमथनीं उद्भव ज्याचा ॥
तो वनकुंजरासमान साचा । म्हणे तो काय विवेकी ॥ ६ ॥

चंदन चढे देवनिढळा । येक काष्ठ पडे पायखोळा ॥
कल्पतरुसम बाभळा । कीं केळ तैसी रुद्र तोडे ॥ ७ ॥

अश्वत्थ लावूनि गंतातीरीं । प्रदाक्षिणा कारिती पुरुषनारी ॥
त्यांचे संकल्प क्षणामाझारीं । सिद्ध होवोनि प्रत्यक्ष ॥ ८ ॥

आणि लाविलें मद्योदकाचें काष्ठ । स्वव्रती साध्वीचे लोट ॥
तया ऐसा तरु वरिष्ठ । हरिवृक्ष केंवि सांगे ॥ ९ ॥

माणिक मुक्ता पाच पेरोज । नीळ वैडूर्य पुष्कराज ॥
गोमेद प्रभाकर मरगज । पद्मराग महामणी ॥ १० ॥

परिस चिंतामणी ज्या म्हणती । जे हे एक पाषाण जाती ॥
म्हणोनी गारेसाठीं देती । ते मूर्ख कीं शहाणे ॥ ११ ॥

भरित जांबुनदाचीं तगटें । पाळवी मुक्ताफळ चोखटें ॥
ऐशा दिव्यांबरेशीं रगटें । काय तुळणें तें पावे ॥ १२ ॥

करोनी शरीराचा चुना । शतयागांचा तांबूल जाणा ॥
देउनी उर्वशीच्या स्तना । स्पर्शावया अधिकार ॥ १३ ॥

आणिक एक परीचे जाडे । कच्छ फेडुनी रिघे पुडे ॥
त्या मनुष्यदारेचेनि पाडें । दिव्यांगना केंवि होती ॥ १४ ॥

उदार धीर पवित्र ज्ञानी । दयाशीळ यशस्वी जनीं ॥
शापानुग्रह महामुनी । मूर्त अवतार विष्णूचे ॥ १५ ॥

कृपण अधीर दोषी मूढ । विश्वपीडक अकीर्ति काबाड ॥
आचारभ्रष्ट पाषांडी जड । मुख्य अधिकारी नरकाचे ॥ १६ ॥

येकाचे नामें जळती दोष । दर्शनें जोडे सिद्धि का मोक्ष ॥
ऐसे महानुभाव पुरुष । संगें लोकां सुखकारी ॥ १७ ॥

येकाचे स्मरणें पापप्राप्ती । दर्शनें नरकासी नेती ॥
संग पडतां दुःखावर्ती । ते अधम उत्तम कैसेनी ॥ १८ ॥

येक प्रतापें जिंकोनि क्षिती । येक हरावेती वडिलांची वृत्ती ॥
येकातें म्हणती चक्रवर्ती । येक भाक्षिती कोरान्न ॥ १९ ॥

येक सुपुत्र कुळातें तारी । येक पूर्वज पाडी अघोरीं ॥
म्हणोनि अधर्म पुरुषा सरी । नाहीं जाणा निर्धारें ॥ २० ॥

विष्णुतीर्थे वैकुंठ जोडे । सुरापानीं रौरवीं पडे ॥
दोन्ही उदकें येका पाडें । म्हणती मूढा नाडली ॥ २१ ॥

मंदाकिनी आणि वैतरणी । सारिख्या म्हणती पापी प्राणी ॥
जगें नाहिजे जान्हवीजीवनीं । कर्मनदीतें नातळती ॥ २२ ॥

म्हणोनी वस्तु वस्तूशीं पाहे । अंतर महदंतर आहे ॥
ऐसें जाणे तोचि लाहे । चतुर नाम विलोकीं ॥ २३ ॥
तेवि आम्ही देवांगना । पुण्यावेगळा नरें कवणा ॥
मानिनींच्या देहदूषणा । काया आमुच्या नातळती ॥ २४ ॥
प्रत्यक्ष पाहीं माझें रूप । दिव्य देही लावण्यदीप ॥
येथींचें सुरतसुख अमूप । तें स्वानुभवें जाणावें ॥ २५ ॥
हे आनंदरसाची कुपिका । गोडी आणी सर्व सुखा ॥
चाखोनियां अधरीं पीयूषा । प्रतीति पाहे ययाची ॥ २६ ॥
मग ग्राहीक होई शरीरा । संतोष देईन तनुअंतरा ॥
मातें अव्हेरितां चतुरा । महा हानी समान ॥ २७ ॥

## २९. नलोपाख्यान

दमयंतीस लागली निद्रा । तळमळ नावरे नरेंद्रा ॥
ग्रहणीं राहू गिळी चंद्रा । तेवीं चिंतें ग्रासिलें ॥ १ ॥
भार्येसी क्षुधे तृषेची झोंप । राजया मनीं उद्वेग ताप ॥
धुधुःकारें जैसा सर्प । 'हा ! हा ! कष्ट' म्हणोनी ॥ २ ॥
कली संचरला अंगीं । यालागीं निश्चय केला त्यागीं ॥
अर्धवस्त्रछेदनालागीं । उपाय चित्तीं करितसे ॥ ३ ॥
अर्धवस्त्र नेणता इतें । खंडोनी गेलें पाहिजे परतें ॥
ऐसा विचार करुनी चित्तें । विलोकित काननीं ॥ ४ ॥
कोशरहित पडलें शस्त्र । तेणें छेदिलें अर्ध वस्त्र ॥
निद्रिस्त पतिव्रता पवित्र । निर्जन वनीं एकली ॥ ५ ॥
त्यागुनी चालिला तो राया । परतोनी पातला त्याचि ठाया ॥
निद्राभूत देखोनी जाया । जाता जाला मागुता ॥ ६ ॥
शिणली पायीं चालतां वाट । उपोषणीं आगळे कष्ट ॥
चेतनारहित पडे काष्ट । तेवी निद्रिस्त भूतळीं ॥ ७ ॥
म्हणे, 'हे पतिव्रता निर्दोष । स्पर्शो न शके परका पुरुष ॥
इचे नेत्रींचा हुताश । भस्म करील दुष्टातें ॥ ८ ॥

माझिये आशिर्वचनीं । क्षेम कल्याण वांचो विजनीं ॥
दुःख न देखवे नयनीं । यालागीं त्यागुनी जातसें ॥ ९ ॥
निकट असतां आपदा । माझेनी न देखवे कदा ॥
त्यागीलिया पवित्र प्रमदा । ईश्वर ईतें रक्षील ॥ १० ॥
आदित्य रुद्र आणि वसव । अश्विन मरुत नागदेव ॥
सप्तऋषी सिद्ध सर्व । धर्मशीळ रक्षतु ॥ ११ ॥
ग्रहनक्षत्र पंचभूतां । श्वापदें पक्षी वनदेवतां ॥
वृक्षवल्ली गुल्म लता । नमन माझें साष्टांगीं ॥ १२ ॥
धरादेवी ! तुज नमन । तुजवरी कंटक बहु पाषाण ॥
दमयंतीचे सकुमार चरण । छिन्नभिन्न न करावे ॥ १३ ॥
तुम्हीं समस्तीं स्नेहभावें । लावण्यलतिके सांभाळावें ॥
तुम्हांसी निरवून स्वस्थ जीवें । मी जातसे वनपंथीं ॥ १४ ॥
सर्वीं वसतिया आत्मारामा ! । तुवां वांचवावी अंगनोत्तमा ॥
पंच प्राण नमन तुम्हां । त्यागूं नका इयेतें ॥ १५ ॥
आपतत्वा ! तुवां जीवना । इच्छिलिया करी जलपाना ॥
सूर्यासी म्हणे, ‘ उष्ण किरणा । लागो ईतें न द्यावें ’ ॥ १६ ॥
‘ ईश्वर रक्षील सर्वथा । माझ्यानें न देखवे व्यथा ॥
यालागीं त्यागुनी जातों आतां । क्षेम कल्याण हें असो ॥ १७ ॥
मी सत्यवादी पुण्यश्लोक । हें सत्य असेल निष्टंक ॥
तरी लोटुनी कोटि दुःख । स्वस्थ जाईल माहेरा ’ ॥ १८ ॥
ऐसा देऊनि आशीर्वाद । जाता जाला नळ नैषध ॥
पुढती पश्चात्तापें खेद । अत्यद्भुत उदेला ॥ १९ ॥
त्यागुनी जाय परता । परत परतोनि ये मागुता ॥
सात पांच वेळां चित्ता । संशयचक्रीं सूदलें ॥ २० ॥
मग कठिणता घालुनी मनीं । कलीनें लोटिला दुरी वनीं ॥
खेचर भूचरांचे नयनीं । अश्रुपात डळमळती ॥ २१ ॥
यापरी सांडुनी दमयंती । नैषध गेला अरण्यपंथीं ॥
स्वल्प उरली असतां रात्री । प्रबोधली पतिव्रता ॥ २२ ॥

निकट न देखे भ्रतार । भीमकी करी हाहाकार ॥
सबळ दाटला अंधकार । भंवतें कांहीं दिसेना ॥ २३ ॥

घाबरेपणीं धांवोनि चरणीं । अडखळोनी पडे धरणीं
मस्तकीं लागोनी पाषाणीं । रक्त वाहे भडभडां ॥ २४ ॥

हांक मारी दीर्घ स्वरें । म्हणे, ' वल्लभा ! धांव कां त्वरें ॥
मातें सांडोनी पुढारें । पाय कैसे चामकती ? ॥ २५ ॥

तुज न देखतां प्राण । देहीं न राहे अर्ध क्षण ॥
येई सत्वर धांवोन । आलिंगन मज देई ॥ २६ ॥

माझा करूनियां घात । काय तो साधिशी पुरुषार्थ ? ॥
मज वेगळें तुझें चित्त । काय विश्रांति पावेल ? ॥ २७ ॥

क्षुधित वनीं मी गोरटी । अर्ध वसनें होय कष्टी ॥
पडलिया वनसंकटीं । प्राण कंठीं पातला ॥ २८ ॥

तुज वेगळी करूं काय ? । कवणातें मी मोकलूं धाय ? ॥
नाहीं बाप अथवा माय । ईश्वर तोही दिसेना ॥ २९ ॥

भयें झोंबूं कवणाचे कंठीं । सांग रिघों कवणा पोटीं ? ॥
तुजवेगळी सर्व सृष्टी । वोस वाटे वल्लभा ॥ ३० ॥

स्नेहें धावोनीं लवलाही । मातें कवळी दोन्ही बाहीं ॥
तुज वेगळा मज नाहीं । सोडविता राक्षिता ॥ ३१ ॥

तुजवरी ठेवूनिया दृष्टी । मी विसरलें दुःखकोटी ॥
तुझ्या संगीं सर्व सृष्टी । सुखभरित मज वाटे ॥ ३२ ॥

धांव धांव नैषधराया ! । केशीं झाडीन तुझ्या पायां ॥
झाडणें करूनी सांडीन काया । तुजवरुनी आवडीं ॥ ३३ ॥

पडे उठी; मागुती पडे । दिशा अवलोकुनी चहूंकडे ॥
' नळा ! नळा ! ' म्हणउनी रडे । आकांतली काननीं ॥ ३४ ॥

' प्राणेश्वरा ! नळनरेशा ! ' मुखें गाजवी हाचि घोष ॥
ऊर्ध्व अवलोकी आकाश ! रिघों पाहे पाताळीं ॥ ३५ ॥

नमन माझें ' म्हणे अनिला ! । माझी वार्ता जाणवी नळा ॥
लोटुनी आणी मजजवळां । श्रेय घेई जीवाचें ॥ ३६ ॥

नमन करितसें तुझिया चित्ता । उपजों नेदी निष्ठुरता ॥
चर हो ! तुम्हातें वाहातसें माथां । परतोनी आणा नळातें ॥ ३७ ॥

पक्षी हो ! तुम्ही पक्षबळ । उडोनी शोधा माझा नळ ॥
वार्ता सांगोन उतावीळ । शीघ्र आणा मजपाशीं, ॥ ३८ ॥

चक्रवाकाचिया युग्मा । म्हणे ' वेदना ठाउकी तुम्हां ॥
नळातें शोधुनियां श्रमा । माझिया हो ! परिहरी, ॥ ३९ ॥

मधुकरातें बोलें शब्द । तुम्हां प्रिय पुष्पगंध ॥
नळाचा मुखाब्जमकरंद । सेवुनी सांगा शुद्धीतें ' ॥ ४० ॥

दुःखसमुद्रामाजीं मग्न । संकटीं गेला वर सांडुन ! ॥
परी मुखें नुच्चारी अवगुण । निंदा कांहीं न बोले ॥ ४१ ॥

आठवुनी नळाचे कष्ट । दुःखें होतसे हृदयस्फोट ॥
नाठवीं आपुलें संकट । वनिताश्रेष्ठ दमयंती ॥ ४२ ॥

' हा हा महाराज ! नळनरेशा ! । मातें होत कां तुझे क्लेश ॥
तुवां असावें सुखसंतोष । तुझें अरिष्ट मज लागो ॥ ४३ ॥

माझा पतिव्रताधर्म । तुतें सर्वदा करूं क्षेम ॥
तुझे अवदशेचा श्रम । सर्व हो कां मजलागीं ' ॥ ४४ ॥

ऐशी मुखीं गाजवी ध्वनी । अश्रुधारा गळती नयनीं, ॥
मार्गरहित वनोपवनीं । कोमळ पायीं चामके ॥ ४५ ॥

वाहळ वोहळ दरे दरकुटे । विवरें कुहरें गिरिकपाटें ॥
वनें भयानकें कष्टें । लंघूनिया जातसे ॥ ४६ ॥

## ३०. दुष्यंतशकुन्तलोपाख्यान

कौरववंशीं प्रख्यातकीर्ती । दुष्यंतनामा गुणैकमूर्ती ॥
श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती । वीर्यें शौर्यें आगळा ॥ १ ॥

प्राचीपतीची दक्षिणोत्तरा । चारी दिशा चतुःसमुद्रा ॥
आक्रमूनी महीमहीध्रा । सुरेंद्र तैसा भूलोकीं ॥ २ ॥

हिंसाकारी अधर्मकारी । अथवा वर्णसंकरकारी ॥
दुष्यंतराज्यीं अनाचारी । स्वप्नींही परी असेना ॥ ३ ॥

धर्मरीती धर्मधन । सेवूनि संतुष्ट सर्व जन ॥
स्वकर्मी सकळ वर्ण । विहिताचारें वर्तती ॥ ४ ॥
रोगदारिद्र्य कीं बंधन । दुःखदुर्भिक्ष अकालमरण ॥
सर्प वृश्चिक तस्कर जाण । दुष्यंतराज्यीं असेना ॥ ५ ॥
स्वकाळीं पर्जन्य वोपी उदका । रत्नधान्य समृद्धि पिका ॥
पृथ्वी पिके हे मांत्रिका । फळे जैसी श्रीविद्या ॥ ६ ॥
विष्णूसमान सत्ताबळ । प्रतापतेजें सूर्य तेजाळ ॥
धरातुल्य सहनशील । अक्षोभ जैसा सागरू ॥ ७ ॥
निपुण शस्त्रास्त्रप्रहरणीं । आरूढों जाणे सर्व वहनीं ॥
ऐसा भूपाळ चूडामणी । दुष्यंत राजा भूलोकीं ॥ ८ ॥
सप्तसमुद्रींचे लोट । धरामंडळीं एकवट ॥
तैसे सेनेचे संघाट । घेऊनि वना चालिला ॥ ९ ॥
वाजी वारण रथ पदाती । संख्या करितां न धरवे गणती ॥
सेनावसनें सर्व जगतीं । पांघुरविलीं समर्थे ॥ १० ॥
देख प्रचंड महागिरी । विशाळ पर्वताचिया दरीं ॥
जळें तुंबली सरितासरीं । समुद्रतुल्य अगाध ॥ ११ ॥
नाना वृक्षांचीं अचाट । डांगें लागलीं घनदाट ॥
माजीं निर्झरोदकांचे पाट । सरोवरा धांवती ॥ १२ ॥
मस्तकें उचलूनि दिनकर । छायें राखिला अंधकार ॥
माजी श्वापदगणांचे भार । सुखावले सुखवस्ती ॥ १३ ॥
मृग मारूनि असंख्यात । भक्षूनि भर्जित अभर्जित ॥
पारधी खेळतां झाले श्रांत । ते विश्रांती पावले ॥ १४ ॥
अवलोकूनि तें वन । राजा करी पुढारां गमन ॥
तंव देखिलें कश्यपारण्य । सिद्धसाधकीं वसविलें ॥ १५ ॥
नदी मालिनी पवित्रजीवनी । वाहे जैशी देवतटिनी ॥
तरंगलिंगें सुफेन सुमनीं । सुपूजिता शोभती ॥ १६ ॥
साष्टांग करूनियां नमन । राहवूनि सेनाप्रधान ॥
निःसंग एकाकी आपण । कश्यपाश्रमीं प्रवेशे ॥ १७ ॥

अवलोकूनि कश्यपाश्रम । आंत जों पाहे नृपसत्तम ॥
तंव कण्वऋषीचा आश्रम । अतिरमणीय देखिला ॥ १८ ॥
आदरें जाऊनि तया निकटीं । आंत पाहे पर्णकुटी ॥
मनुष्यावीण सर्व दृष्टी । गृहसामग्री दिसताहे ॥ १९ ॥
मग गर्जूनि नराधीशें । म्हणितलें आश्रमीं कोण असे ॥
हें परिसोनि इंदिरावेषें । लावण्यकलिका प्रगटली ॥ २० ॥
कनकलतिका सौदामिनी । कीं चंद्रकलिका तनुधारिणी ॥
सुवर्णकेतकी पत्रवर्णी । सुवर्णखाणी हरिणाक्षी ॥ २१ ॥
रूपयौवन चातुर्यलता । बाहेर पातली मुनीश्वरदुहिता ॥
अत्यादरें धरित्रीकांता । पवित्रासन वोपिलें ॥ २२ ॥
स्वागत वदूनियां वचनीं । अर्घ्ये पाद्यें विधिपूजनीं ॥
राजा तोषवूनि बहुमानीं । कुशलवृत्त विचारिलें ॥ २३ ॥
दर्शनें आनंद जाहला नयनां । नाम श्रवण करवावें श्रवणा ॥
परिचयज्ञानें अंतःकरणा । आप्तभाव भेटवणें ॥ २४ ॥
ऐकोनि चातुर्याची गोष्टी । राजा चमत्कारला पोटीं ॥
म्हणे हे वयें अतिधाकुटी । परि विचारें वृद्ध दिसताहे ॥ २५ ॥
राजा बोले या जगतीं । दुष्यंतनामा चक्रवर्ती ॥
ऐकिला असेल तरी हे मूर्ती । ओळखें दृष्टी सुजाणे ॥ २६ ॥
कण्वऋषीचें दर्शन । इच्छूनि येथें ममागमन ॥
केव्हां होईल बोल वचन । विलंबें कीं अविलंबें ॥ २७ ॥
शकुंतला म्हणे नृपती । मम पिता विवेकमूर्ती ॥
वनफळें घेऊनि शीघ्रगती । आतांच येईल आश्रमा ॥ २८ ॥
यालागीं नरेन्द्र चूडामणी । क्षणएक बैसावें या स्थानीं ॥
इच्छित कामना ऋषिदर्शनी । पूर्ण होईल निर्धारें ॥ २९ ॥
एकान्त देखूनि निर्मळ । राजहृदयीं महाप्रबळ ॥
कामार्णवाचे कल्लोळ । हेलावती अतिमात्रें ॥ ३० ॥
राजा पुसे लावण्यराशी । ऊर्ध्वरेता कण्वऋषी ॥
त्यास तूं कन्या झालीस कैशी । हें मज कळलें पाहिजे ॥ ३१ ॥

भुजंगवेणीधरा चतुरा । म्हणे गा राजराजेश्वरा ॥
पूर्वीं एक तपस्वी घरा । ऋषिदर्शना पातला ॥ ३२ ॥
तेणें पुशिलें तुमचियाऐसें । त्याप्रति कण्वें कथिलें जैसें ॥
तें मी सांगेन सावकाशें । श्रवण केलें पाहिजे ॥ ३३ ॥
पूर्वीं गाधिज मुनींद्रवर्यें । खडतर करितां तपश्चर्यें ॥
देखूनि सांडिला धैर्यें । देवेंद्र कांपे चळचळां ॥ ३४ ॥
म्हणे इंद्रपदाची चाड । धरूनि विश्वामित्रें वाड ॥
उग्र तपश्चर्येची मांड । मांडिली असे निर्धारें ॥ ३५ ॥
यासि उपाय करावा कवण । जेणें तयाचें सुकृतधन ॥
हारवूनि हा ब्राह्मण । दीन होय सर्वस्वें ॥ ३६ ॥
तेवेळीं अप्सरामाजिं श्रेष्ठ । मेनिका पाचारूनि निकट ॥
तियें म्हणे हें माझें संकट । वारें ऐसें करावें ॥ ३७ ॥
तुवां जाऊनि तपोवना । कौशिक ऋषीच्या दर्शना ॥
विघ्न करावें जेवि दाना । दुरुक्ती नाशी क्षणार्धें ॥ ३८ ॥
मेनिका म्हणे अमरोत्तमा । प्रतिसृष्टीचा अपरब्रह्मा ॥
ज्याचे तपश्चर्येचें तुम्हां । भय सर्वदा अपार ॥ ३९ ॥
क्षोभवितां तयाची प्रतिमा । स्वर्गासहित आम्हां तुम्हां ॥
भस्म करील येथें भ्रमा । संशयाच्या न धरणें ॥ ४० ॥
सुरेंद्र म्हणे मृगडोळसे । बोलसी तितुकें ठाउकें असे ॥
तथापि आमुच्या कार्योद्देशें । अवश्य गेलें पाहिजे ॥ ४१ ॥
शंका सांडोनि करीं गमना । ऐशी होतां सुरेंद्र आज्ञा ॥
मेनिका आली कौशिकवना । सालंकारा सुवस्त्रा ॥ ४२ ॥
विश्वामित्रासि करूनि नमन । त्याचेच दृष्टीपुढें जाण ॥
क्रीडाकौतुकें सुनर्तन । दाविती झाली विनोदें ॥ ४३ ॥
तियेचा कटाक्षवज्राघात । पडतां मुनिमानसगहनांत ॥
तपोधैर्याचा पर्वत । चूर्ण झाला क्षणार्धें ॥ ४४ ॥
भंगला नेमाचा तडाग । न कळत उडाला कौपीनकाग
मेनिकाचंदनतरूचें आंग ॥ भुजाभुजंगीं वेष्टिलें ॥ ४५ ॥

चिरकाळ भोगें पावला स्मृति । तपश्चर्येसि निघाला पुढती ॥
सुरकाज साधूनि सुरयुवती । जाती झाली सुरसदना ॥ ४६ ॥
ऋषीच्या अमोघवीर्ये धरी । दिव्य गर्भ कन्याकारी ॥
हिमवंतगिरीच्या पाठारीं । सांडूनि गेली अप्सरा ॥ ४७ ॥
वनीं एकलें सुंदर बाळ । पडिलें देखोनि पक्षी सकळ ॥
पक्षमंडपातळीं स्नेहाळ । रक्षिते झाले साक्षेपें ॥ ४८ ॥
चंचुपुटीं मधुसुधाळीं । मुखीं वोपिती क्षुधाकाळीं ॥
श्वापदें येऊं न देती जवळीं । झडपोनि लाविती परौते ॥ ४९ ॥
अकस्मात तेणें पंथें । कण्व ऋषी पावला तेथें ॥
बाळ रक्षिलें शकुंतें । देखोनि करी आश्चर्य ॥ ५० ॥
उचलोनि ओसंगीं घेतलें । गृहा आणोनि प्रतिपाळिलें ।
म्हणूनि पिता येणें बोलें । कथिलें तें म्यां यथार्थ ॥ ५१ ॥
शकुंतीं रक्षिलें वेल्हाळा । यालागीं नाम शकुंतला ॥
हा काळपर्यंत भूपाळा । पालन केलें स्नेहाळें ॥ ५२ ॥

## ३१. वनसुधा

जो आहुती वैदिकविप्रसिद्धा, । नेघे मुखीं देव मुखीं प्रसिद्धा, ॥
तो गोपबाळार्पित खाय घांस । श्रीकृष्ण, जो संहरि हो ! अघास ॥ १ ॥

भक्तां जसा सुलभ अन्यजनास नाहीं, ।
सौलभ्य हें न कमळा कमळासनाही ॥
कीं लाभ नाम वदनीं जरि एक थारे, ।
आतां पहा ! हरिचि तारक सत्कथा रे ! ॥ २ ॥

देऊनियां मुक्ति अघास देवें, । मुलें सवें घेउनि तीं सदैवें, ॥
सरोवराच्या बरव्या तटातें; । आला हरी नाशुनि संकटातें ॥ ३ ॥
अजित काय मुलांप्रति बोलतो, । अजि ! तसाचि धरा मनिं बोल तो ॥
स्वगडियांस वदे वचनामृता, । करि सजीवहि जेविं जना मृता ॥ ४ ॥
म्हणे कृष्ण त्यां बाळसंतां, ' पहा रे ! । अरे ! या स्थळीं सर्व संताप हा रे ॥
करीं ठाव खेळाचि या संपदा हा, । जया वाळवंटीं घडे संप दाहा ॥ ५ ॥

पहा हे मऊ शीतल स्वच्छ वाळू, । रुचे अन्न एथें क्षुधा तुच्छवाळू, ॥
पहा साउली दाट केवी द्रुमांची, । नव्या पल्लवीं श्री पहा विद्रुमाची ॥६॥
स्वपद्मींच पद्मालयाश्री जळाला, । करी देखतां दाह जातो जळाला ॥
न नीरास हे स्वच्छता मानसाच्या, । गती ज्यांत संतांचिया मानसांच्या॥७॥

झाडें पुण्यफळें करूनि सुफळें केळीं बरीं पोफळें, ।
नारेळें सजळें विचित्र उजळें हीं रम्य सीताफळें, ॥
तैसीं हीं प्रबळें स्वसंचितबळें जीं तुंबळें जांबळें, ।
पुष्पें हीं विमळें अशोक बकुळें कुंदादिकांचीं कुळें ॥ ८ ॥
पाळीयुक्त तळीं असीं न सुतळीं स्वर्गीं न वा भूतळीं, ।
वायूतें विमळीं जळीं सकमळीं जीं पाळिती शीतळीं, ॥
अंतर्बाह्य अली महाशतदळीं भृंगावळी सांवळी ।
बिंदू त्याच दळीं कसा डळमळी घे पैज मुक्ताफळीं ? ॥ ९ ॥

वदे कृष्ण गोपाळ बाळां जनातें, । 'बसूनी करूं ये स्थळीं भोजनातें, ॥
वनीं वत्स सोडा चरायासि पाणी, । तयां पाजुनी या' म्हणे चक्रपाणी ॥१०॥
'बरें कृष्णजी ! बोलसी तूं जसा रे ! । तसें वर्ततों, लक्षितों तूज सारे' ॥
असे जेविती सोडुनी वासुरांतें, । नभीं होय आश्चर्य सर्वां सुरां तें ॥ ११ ॥
तपांचीं फळें त्या मुलांचीं तशी कीं । अहो ! सोडिती सर्व निश्चित शिंकीं, ॥
हरीभोंवतीं मांडितां भोजनातें । वदे व्यास जे पंक्तिशोभा जनातें ॥ १२ ॥
कर्दलिदलशतपत्रीं दशशतपत्रीं मऊ शिलापात्रीं ॥
पुष्पीं चित्रविचित्रीं जेविति पात्रीं, तरूचिया पात्रीं ॥ १३ ॥
शिंकाच कोणी अशनें करीती । पत्रावळी एक अनेक रीती, ॥
कित्येकि दूर्वांकुरदर्भकांहीं । केलीं स्वपात्रें व्रजअर्भकांहीं ॥ १४ ॥

निजमुख कवणाही आड दृष्टी असेना, ।
रचुनि बसवि ऐसी भोंवतीं बालसेना, ॥
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या, ।
म्हणुनि बहुत पंक्ती मंडलाकार केल्या ॥ १५ ॥

गळाला असे सर्व देहाभिमान । स्वसंस्कारशेषें क्वचिद्वर्तमान, ॥
असा चीमणा देह वाटे मनातें । बहू कृष्णसामीप्य त्या वामनातें ॥१६॥

बहु खुजे अतिवामनही गडी । तनु जशा भवसागरसांगडी, ॥
स्वनिकटत्व तयां बहु देव दे । कवळ दे निजगुह्य तयां वदे ॥ १७ ॥
स्थूल आपण जनीं अतिमान, । क्षुद्र देह न जया अभिमान ॥
भोग भोगुनिहि धाक असेना, । मित्र आणि समहोरि पुसेना ॥ १८ ॥

## ३२. दमयन्ती-स्वयंवर

सर्वे सेना भूपाळ निघालाहे । सीम लंघी उद्यान येक पाहे ॥
रिघे तेथें मित सेवकांसि बाहे । फौज सारी बाहेर उभी राहे ॥ १ ॥
फनस जंबू जंबीर विविध निंबें । कुंद चंदन माकंद दाऽलिंबें ॥
तुंग नारिंगें विकसलीं कदंबें । वसति जेथे शुकसारिकाकदंबें ॥ २ ॥
लतेतळीं रुंद निरुंद कालवे । गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
परागही सांद्र तयांत रंगती । फुलांसवें भृंगतती तरंगती ॥ ३ ॥
उपरी कंटक साचे । परंतु सांचे जयांत सुरसाचे ॥
घोंस तसे फणसांचे । षण्मासांचे कितेक वरसाचे ॥ ४ ॥
तया वनीं एक तटाक तोयें । तुडुंबलें तामरसानपायें ॥
निरंतरामंद मरंद वाहे । तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥ ५ ॥
अमृतही पयही म्हणवीतसे । उभय होय तसी रुचि वीतसे ॥
मधुर सारस तें जल गा तसें । मधुर सारस यास्तव गातसे ॥ ६ ॥
वीता मरंद उदरंभर बंभरांचें । जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ॥
तें पद्म जेथिल सहस्रदळां धरीतें । प्रत्येक सूर्यकिरणास विकासवीतें ॥
तया सरोवरिं राजहंस पाहे । राजहंसांचा कळप पोहताहे ॥
तयासाठीं हें वापिकाच पोहे । नळें केली हें कोण म्हणे नोहे ? ॥ ८ ॥
तया हंसांचे देह काञ्चनाचे । पक्ष झळकति वीज जसी नाचे ॥
रंग माणीकं चंचुचे पदाचे । जसे अधरराग भीमकन्यकेचे ॥ ९ ॥
तेथील एक कलहंस तटीं निजेला । जो भागला जलविहार विशेष केला ॥
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो । पक्षीं तनू लपवि; भूप तया पहातो ॥ १० ॥

टाकी उपानह पदें अतिमंद ठेवी। केली विजार वरि डौराहि मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं। भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥

कलकल कलहंसें फार केला सुटाया ॥
फडफड निजपक्षीं दाविलीही उडाया ॥
नृपतिस मणिबंधीं टोंचिता होय चंचू।
धरिल दृढ जया त्या काय सोडील पंचू? ॥ १२ ॥

तदितर खग भेणें वेगळाले पळाले।
उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥
सजण गवसला जो याचपासीं वसे तो।
कठिण समय येतां कोण कामास येतो! ॥ ॥ १३ ॥

न सोडी हा नळ भूमिपाळ मातें। असें जाणोनी हंस वदे यातें ॥
'हंसहिंसका धन्य तुझ्या हातें। स्वस्थळातें पावेन पक्षपातें ॥ १४ ॥

पदोपदीं आहेत वीर कोटी। भले जुंझार शक्ति जयां मोठी ॥
तयां माराया धैर्य धरीं पोटीं। पांखिरूं हें मारणें बुद्धि खोटी ॥ १५ ॥

वधुनि माझी ही कनकरूप काया। कटकमुकुटादी भूषणें कराया ॥
कशी आशा तुज उद्भवली राया। थोर औदार्य थोर दयामाया! ॥ १६ ॥

म्हातारी उडतां न येच तिजला माता मदीया तसी ॥
कांता काय वदों नवप्रसव ते सातां दिसांची असी ॥
त्राता त्या उभयांस मी मज विधी घातास योजीतसे।
हातामाजिं नृपाचिया गवसलों आतां करावें कसें? ॥ १७ ॥

हरहर सांपडलों, सांपडलों। कैसा फासां पडलों ॥ ध्रु० ॥
इतर नदी जल-टाकीं। टाकुनि आलों याच तटाकीं ॥
सोडुनि मानसकेली। कापुनि घ्याया आलों शेली ॥
ठेविन तव पदिं माथा। आतां सोडवि गा रघुनाथा ॥ १८ ॥

सखे माझे परतोनि घरा येतां। तुवां सजणें हा समाचार घेतां ॥
तया शोकें घायाळ हृदय होतां। कसी होसिल तें आठवितों आतां ॥१९॥

थोर होतील बाळ तुझे बाळे। तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोकसाळे। मला आळवितां हृदय तिचें पोळे ॥ २० ॥

सदय हृदय याचें भूप हा तापहारी।
म्हणुनि परिसतां मी होय येथें विहारी॥
मजहि वध कराया पातकी पातला जो।
वरुनि पति तसा ही भूमि कैसी न लाजो' ॥ २१ ॥
येणेंपरी परिसतां अति दीन वाचा।
हेलावला नळ पयोधि दयारसाचा॥
सोडी वदे "विहर जा अथवा फिराया।
राहें यथा निजमनोरथ हंसराया!" ॥ २२ ॥
सुटुनि खग पळाला बैसला शालशाखे।
क्षणभरि निजदेहीं मुक्तिविश्रांति चाखे॥
स्वजन तंव तयाचे भोंवताले मिळाले।
कवळिति निजबंधू बाष्पबिंदू गळाले ॥ २३ ॥
विसावा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला।
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला॥
म्हणे हंस क्षोणीपतिस "तुज कोण्ही सम नसे।
दयेचाही केवा तुजजवळि देवा बहु वसे ॥ २४ ॥
ऐक राया तूं थोर दयासिंधू। नीतिसुंदर तूं, तूंचि दीनबंधू॥
निखंदूनी बोलिलों नको मंदूं। सकल-वंदनीय पाय तुझे वंदूं ॥ २५ ॥
पारधीमाजी खगा मृगा राजे। करिति हिंसा जे ते बरीच साजे॥
तुवां दिधली मज मोकळीक गा जे। दया केली हे कीर्ति तुझी गाजे॥२६॥
हंस मिळणेंचं कठिण महीलोकीं। सोनयाचा तो नवल हें विलोकीं॥
तशा मजलाही सोडिलें तुवां कीं। तुझा ऐसा उपकार मी न झांकीं॥२७॥
तुझा करपंजर होय मला थारा। तुझा वचनौघं तोचि दुग्धचारा॥
तुझें मानस बहु थोर गा उदारा। सत्यलोकेश तूंचि गुणागारा ॥ २८ ॥
किती रावे असतील तुझ्या धामीं। किती कोकिळ सारिका तसा मी॥
चित्त लागलें हें तुझ्या लगामीं। नृपस्वामी, मज योजिं तुझ्या कामीं॥२९॥
हें पांखिरूं मजहि येइल काय कामा।
ऐसें, नृपा न वद पूरितलोककामा॥

मोलें उणें व्यजनहीं धरितां पुढारीं ।
छाया करूं तपनदीप्तिस तें निवारी ॥ ३० ॥
विरहिसा दिसतोसि महा नळा । तरि हरीन तुझ्या विरहानळा ॥
चतुर जे तरुणी हृदयंगमा । करवितों तिजसीं तुज संगमा ॥ ३१ ॥

## २३. रुक्मिणीस मातेचा उपदेश

जे जे पदार्थ उपयुक्त विवाहकर्मी,
ते आणवी त्वरित राजकुमार रुक्मी; ॥
जों ज्योतिषी त्वरित लग्नघडीस घाली, ।
तों सन्मुख प्रलयसूचक शिंक जाली ॥ १ ॥
येती मेळे वैदिकांपंडितांचे । होती तेथें वाद त्या तांत्रिकांचे ॥
येतां जातां मंडपीं दाटि केली । होती ज्यांच्या या वृथा घालमेली ॥ २ ॥
म्हणेत कोण्ही मधुपर्क आणा । म्हणेत कोण्ही नवरीस न्हाणा ॥
म्हणेत कोण्ही वर सिद्ध जाला । मागेत कोण्ही चवकास सेला ॥ ३ ॥
म्हणेत कोण्ही शुभ लग्न पाहा । म्हणेत कोण्ही उगलेच राहा ॥
म्हणेत कोण्ही नवरी दिसेना । कोण्हास कोण्ही मग हो पुसेना ॥ ४ ॥
आयीकतां व्याकुळ फार जाली, । उठोन माडीवरि माय गेली ॥
म्हणे तिला " चाल, विलंब जाला; । आली असे सन्निध लग्नवेळा " ॥५॥
प्रसुवचनविलासें होतसे त्रास तैसा, ।
अभिनव करिणीला अंकुशाघात जैसा; ॥
तदुपरि जननीच्या ते गळां हात घाली, ।
अभिमत जनयित्री वाक्य बोलों निघाली ॥ ६ ॥
" उगी राहें आतां बहुत वदतां ओष्ठ सुकले ।
नको बोलों कांहीं, अकथित मला ग्रंथ उकले ॥
अवो, तूं दैवाची ! प्रिय, परम अर्धांग हरिचें, ।
तुझ्या हातां आलें सहज निजसाम्राज्य घरिचें ॥ ७ ॥
बाळे, तुवां साहस थोर केलें । । हें द्वारकादैवत आणियेलें ॥
वैकुंठिंचा नायक जो मुरारी, । तो आठवा हा अवतारधारी ॥ ८ ॥

तुम्हांस दोघांसर पाड आहे । पूर्वींच हे गोष्टि कळोन राहे ॥
येथें जयीं हा चुकता विधाता, । येती तयाच्या अपकीर्ति हातां ॥ ९ ॥
सुदेव त्वां चोरुन पाठवीला । मनोरथा घेउनि शीघ्र आला ॥
आईक हे कंप्रिलटक् प्रसंगें । निधान लाधे तुज दैवयोगें ॥ १० ॥
माझ्या मनायोग्य घडोन आलें, । परंतु दुःखास्पद येक जालें; ॥
जाऊन तूं नांदसि सिंधुगर्भी । मी येकली राहिन ये विदर्भी! ॥ ११ ॥
मागेल आतां मज कोण जेऊं ? । कोणास मी उत्तर आजि देऊं ? ॥
वाटेस माझी करिसील खंती । तूं लागसी आजिपसून तंती ॥ १२ ॥
कठीण आहे स्थिति सासुऱ्याची, । पडे मला गोष्टि तुझ्या जिवाची ॥
तूझे गुणीं न्यून कदापि नाहीं, । तथापि पाहें सिकऊंच कांहीं ॥ १३ ॥
घालाघाली घालिती नित्य सासा, । टाकूं बाई नेदिती हा उसासा ॥
पोटागीची माय मी दूर जालें, । लागें आतां नांदणें त्याजखालें ॥ १४ ॥
प्राणेश्वराच्या अति मान्य माता । अलीकडे त्याहुन जाण आतां ॥
तो सासरा साधु बहूत आहे, । आज्ञेंत त्याचे उगलीच राहें ॥ १५ ॥
असे तुझा दारुण ज्येष्ठ भावा । तूं काय त्याच्या करिसी स्वभावा ? ॥
राहों नको त्याजपुढें उभी गे, । तूं सर्वदा तद्वचनास भी गे ॥ १६ ॥
करीत जा आदर त्या दिरांचें, । असोत जे माणुसही तिरांचें; ॥
तेथें असें गे तुज कोण साहे ? । तूं बोल त्यांचे उगलेच साहें ॥ १७ ॥
अखंड गोपीजनवल्लभाचे । ते आदरीजेत समग्र भाचे. ॥
ज्या लाडक्या लांब महाजिभांच्या, । तशाच त्या मानित जाय भाच्या ॥ १८ ॥
असेत तूझ्या नणंदा अहेवा, । उगाच तूझा करितील हेवा; ॥
लागेत जेव्हां तुजसी रुसाया, । तूं देत जा पाट पिढें बसाया ॥ १९ ॥
असेत जे तूज बहूत जावा, । विरोध त्यांसीं न करीत जावा; ॥
त्वां आपलीं आवरिजेत मूलें, । जें नित्य होती कलहास मूळें ॥ २० ॥
तूं सर्व शृंगार करून रातीं, । आधीं पतीचें मन घेय हातीं ! ॥
त्याच्या बऱ्यानें अवघीं बरीं हें । त्यावेगळीं शत्रु तुझीं खरीं हें ॥ २१ ॥
ते स्वामिसेवा तुजला घडावी, । त्याची तुला आवडि आवडावी ॥
त्याच्या मनासी मन मेळवावें, । त्वां नित्य त्याचे मिळणीं मिळावें ॥ २२ ॥

असे जरी तो प्रतिकूल तूसी, । तथापि राहें अनुकूल त्यासीं; ॥
असेल गे पूर्विल पुण्यठेवा, । तरीच हा वल्लभ वश्य व्हावा ! ॥ २३ ॥
घरामधें होतिल सुष्टदुष्टें, । तथापि तूला अवधीं वरिष्टें ॥
उगेच त्यांचे गुण नित्य ध्यावे, । ते बोलतां जाब कदा न द्यावे ॥ २४ ॥
टाकून बाई अभिमान द्यावा, । संसार हा गोड करून घ्यावा; ॥
मुखास येती जरि शब्द मोठे, । तूझ्या गुणांचें तरि मूळ तूटे ॥ २५ ॥
बोलोन जासी जरि वांकडेंसें, । पडेल तूझें तुज सांकडेंसें ॥
येका तुझ्या या तरि गोड बोलें । तें वश्य होती, अवघींच कोल्हे ! ॥ २६॥
तूं हा अहंभाव अशेष सांडी, । पदोपदीं त्वां धरिजेत सांडीं; ॥
वाढेल वा ढंग उगाच जेव्हां, । पुसेल तेथें तुज कोण तेव्हां ? ॥ २७ ॥
त्वां आपला चालवितां घरोबा, । धरूं नये किंचित मात्र लोभा; ॥
तसें अनासक्तपणें असावें, । जळीं जसें पद्मदळें वसावें ॥ २८ ॥
साक्षात सापत्न न दाखवावें, । प्राणेश्वराचें मन वोळखावें ॥
माझें तुझें हें म्हणशील जेव्हां, । परस्परें तूटि पडेल तेव्हां ॥ २९ ॥
हा सोयरा केवळ पांडवांचा, । जो दाहकर्ता हरि खांडवाचा; ॥
कृष्णा सुभद्रेहुन आवडावी, । मैत्री तिसीं हे तुजसी घडावी ॥ ३० ॥
संसार हा बुद्बुदरूप आहे ! । तो स्वामि तूं ईश्वररूप पाहें ॥
संसारकृत्यीं तुजला नवोढे । त्या वल्लभावांचुन कोण वोढे ? ॥ ३१ ॥
संसार हा यद्यपि सज्ज आहे, । तथापि सांगे गुज येक पाहें; ॥
मिळोन जातें मन दंपतीचें, । तरीच घेती सुख संपतीचें ॥ ३२ ॥
आहेसि तूं तों अतिसाहसी गे, । त्याचें कसें कैतव साहसी, गे ? ॥
करी हरी आदर गौळणीचा । कशास त्वां त्या म्हणिजेति नीचा ? ॥३३॥
प्रगल्भता येथुन आदरावी, । हे लोकलज्जा हृदयीं धरावी; ॥
लोकापवादास बहूत भ्यावें । टाकून चित्तांतुन पाप द्यावें ॥ ३४ ॥
असेस तूं सुंदर, फार गोरी, । पापास राहें परि पाठमोरी; ॥
स्वशीळ संरक्षिसि नित्य बाळे, । तरीच तूझा पति तूज भाळे; ॥ ३५ ॥
ज्या सासुरां वर्तति गे उधंटा, । जनांत त्यांचा बहु होय तंटा ॥
नांदेति ज्या गे सुलजा, विनीता, । सर्वांमुखीं त्या अति कीर्तिमंता ॥३६॥

सर्वांपुढें सत्वर त्वां उठावें, । ते नीजल्यानंतर त्वां निजावें; ॥
आदासपर्यंतहि अन्न द्यावें । त्यानंतरें भोजन त्वां करावें ॥ ३७ ॥
त्याच्या घरांतील समस्त राण्या, । रांधून वाढून महा शहाण्या; ॥
पट्टांगना राजशिरोमणीची, । होयीं बरी अग्रणि सुग्रणींची ॥ ३८ ॥
त्वां वागतां पल्लव नीट घ्यावा, । पाचारिल्या मंजुळ जाब द्यावा. ॥
तूं खालतीं पाहुनि नित्य चालें । तूं बोलवील्याविण गे, न बोलें ॥ ३९ ॥
नेसें बरें उत्तम वस्त्र तैसें, । मानें पतीच्या हृदयास जैसें ॥
मानें तया भूषण तेंच ल्यावें । सेवेसि त्याचे परि चित्त द्यावें ॥ ४० ॥
लावीत जा कुंकुम नित्य भाळीं, । सौभाग्य संसूचक सर्वकाळीं ॥
घालीत जा कज्जल नित्य डोळां । सिकें बरा तेथिल सर्व मोळा ॥ ४१ ॥
सदा शुचिष्मंत तुवां असावें, । सदा सतीसन्निध, गे बसावें. ॥
जे उंबऱ्याबाहिर पाय टाकी, । ते आपला लौकिक काय झांकी ? ॥ ४२ ॥
धम्मिल्ल अंधतमरूप भासे, । विक्त्रेंदु नक्तंदिव हा प्रकाशे; ॥
म्हणोन तूझीं स्तनचक्रवाकें । कूर्पासका आड दडोन थाकें ॥ ४३ ॥
घालीं गळां रत्नजडीत गांठी, । देऊं नको भ्रूयुगुळास गांठीं. ॥
प्रसन्नता हे वदनीं असावी, । तरीच लक्ष्मी सदनीं वसावी ॥ ४४ ॥
सन्मान सर्वां वडिलांस द्यावा, । कुलीन हा शब्द म्हणोन घ्यावा; ॥
न घेसि पैशून्य कदापि कानीं, । तरीच तूझें यश लोक वानी ॥ ४५ ॥
तूं संकटीं हा निजधर्म राखें, । कदापि संसारसुखें न माखें; ॥
तत्काळ घालीं अतिथींस भिक्षा । पतिव्रतांची तरि हेच दीक्षा ॥ ४६ ॥
कधींबधीं तूं मज आठवीं गे, । त्यासारिखे आत्मज आठवीं गे ॥
उत्कृष्ट येकीहुन येकयेकी । तथापि तूं वीसिल लेकलेकी ॥ ४७ ॥
त्वां सासुरां उत्तम नांदिजें तें । पतिव्रतासाधन साधिजें ते; ॥
असी तुझी येइल कीर्ति जेव्हां । मला महाभूषण होय तेव्हां ॥ ४८ ॥

■ ■ ■

## ३४. श्रियाळ व चांगुणा यांची सत्त्वपरीक्षा

ऐसें नारद सांगतां वर्तमान। त्याच्या गृहाप्रती पंचवदन ॥
कुश्चळ अतीत वेष धरून। येता झाला ते समयीं ॥ १ ॥
आंगणीं उभा ठाकला येऊन। परम कोपी जेवीं दावाग्न ॥
दुष्टवचन बोले कठीण। रूपही संपूर्ण कुश्चळची ॥ २ ॥
म्हणे मज देईं इच्छाभोजन। नातरी जातों सत्त्व घेवोन ॥
श्रियाळ चांगुणा येऊन। पाय धरिती सद्भावें ॥ ३ ॥
आणोनि बैसविला आसनीं। त्याचीं क्रोधवचनें सोसुनी ॥
षोडशोपचारें पूजा करोनी। कर जोडोनी ठाकती पुढें ॥ ४ ॥
मागा स्वामी इच्छाभोजन। येरू म्हणे नरमांस देईं आणोन ॥
तूं चोर हेर आणसी धरून। त्याचें मांस न घें मी ॥ ५ ॥
धरून माझा उद्देश। विकत आणिसील मनुष्य ॥
तें न घें मी निःशेष। सत्य सत्य त्रिवाचा ॥ ६ ॥
चांगुणा म्हणे कर जोडून। मी आपुलें मांस देतें करीं भोजन ॥
श्रियाळ म्हणे मानेल पूर्ण। माझें मांस देतों मी ॥ ७ ॥
येरू म्हणे तुम्ही पवित्र तत्त्वतां। परी सर्व याचकांचे मातापिता ॥
तुम्हां दोघांसी भक्षितां। अन्नसत्र खंडेल ॥ ८ ॥
तरी तुमचा एकुलता एक स्नेहाळ। पांच वर्षांचा चिलया बाळ ॥
बत्तीसलक्षणी वेल्हाळ। तो मज देईं भोजन ॥ ९ ॥
ऐसें ऐकतां वचन। मायामोहजाळ दूर करून ॥
म्हणती अवश्य जा घेवोन। मग सदाशिव बोलत ॥ १० ॥
मी काय आहें वृक व्याघ्र रीस। भक्षूं तव पुत्राचें मांस ॥
उबग न मानूनि विशेष। पचऊनि घालीं मज आतां ॥ ११ ॥
मायामोह धरून। कोणी कराल जरी रुदन ॥
तरी मी जाईन उठोन। सत्त्व घेवोन तुमचें ॥ १२ ॥
अवश्य म्हणोनी पतिव्रता। उभी ठाकोन बाहे निजसुता ॥
म्हणे बाळा चिलया गुणवंता। खेळावया कोठें गेलासी ॥ १३ ॥

तुजलागीं खोळंबला अतीत । बाळा माझ्या येईं धांवत ॥
ऐसें ऐकतां अकस्मात । बाळ आला धांवोनी ॥ १४ ॥

अतीतासी करूनि नमन । मातापितयांचे धरी चरण ॥
माता म्हणे तुझें पिशितदान । अतीत मागतो राजसा ! ॥ १५ ॥

बाळ बोले स्नेहेंकरून । हा देह म्यां केला शिवार्पण ॥
अतीत होतां तृप्त पूर्ण । उमारमण संतोषेल ॥ १६ ॥

ऐसें ऐकतां झडकरी । बाळ घेतला कडियेवरी ॥
पाकशाळेभीतरीं । घेऊनि गेली वधावया ॥ १७ ॥

चिलयासी चुंबन देऊन । हृदयीं धरला प्रीतीकरून ॥
बाळ म्हणे पुढती येईन । तुझ्या उदरां जननीये ॥ १८ ॥

मायाजाळ सर्व सोडोन । मन केलें वज्राहून कठीण ॥
चिलयाचें शिर छेदून । काढिलें मांस आंगींचें ॥ १९ ॥

आपणासी पुत्र नाहीं म्हणोनियां । शिरकमळ ठेविलें पाहावया ॥
शरीराचा पाक करूनियां । उठवी भोजना अतीतातें ॥ २० ॥

अतींद्रियद्रष्टा श्रीशंकर । अनंतब्रह्मांडींचा समाचार ॥
सर्व ठाउकें सूत्रधार । कळलें शिर ठेविलें तें ॥ २१ ॥

उठोनि चालिला तात्काळ । धांवती चांगुणा श्रियाळ ॥
येरू म्हणे कळलें सकळ । शिरकमळ ठेविलें ॥ २२ ॥

सर्व गात्रांत शिर प्रधान । तेंच कैसें ठेविलें वंचून ॥
तंव तीं दोघें धरती चरण । तेंहि पचऊनि घालितों ॥ २३ ॥

क्षोभ न धरावा अंतरीं । नेणतेपणें चुकलों जरी ॥
तरी सर्वथा तूं क्षमा करीं । सत्त्व आमुचें राखावें ॥ २४ ॥

मग बैसला आसनीं येऊन । म्हणे शिर येईं बाहेर घेऊन ॥
उखळांत घालून कंडण । मजदेखत करीं आतां ॥ २५ ॥

अश्रू आलिया तुझ्या नयनीं । कीं कष्टी झालिया अंतःकरणीं ॥
तरी पुत्र गेला सत्त्वास हानी । करून जाईन तुमच्या ॥ २६ ॥

अवश्य म्हणे नृपललना । शिर आणोनि करी कंडणा ॥
सत्त्व पाहे कैलासराणा । अंतरीं सद्गद होउनी ॥ २७ ॥

निजसत्त्वाचें उखळ । धरिलें धैर्याचें करीं मुसळ ॥
कांडीत बैसली वेल्हाळ । निर्धार अचळ धरूनियां ॥ २८ ॥

अतीत म्हणे परम मंगळ । गीत गाय रसिक सुढाळ ॥
खंती करितां पयःफेनधवल । दुरावेल जाण पां ॥ २९ ॥

ते सद्भावसरोवरविलासिनी । कोमळ हृदय नृपकामिनी ॥
कीं निश्चळ गंगा भरूनी । जात मर्यादा धरूनियां ॥ ३० ॥

तिचें पाहतां निजवदन । काळवंडला रोहिणीरमण ॥
मृगशावाक्षी गुणनिधान । उपमा नाहीं स्वरूपातें ॥ ३१ ॥

म्हणे कोमळांगा बाळा सुकुमारा । सुलक्षणा सुशीला नृपकिशोरा ॥
सुहास्यवक्त्रा राजीवनेत्रा । येवोनी उदरा धन्य केलें ॥ ३२ ॥

तूं सुकुमार परम गुणवंता । माझे निष्ठुर घाव लागती माथां ॥
तुजवीण परदेशीं आतां । दुबळी भणंग झालें मी ॥ ३३ ॥

कुचकमंडलीं अतिसुंदरा । कंचुकीबाहेर फुटल्या दुग्धधारा ॥
कीं भूलिंगासी एकसरा । गळत्या लाविल्या तियेनें ॥ ३४ ॥

म्हणे अतीत जेवोनि अवधारी । जाऊंदे राजद्वाराबाहेरी ॥
देह त्यागीन ये अवसरीं । यावरी धीर न धरवे पैं ॥ ३५ ॥

कैलासपंथ लक्षून । सखया एकला जातोसि मज टाकून ॥
तुझे संगतीं मी येईन । उभा राहे क्षणभरी ॥ ३६ ॥

तूं मोक्षद्वीपाचें केणें भरून । जासी कैलासराजपेठ लक्षून ॥
तुझे संगतीं मी उद्धरेन । मज टाकूनि जाऊं नको ॥ ३७ ॥

उदकावीण जैसा मीन । तैसी मी तान्हया तुजवीण ॥
माझें हृदय निर्दय काठिण । लोकांत वदन केवीं दाऊं ॥ ३८ ॥

तुझी माउली मी म्हणतां । लाज वाटे रे गुणवंता ॥
तुवां आपुली सार्थकता । करूनि गेलासी शिवपदा ॥ ३९ ॥

हें त्रिभुवन शोधितां सकळ । तुजऐसा न दिसे बाळ ॥
मग तें पचऊनि तात्काळ । उठा म्हणे अतीतातें ॥ ४० ॥

अतीत म्हणे अवनीपती । उठा तुम्ही यजमान माझे पंक्ती ॥
ऐसें ऐकतां श्रियाळ नृपती । झाला चित्तीं संकोचित ॥ ४१ ॥

चांगुणा म्हणे नृपनाथा । सत्त्व राखावें सत्वर आतां ॥
विन्मुख जाऊं न द्यावें अतीता । मनीं चिंता न धरावी ॥ ४२ ॥
नवमास वाहिला म्यां उदरांत । तुम्हांस जड नव्हे चौंप्रहरांत ॥
पोटींचा पोटीं घालितां सुत । चिंता काय नृपश्रेष्ठा ॥ ४३ ॥
राव बैसला पंक्तीसी । ताट वाढोनि आणिलें वेगेसी ॥
अतीत म्हणे चांगुणेसी । तूंही येई सवेग ॥ ४४ ॥
अवश्य म्हणोनि झडकरी । येवोनि बैसली नृपसुंदरी ॥
यावरी अतीत म्हणे तुमच्या मंदिरीं । अन्न न घ्यावें सर्वथा ॥ ४५ ॥
निपुत्रिकांचें न पाहावें वदन । मग तेथें कोण घेईल अन्न ॥
दीपेंवीण शून्य सदन । पुत्रावीण तेवीं तुम्हीं ॥ ४६ ॥
नासिकेवांचोनि वदन । कीं वृक्ष जैसा फळावीण ॥
कीं बुबळावीण जैसे नयन । शून्य सदन तुमचें तेवीं ॥ ४७ ॥
तंव तीं दोघें बोलती सद्गदित । एक होता तो अर्पिला सुत ॥
चांगुणा म्हणे गेलें सत्त्व । अतीत विन्मुख जाईल आतां ॥ ४८ ॥
एक बाळ तो दिधला भोजनासी । आतां महाराजा सत्त्व किती पाहसी ॥
ऐसें बोलतां चांगुणेसी । अद्भुत गहिंवर दाटला ॥ ४९ ॥
म्हणे सत्त्वही बुडालें सकळ । वृथा गेलें माझें बाळ ॥
मग कंठ मोकळा करून ते स्नेहाळ । हाक फोडी चांगुणा ॥ ५० ॥
नयनीं चालल्या प्रेमाश्रुधारा । म्हणे अहा शिवकर्पूरगौरा ॥
दीर्घस्वरें बाहे उमावरा । पाव सत्वरीं या आकांतीं ॥ ५१ ॥
अहा झालें वंशखंडन । न देखों पुढती पुत्रवदन ॥
ऐसें ऐकतां अतीताचे नयन । स्रवों लागले प्रेमभरें ॥ ५२ ॥
बाहेर फुटली मात । वळसा थोर होत नगरांत ॥
लोक दुःखें वक्षःस्थळ पिटीत । राजकिशोर आठवूनी ॥ ५३ ॥
विमानीं दाटले सुरवर । म्हणती धन्य पतिव्रता सत्त्वधीर ॥
ईस प्रसन्न होवोनी श्रीशंकर । काय देईल तें न कळेचि ॥ ५४ ॥
अतीत म्हणे चांगुणेसी । जें प्रिय असेल तुझे मानसीं ॥
तें मज माग सद्गुणराशी । यावरी सती काय बोले ॥ ५५ ॥

मज निपुत्रिक म्हणतील लोक । हा धुवोनि काढी कलंक ।।
ऐसें ऐकतां कैलासनायक । बोलावी म्हणे पुत्रासी ।। ५६ ।।

सत्य मानूनि अतीतवचना । दीर्घ हांका फोडित चांगुणा ।।
म्हणे चिलया गुणानिधाना । येईं स्नेहाळा धांवोनी ।। ५७ ।।

अतीत तुजविण न घे ग्रास । कोठें गुंतलासी खेळावयास ।।
माझें तान्हें तूं पाडस । सत्त्व राखें येवोनिया ।। ५८ ।।

तूं न येसी जरी धांवोन । तरी माझा जाऊं पाहे प्राण ।।
दशादिशा विलोकून । चांगुणा पाहे तेधवां ।। ५९ ।।

मागुती हाक फोडी वेल्हाळ । तों जैसे उगवे मित्रमंडळ ।।
तैसा धावतचि आला बाळ । पाहे श्रियाळ स्नेहभरें ।। ६० ।।

अतीत स्वरूप टाकून । शिव प्रगटला निजरूप पूर्ण ।।
दशहस्त पंचवदन । दीनोद्धारण जगद्गुरू ।। ६१ ।।

## ३५. धनुर्भङ्ग

जैसा निद्रिस्थसिंह जागा केला । कीं याज्ञिकें जातवेद फुंकिला ।।
तैसा विश्वामित्रें ते वेळां । खुणाविला रघुवीर ।। १ ।।

म्हणे नरवीरपंचानना । त्रिभुवनवंद्या राजीवनयना ।।
पुराणपुरुषा रघुनंदना । अरिमर्दना ऊठ वेगीं ।। २ ।।

कमलोद्भवजनका उदारा । ताटिकांतका अहल्योद्धारा ।।
मखपाळका समरधीरा । असुरसंहारका ऊठ वेगीं ।। ३ ।।

जैसी निशा संपतां तात्काळ । उदयाद्रिवरी ये रविमंडळ ।।
तैसा राम तमालनीळ । उठून उभा ठाकला ।। ४ ।।

कीं महायाग होतां पूर्णाहुती । तात्काळ प्रगटे आराध्यमूर्ती ।।
तैसा उभा ठाकला रघुपती । राजे पाहती टकमकां ।। ५ ।।

कीं प्रल्हादाकारणें झडकरी । स्तंभांतूनि प्रगटे नरहरी ।।
कीं वेदान्तज्ञान होतां अंतरीं । निजबोध जेवीं प्रगटे ।। ६ ।।

वंदोनिया गुरुचरणा । सवेंचि नमिले सकळ ब्राह्मणा ।।
पूर्ण ब्रह्मानंद रामराणा । वेदपुराणा वंद्य जो ।। ७ ।।

श्रीराम विरक्त ब्रह्मचारी । हे रमा आपणावीण कोणा न वरी ॥
यालागीं शरयूतीरविहारी । उठता जाहला तेधवां ॥ ८ ॥
सभेस बैसले नृपवर । केले नानापरी शृंगार ॥
परी सर्वांत श्रेष्ठ श्रीरामचंद्र । रोहिणीवर भगणांत जैसा ॥ ९ ॥
कीं शास्त्रांमाजी वेदान्त । कीं निर्जरांमाजी शचीनाथ ॥
तैसा श्रीराम समर्थ । सभेंत मुख्य विराजे ॥ १० ॥
उठिला देखोनि श्रीरामचंद्र । उचंबळला सीतेचा सुखसमुद्र ॥
नवमेघश्यामल रघुवीर । रंगमंडपाप्रति आला ॥ ११ ॥
कोटि अनंग ओंवाळून । टाकावे ज्याच्या नखावरून ॥
जो अरिचक्रवारणपंचानन । जात लक्षून धनुष्यातें ॥ १२ ॥
देखतां राम सकुमार । घाबरलें सीतेचें अंतर ॥
म्हणे कोमळगात्र रघुवीर । प्रचंड थोर धनुष्य हें ॥ १३ ॥
कूर्मपृष्ठी जैसी कठोर । तैसें हें कोदंड प्रचंड थोर ॥
दशरथकुमार सकुमार । कैसें उचलेल तयातें ॥ १४ ॥
मदनदहनाचें धनुष्य थोर । रघुनाथमूर्ती मदनमनोहर ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ १५ ॥
घनश्याम कोमळगात्र । राजकुमार राजीवनेत्र ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ १६ ॥
बळहत केला दशकंधर । परम कोमळ रघुपतीचे कर ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ १७ ॥
वाटे खुपती कोमळ कर । ऐसी रामतनू सुकुमार ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ १८ ॥
मज गमेचि दुसरा वर । तुज सत्य करणें पण साचार ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ १९ ॥
चंडीशकोंदंड प्रचंड थोर । लघुआकृती राम निर्विकार ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ २० ॥
श्रीरामावांचून इतर । पुरुष तुजसमान साचार ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ २१ ॥

दुजा वरावया येतां वर । देह त्यागीन हा निर्धार ॥
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥ २२ ॥
सीता विजयेसीं म्हणे अवधारीं । बाप नव्हे हा वाटतो वैरी ॥
हा पण त्यजोनी निर्धारीं । रामासी मज अर्पीना ॥ २३ ॥
ऐसें सीतेचें अंतर । जाणोनियां जगदोद्धार ॥
दंड पिटोनि प्रचंड थोर । कोदंडासमीप पातला ॥ २४ ॥
दशरथ महाराज दिग्गज । त्याचा छावा रघुराज ॥
धनुष्यइक्षु देखोनि सहज । परम चपळ धांविन्नला ॥ २५ ॥
श्रीरामसव्यबाहु प्रचंड । हाचि वरी केला शुंडादंड ॥
भवधनुइक्षु द्विखंड । करील आतां निर्धारें ॥ २६ ॥
दशकंधर हें पद्मकानन । वीस हस्त द्विपंच वदन ॥
तीस कमळें हींच पूर्ण । कोदंड जाण इक्षु तेथें ॥ २७ ॥
पद्मवनीं गज निघे लवलाहीं । मग त्यासीं कमळांचीं गणना काई ॥
तैशीं दशमुखाचीं हस्तकमळें पाहीं । तुडवीत आला रघुवीर ॥ २८ ॥
तटस्थ पाहती सकळ जन । म्हणती विजयी हो कां रघुनंदन ॥
सीता नवरी हे सगुण । यासींच वालो निजमाळा ॥ २९ ॥
आनंदमय सकळ ब्राह्मण । चिंतिती रामासी जयकल्याण ॥
म्हणती हें भवचाप मोडून । टाको रघुवीर सत्वर ॥ ३० ॥
एक म्हणती राम सकुमार । नीलपंकजतनू वयकिशोर ॥
भवकोदंड प्रचंड थोर । उचलेल कैसें रामातें ॥ ३१ ॥
एक म्हणती चिमणें ठाण । एक म्हणती सिंह दिसतो लहान ॥
परी पर्वताकार गज विदारून । न लगतां क्षण टाकितो ॥ ३२ ॥
घटोद्भव लहान दिसत । परी क्षणें प्राशिला सरितानाथ ॥
गगनीं सविता लघु भासत । परी प्रभा अद्भुत न वर्णवे ॥ ३३ ॥
असो ते वेळें रघुवीर । विद्युत्प्राय उत्तरीयचीर ॥
तें सरसावोनि सत्वर । कटिप्रदेशीं वेष्टिलें ॥ ३४ ॥
माथां जडित मुकुट झळकत । आकर्णनेत्र आरक्तरेखांकित ॥
मस्तकींचे केश नाभीपर्यन्त । दोहींकडोनी उतरले ॥ ३५ ॥

किशोरवयातीतभूषण । अलकसुवासें भरलें गगन ॥
त्या सुवासासी वेधून । मिलिंदचक्र भ्रमतसे ॥ ३६ ॥
श्रीरामतनूचा सुवास पूर्ण । जात सप्तावरण भेदून ॥
असो तें शिवधनुष्य रघुनंदन । करें करोनि स्पर्शित ॥ ३७ ॥
नीळवर्ण कुंतल ते अवसरीं । पडले दशकंठाचे हृदयावरी ॥
विषकंठवंद्य ते अवसरीं । सांवरोनि मागें टाकित ॥ ३८ ॥
शिवधनुष्यासीं घंटा सतेज । वरी विद्युत्प्राय झळके ध्वज ॥
त्यासमवेत रघुराज । उचलिता जाहला ते काळीं ॥ ३९ ॥
गज शुंडेनें आक्रमी इक्षुदंड । तैसें रामें आकर्षिलें कोदंड ॥
पराक्रम परमप्रचंड । दशमुंड विलोकीतसे ॥ ४० ॥
परमम्लान द्विपंचवदन । दृष्टीं देखोनि गाधिनंदन ॥
म्हणे नरवीरश्रेष्ठा वेगेंकरून ॥ संशय हरणें सर्वांचा ॥ ४१ ॥
जनक म्हणे कौशिकमुनी । ज्या चापें दशकंठ घोळिला धरणीं ॥
तें धनुष्य रामाचेनी । कैसें उचलेल नेणवे ॥ ४२ ॥
जनकासी म्हणे ऋषि कौशिक । श्रीराम महावैकुंठनायक ॥
अद्‌भुत करील कौतुक । पाहें नावेक उगाची ॥ ४३ ॥
इकडे रामें धनुष्य उचलून । क्षण न लगतां वाहिला गुण ॥
ओढी ओढिली आकर्ण । सुहास्यवदनें तेधवां ॥ ४४ ॥
श्रीरामाचें बळ प्रचंड । ओढीस न पुरेचि भवकोदंड ॥
तडाडिलें तेणें ब्रह्मांड । चाप करकरिलें तेधवां ॥ ४५ ॥
मुष्टीमाजी तडाडित । जैशा सहस्र चपळा कडकडित ॥
विधि आणि वृत्रारि हडबडित । वाटे कल्पान्त जाहला ॥ ॥४६ ॥
उर्वीमंडळ डळमळित । भोगेंद्र मान सरसावित ॥
दंतबळें उचलोनि देत । आदिवराह पाताळीं ॥ ४७ ॥
सभा सकळ मूर्च्छित जाहली । महावीरांचीं शस्त्रें गळालीं ॥
राजे भाविती उर्वी चालिली । रसातळा आजीच ॥ ४८ ॥
रामें चाप केलें द्विखंड । प्रतापें भरलें ब्रह्मांड ॥
पुष्पसंभार उदंड । वृंदारक वर्षती ॥ ४९ ॥

सभा अवघी जाहली मूर्च्छित । परि एक चौघे सावध पाहत ॥
जनक आणि गाधिसुत । सीतासौमित्र चौघेंही ॥ ५० ॥
असो भवकोदंड मोडोनी । द्विखंडें रामें टाकिलीं धरणीं ॥
रावण उठोन ते क्षणीं । अधोवदनें चालिला ॥ ५१ ॥
सभेस मारावया आणिती तस्कर । तैसा म्लान दिसे दशवक्त्र ॥
कीं रणीं अपेश आलिया महावीर । त्याचा मुखचंद्र उतरे जेवीं ॥५२॥
कीं दिव्य देतां खोटा होत । मग तो मुख न दाखवी लोकांत ॥
तैसा प्रधानेंसीं लंकानाथ । गेला त्वरित स्वस्थाना ॥ ५३ ॥
पुण्य सरतां स्वर्गींहूनि खचला । कीं याज्ञिकें अंत्यज बाहेर घातला ॥
कीं द्विजयाति भ्रष्ट जाहला । तो जेवीं दवडिला पंडितीं ॥ ५४ ॥
याचि प्रकारें सभेंतुनी । रावण गेला उठोनी ॥
जैसा केसरीच्या कवेंतुनी । जंबूक सुटला पूर्वभाग्यें ॥ ५५ ॥
असो इकडे विजयी रघुनंदन । जैसा निरभ्रनभीं चंडकिरण ॥
सकुमार नवघनतनु सगुण । भक्तजन पाहती ॥ ५६ ॥
सर्वांचे नयनीं अश्रुपात । ऋषिचक्र सद्गदीत ॥
हा कोमळगात्र रघुनाथ । काठिण चाप केंवी भंगिलें ॥ ५७ ॥
श्रीराम सौकुमार्याची राशी । विश्वामित्र धावोनि वेगेंसी ॥
रघुवीर आलिंगिला मानसीं । प्रेमपूर न आवरे ॥ ५८ ॥
म्हणे आदिपुरुषा पूर्णब्रह्मा । स्मरारिमित्रा आत्मयारामा ॥
भक्तकामकल्पद्रुमा । अद्भुत लीला दाविली ॥ ५९ ॥
तुझ्या करणीवरूनि लावण्यखाणी । ओंवाळावी वाटे समग्र धरणी ॥
आणि या जीवाची कुरवंडी करोनी । तुजवरोनी सांडावी ॥ ६० ॥
इतुक्यांत करिणीवरोन लावण्यखाणी । खालीं उतरोनी तेच क्षणीं ॥
माळ घेऊन जनकनंदिनी । हंसगमनी चमकत ॥ ६१ ॥
मेदिनी म्हणे मी धन्य । माझी कन्या वरील रघुनंदन ॥
श्रीराम जामात सगुण । मनमोहन जगद्वंद्य ॥ ६२ ॥
श्रीराम जगाचा जनिता । जानकी सहजचि जगन्माता ॥
तारावयासी निजभक्तां । आली उभयतां रूपासीं ॥ ६३ ॥

श्रीराम सच्चिदानंदघनतनु । जो पुराणपुरुष पुरातनु ॥
जो पूर्णावतारी पूर्णब्रह्मधनु । सकळ तनूंचा साक्षी पैं ॥ ६४ ॥
आदिमध्य जो अंतीं । परी हाचि एक सीतेचा पती ॥
तुच्छ करून सकळ नृपती । वरी रघुपती प्रियकर ॥ ६५ ॥
हंसगती जानकी चालत । पदभूषणें मधुर गर्जत ॥
गळां माळ घालूनि त्वरित । मस्तक चरणीं ठेविला ॥ ६६ ॥
गळां घालितांचि माळ । जाहला स्वानंदाचा सुकाळ ॥
वाद्यें वाजों लागलीं तुंबळ । नादें निराळ दुमदुमिले ॥ ६७ ॥

## ३६. ध्रुवचरित्र—तपश्चर्यावर्णन

(कडाका छंद)

पांचा वरुषांचें मूल, कदा न करि मूळमूल, खाउनि फळें कंद मूल, करी पातक निर्मूळ, मूळमंत्र जपुनि देव पुजी जाणुनि वाहे फूल, सेवुनि कालिंदिचें कूल, नेसूनि वल्कलें दुकूल, ध्यानिं मानस अनुकूल, जेव्हां भुकेचि ये भूल, तेव्हां म्हणे वाय हूल, बांधुनि धैर्याचा पूल, कधीं न पेटवी चूल, जसा शूळपाणी धुळीमध्यें कंथा ना झूल, सुखें डुलतसे भक्तिपथें टाकित पाऊल, शुद्ध जेविं तूल हळू वस्तु मात्र वासुदेव हेंचि धन करी वसूल, कदा व्याकुल नव्हे गोकुळपतीसि बकुलकुसुम सुकलेसें वाहे सुकलें पान मोकली तरु ते उकलुनि, मग सकल दिवस ढकलुनि, खाय कलरवशिशु विकल न तो अकळुनि, मन शिकल करुनि शाकशाकल पिकलेंसें फळ तुळसिचें दळ अंजळिनें जळ घेउनि, असुनि विजनिं बसुनि, अजन हरिचें पूजन करित भजनाचि प्रिय झाला हो. । त्याला देव साह्य झाला हो. ॥

सदा मानसीं वितृष्ण, बळें सोशितसें उष्ण, पुढें कृष्णमृगा देखुनि म्हणे, 'कृष्ण कृष्ण कृष्णगड्या वृष्णिकुलोत्तंस महाविष्णुदेव तूंचि काय? कृष्णातटीं जन्मलासि, कृष्णाहिदमन, तुवां कृष्णा रक्षिलि, दिससि कृष्ण-

सारथी, अखंड कृष्णमुनी वर्णितसे, आसाई करूं,' वंदुनि नमन करी क्षणक्षणा प्रदक्षिणासहित चित्त दक्षिणा देउनि, गवतभक्षणार्थ घाले धरुनि ब्रह्म लक्षणासुलक्षणाविचक्षणाग्रणी तृणासनीं बसवितां मृणालमृदुभुजें घृणा त्यजूनि, त्यासि आलिंगी विना कळगुणापरी गुणास गुण गुण गुण गाय तरुत्वचा झुणा नेसुनि, उणा भाव दिसों नेदी खग नग मृग अग ढग ते हरिजिवलग झग झग मग भगणसहित गगन धरुनि, जग नग भगवंत सकल भक्तिभानु उगवला तो तन्मय. तेणें कृष्णरूप झाला हो. ॥ त्याला देव साह्य झाला हो. ॥

( चूर्णिका )

सांप्रत कलंकी अवतार झाला नसतांहि म्लेच्छसंहारादिभगवच्चरित्रें व्यासाज्ञेनें जयदेवादिकीं अष्टपदींत वर्णिलीं. तीं श्रोत्यांहीं साधुसाधु शब्दें अतिसत्कारें आकर्णिलीं, अधुनाहि भाविभगवद्गुणानुवादवर्णनपरिणालिका चालिली, याच प्रकारें नारदें ध्रुवातें हरिकथापरिपाठीं सांगितली, 'रे रे ध्रुवा ताता! पूर्ण परब्रह्म रामकृष्णादि अवतार पुढें जन्मतील, त्यांची लीला निःशंक गात जावी; लज्जा त्यजावी; चरित्रें पाठ करावीं; नामें दीर्घस्वरें उच्चारावीं.' हें आज्ञा स्मरोनि ध्रुव मधुवनचारी उत्तमाधिकारी यमुनातीरविहारी कृतशौच दंतधावनोत्तर प्रातःस्मरणपूर्वक स्नानसंध्यादिक आवश्यक आचरोनि, हरिकीर्तनीं रंगला, करतालिकायुक्तनर्तनहावभावसहित नामावर्तन करूं लागला. हरिचर्चानुकीर्तनामाजीं यमुनेचें नीलोदक घननीलहरिमय पाहे; तव प्रवाहजलौघीं मत्स्य देखतां मत्स्यावतारहरीसी बाहे. तो न बोलतां म्हणे, 'त्राहें त्राहें.' पुढें कांसव अवलोकितां वासवानुजकूर्मावतार जाणोनि तटस्थ राहे तो अंतरीं हरिपणें क्षणेक लाहे. मग हरिनाममंत्रोच्चारें अवगाहे. विदेहस्थितीनें दोन चार हात वाहे. तो जळपान करितां सूकर देखिला. तो वराहावतार लेखिला. म्हणे, 'वसुंधरा दंष्ट्रेसि धरिली ते तुम्हीं काय?' केली बहुधा सर्वभूताश्रयें करोनि ठेविली. तंव अंघ्रि सिंह विलोकितां म्हणे, 'जय जय नरहरी! तुज चिंतितां चिंतितां

तत्काळ होय नर हरी. जय जय भवगजकेसरी ! परिहरीं भेदमति दूसरी. जय जय अंतर्यामी वामना ! आतां आवरीं या मना. जय जय भार्गवरामा ! तुम्हीं कां न वरिली श्री रामा ? जय जय दाशरथी श्रीरामचंद्रा ! सांद्रानंद-विग्रहसमुद्रा ! जय जय श्रीकृष्ण यशोदानंदवर्धन ! गोवर्धनोद्धरण ! पूतनातृणावर्तअघबकधेनुकवत्सअरिष्टकेशिकुवलयापीडकंसचाणूरकालयवना-दिअसुरमर्दन ! जनार्दनार्जुनरथाश्वचाळक ! पांडवप्रतिपाळक ! बाळक मी तुज आठवितों. केव्हां भेट देसी, कै वैकुंठींहून येसी; प्रसन्न होय श्रीमद्धृषीकेशी ! आलिंगीन हृदयेंशीं. चरण मार्जीन केशीं. याप्रकारें सर्व-स्मरणपूर्वक कृष्णस्मरणीं प्रवर्तला. ॥

( कडाका छंद )

कृष्णगीत गात गात, समाधिस्थ उभा राहे, शुभाचरणसहित सर्व सुभापणें आवरोनि नभामध्यें उभारिला माला, तटस्थ तमा इभालागिं भार देतां नाव जशी डगमगिती, तेविं भुमी सलिल शैल कानन कंपायमान ध्यानसहित प्राणरोधें लोक सकळ विकळ होउनि वैकुंठा शरण गेले; चरण धरुनि म्हणति, ' देवा ! मरण आलें काय नेणों. करणें कांपताति. सांग आतां बा ! करणें कैसें ? सांग तरणोपायासि. उदरभरणाविण गेलों. ' अमृततरण घोटवेना तरुणतरणितुल्य ताप सुखा परहित तापभरें आपशुष्क अधर देखुनि जगद्व्याप मेघगंभीर संलाप करुनि आश्वासि, ' सुरवर हो ! भिऊं नका ध्रुवबाळक तप करितो त्यासि मी प्रसन्न होतों. सर्व तुम्ही सुखी व्हाल, सुधा प्याल, ख्याल गाउनि ध्याल माझें नाम, भवव्याळरहित व्याल पुत्रपौत्र; अरे ! न्याल माझी मूर्ति मनीं ध्याल, तै भ्याल काय, भवालागीं ल्याल, बरें निर्भय मग याल निजानंदपदीं. ' असें वदुनि अशेष दुःख हरुनि दुःखदहन सहनशील गहनाशय वहन करुनि गरुड, दिव्य गरुडध्वज ध्रुवापुढें आला हो. । त्याला देव साह्य झाला हो. ॥

## ३७. सीतागीत

यज्ञासाठीं भूमी नांगरीतां धन्या। सांपडली कन्या सीतादेवी. ॥ १ ॥
जनकाची पुत्री दुर्जना दुर्मिळा। ती भार्या उर्मिळा लक्ष्मणाची. ॥ २ ॥
जनकाचा बंधू होता एकनिष्ठ,। वयानें कनिष्ठ, श्रेष्ठ गुणें. ॥ ३ ॥
तेणें भरतासी मांडवी दुहिता। दिली, जी सुहिता दोन्ही कुळीं. ॥ ४ ॥
शत्रुघ्नाला दिली दुजी श्रुतकीर्ती,। जीची गाती कीर्ती पतिव्रता. ॥ ५ ॥
चवघी बाहिणी भाग्यें झाल्या जावा,। त्यांचा गीतीं गावा सुसंवाद. ॥ ६ ॥
वनवासवृत्त सीतेसी पुसती। प्रेमें त्या सुसती तिघीजणी. ॥ ७ ॥
सीता म्हणे-ऐका वनवासकथा,। परी मनीं व्यथा न धरावी. ॥ ८ ॥
चित्रकूटाहूनि पादुका घेऊनी। वियोग देउनी तुम्ही आलां. ॥ ९ ॥
आम्हीही तेथूनी तशींच निघालों। वनांत रिघालों तिघेंजणें. ॥१०॥
लक्ष्मण भावोजी मागें, पुढें स्वामी,। मज आहें धामीं ऐसें वाटे. ॥ ११ ॥
न बाधेची मज उष्ण क्षुधा तृषा,। तुम्हांपाशीं मृषा न बोलावें. ॥ १२ ॥
जेव्हां कांहीं वाटे चालतां मी मागें,। मुरडोनि मागें विलोकिती. ॥ १३ ॥
बाई! काय सांगों स्वामीची ती दृष्टी,। अमृताची वृष्टी मज होय. ॥ १४ ॥
अत्रीच्या आश्रमीं नेलें मज वाटे,। माहेरची वाटे खरें खुरें. ॥ १५ ॥
अनुसूया सती करी वेणी फणी,। आनंदाची धणी दिली मज. ॥ १६ ॥
आजवरी ओली चंदनाची उटी,। आली नाहीं तुटी माळागुणीं. ॥ १७ ॥
ऋषीतें वंदीत गेलों गोदातटीं,। जेथें पंचवटी पुण्यस्थान. ॥ १८ ॥
भावोजींनीं केली माझी बहु सेवा,। ती त्या महादेवा ठावी असे. ॥१९॥
तेथें शूर्पणखी भार्या व्हाया आली,। तिला माझी भ्याली चित्तवृत्ती. ॥२०॥
भावोजींनीं तिचा कर्णनासा छेद। केला, कीं ते वेदशास्त्रार्थज्ञ. ॥ २१ ॥
तीचा भाऊ खर होऊनीयां क्रुद्ध। करावया युद्ध आला बाई! ॥ २२ ॥
चवदा सहस्र राक्षस पापिष्ठ। रणीं केले पिष्ठ स्वामींनीं ते. ॥ २३ ॥
तीणें घ्राण रक्तें मुख मळवीलें,। वृत्त कळवीलें रावणासी. ॥ २४ ॥
छळाचा उपाय मनीं आठवीला,। दुष्टें पाठवीला मायामृग. ॥ २५ ॥

स्वर्णरत्नमय मृग म्यां देखीला, । तो सत्य लेखीला मनामध्यें. ॥ २६ ॥
गृहा आणावया मागें हरीणा मी, । दुःख परीणामीं नेणोनीयां. ॥ २७ ॥
मज रक्षावया लक्ष्मणा ठेवूनी, । निघाले घेऊनी धनुर्बाण. ॥ २८ ॥
मायामृगामागें जगदेक शूर, । गेले बहू दूर अरण्यांत. ॥ २९ ॥
कपटी राक्षस जाणोनियां प्राण । घ्यावयासि बाण मोकलीला. ॥ ३० ॥
तो बाण लागतां हृदय विदारी, । दुष्ट हांक मारी स्वामीवाणी. ॥ ३१ ॥
'हा सीते! हा बंधो! लक्ष्मणा! ये धावें, । अंतकाळीं पावें, भेटावया'.॥३२॥
मज वाटे माझ्या स्वामीचीच हाक, । शिरे कंप धाक हृदयांत. ॥ ३३ ॥
मी म्हणें, 'भावोजी! धांवा, रक्षा प्राण, । हे घ्या चापबाण, उठा वेगीं' ॥३४॥
भावोजी म्हणती, 'राक्षसाची माया, । कोण रामराया पाहों शके?' ॥३५॥
वाटलें तें वाक्य सत्य परी खोटें, । झालें दुःख मोठें माझ्या मनीं. ॥ ३६ ॥
न वदावें तेची बोलिल्यें मी कोपें, । चित्र शब्दरोपें विदारीलें ॥ ३७ ॥
'वांछितोसि दुष्टा अग्रजाचा घात, । माझ्या आंगा हात लावावया. ॥ ३८॥
हात लावीतांची सोडीन मी प्राण, । शिरीं पादत्राण कोण वाहे? ॥ ३९ ॥
माझ्या दृष्टीपुढें नको राहों, जाच, । नरकींचा जाच मूर्त तूंची '. ॥ ४० ॥
ऐशी वाई! माझी ऐकतांची वाणी, । डोळां आलें पाणी भावोजींच्या.॥४१॥
मातेनें दापीतां वत्स पित्याकडे । जाय, तैसें घडे लक्ष्मणासी. ॥ ४२ ॥
साधूसी गांजीतां झालें सध्या फळ, । सज्जनाचा छळ करूं नये. ॥ ४३ ॥
वाटेंत धनुष्य ओढोनियां रेघ । गेले दयामेघ स्वामीकडे. ॥ ४४ ॥
तों आला रावण होवोनी संन्यासी, । न कळे अन्यासी छद्म त्याचें. ॥४५॥
भिक्षा वाया गेल्यें रेघेच्या बाहेर, । सासूर माहेर बुडवाया. ॥ ४६ ॥
न लंघीतें जरी धनुष्याची रेखा, । तरी त्याचा लेखा काय होता? ॥ ४७ ॥
रेघेच्या बाहेरीं जसा दिला पाय, । झाला महाकाय दशमुख. ॥ ४८ ॥
जसा हरीणीतें हरीतो लांडगा, । तसा तो दांडगा हरी मातें. ॥ ४९ ॥

## ३८. रुक्मिणीची विवाहकथा

प्रथम म्हणे वैदर्भी, ' बाई ! होत्यें लहान मीं कन्या, ।
धन्या कृष्णकथा मज तेंव्हां चि रुचे, न आवडे अन्या. ॥ १ ॥
भगवद्भक्त ब्राह्मण जे येती मत्पित्याचिया गेहा, ।
ते हारि हरियशोमृत पाजिति, तें मात्र चालवी देहा. ॥ २ ॥
सेवाया अमृतमधुरनिर्मळपुष्कळमुकुंदयश धन्य
स्तन्य त्यागुनि धांवें, काय मनाला रुचेल मग अन्य ? ॥ ३ ॥
हरिगुणगायक सज्जन ते धनलोभी नव्हेत, परि हार ।
मुद्रा कंकण द्यावें, न करिति मातापिताहि परिहार. ॥ ४ ॥
ज्या दिवसीं हरिचरितश्रवण नसे त्यांत मज दहा दुखणीं,
दुखणी काय ? नवखणी माडी नलगे; धरा नखेंदु खणी. ॥ ५ ॥
पितृसदनीं मी वाढें जैसी, तैसी च मन्मनीं प्रीति, ।
रीति प्रेक्षुनि ऐसी ' दैव बळी ' म्हणति ते चि जन भीति. ॥ ६ ॥
' श्रीकृष्णाला द्यावी, श्रीरामा जानकी तसी दुहिता, ' ।
ऐसी गुरुबुद्धीनीं केली बाई ! विचारणा सुहिता. ॥ ७ ॥
कृष्णीं माझें अर्पण चित्ता आलें चि साधुभावांच्या, ।
कृष्णगुणीं श्रुत्यर्पण ये जेविं मनास सत्वभावांच्या. ॥ ८ ॥
रुक्मी माझा दादा जो आम्हां सांजणांमधें मोटा, ।
खोटा नव्हे चि, परि हरिचरितरसीं तो भिजे न, मणिगोटा. ॥ ९ ॥
त्या स्वगुरुविचारातें निंदुनियां मोहरोगवैद्यातें ।
भजला देवूं केलें दादानें हठ धरूनि चैद्यातें. ॥ १० ॥
केला लग्नाचा ही निश्चय, चैद्यासि धाडिलें मूळ, ।
गूळ क्ष्वेड चि वाटे, मज तातविचार होय पांगूळ. ॥ ११॥
न चले कांहीं तेथें जननीचें, बंधुचें स्वताताचें ।,
होय लवांत दहादां फळ इष्ट अनिष्ट आत्मघाताचें. ॥ १२ ॥
आधिसमुद्रीं बुडतां दे कर एक प्रियासखी बुद्धी, ।
मजवरि ती बहुसदया हरिकीर्तिसुधाब्धिलब्धसंशुद्धि. ॥ १३ ॥

एक ब्राह्मण केवळ साधु दयामूर्ति तत्पदीं नमनें ।
केलीं पाय धरुनि म्यां, एकांतीं विनविला सुदीनमनें. ॥ १४ ॥
कां तो द्रवता, माझा असता जरि भाव पाहिला खोटा ? ।
जेणें अभयवर दिला, त्या गुरुहस्तांत म्यां हि लाखोटा. ॥ १५ ॥
स्वकरें 'वसंततिलका' वृत्तें पत्रांत सात मोजूनि, ।
लिहिलीं होतीं तीं ही लिहितां लिहितां क्षणांत योजूनि. ॥ १६ ॥
काय लिहावें म्यां सखि ! ? ज्याचे संपूर्ण वेद निश्वास. ।
विश्वास ज्ञानप्रद, परि माझा हरिपदीं च विश्वास. ॥ १७ ॥
गेला धांवत घेउनि मत्पत्र द्वारकेस सद्विप्र ।
या प्रणतवत्सळाला आणाया आण घालुनि क्षिप्र. ॥ १८ ॥
तों आला शाल्यमगधपतिसख तो चैद्य, मांडलें लग्न, ।
जालें पुर तद्दळजळनिधींत, आधींत मन्मन हि मग्न. ॥ १९ ॥
तांतडि बहु दादाची, कैंचा अवकाश ? लागली हळद, ।
खळदर्पघ्न दिसेना, जो नतचातकदयासुधाजळद. ॥ २० ॥
गरळविलेपन वाटे, लाविति आंगांस जी हरिद्रा तें, ।
सखि ! सुकृपणकृत शुष्कोपचरण निवविल कसें दरिद्रातें ? ॥ २१ ॥
त्या कुंडिनीं समुत्सव वाढे, माझ्या मनीं असुखशैल, ॥
होय सखींत मदुक्तें अश्रुप्रति हेतु बापुडें तैल. ॥ २२ ॥
शतदा ध्वजा चि झाल्यें प्रासादशिरीं पुरेक्षणच्छद्में,
द्वारवतीपथ पाहति नयनें, हरिदिङ्मुखा जसीं पद्में. ॥ २३ ॥
घटिकार्धपादपळलवकाळस्यैर्यार्थ विनविला मित्र, ।
चित्र प्रियसखि ! झालें; रथ नावरि निमिष ही; कसा मित्र ? ॥ २४ ॥
परि मज गमलें गेला धांवत मत्ताप हरिस कळवाया ॥
अन्वर्थनामधेय ब्रह्मण्यप्रभुमनास वळवाया. ॥ २५ ॥
आली रात्रि, सुगात्रि ! द्रौपदि ! अवकाश ती च लग्नासि, ।
झाली यष्टी कष्टी जें मन त्या आधिमारभग्नासि. ॥ २६ ॥
चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहीं च लागला डोळा,
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा. ॥ २७ ॥

लाविचला म्यां दूर्वा, बाई! त्या ईश्वरास हीं बोल. ।
यत्पदपद्मरजाचें चिंतामणिकोटि ही नव्हे मोल. ॥ २८ ॥
निजदासवासरांला बहु पाजुनि ही दयादुधाम रिते ।
नव्हति गुणस्तन जीचे, गणिले अतिकठिन त्या सुधासरिते. ॥ २९ ॥
वत्स क्षुद्रिकळ रडे झोंबे जरि माय कंचुकी सोडी, ।
गोडी आपुलि पानीं नुमजे, दानीं तिची म्हणे थोडी. ॥ ३० ॥
अलस द्विज, विधि खल, हरि नतीं उदासीन, नियतिमन खोटें,
शिव अदय गमे, त्यांचीं फुगलीं असतील हांसतां पोटें. ॥ ३१ ॥
तो प्रियकंठीं आपण पडोनि, हे ही सुखांत पाडावी,
या भावें चि स्फुरली, करि माझी भुजलता कृपा डावी. ॥ ३२ ॥
नेत्र भुजोरुस्फुरणें चिंतेची सोडिली मनें बाज, ।
माज प्राणानीं ही, गेल्या धैर्ये हि यावया लाज. ॥ ३३ ॥
तों चि समूळाधिज्वरहरमात्रा आणुनी, उषःकाळीं ।
आला द्विज धन्वंतरि, सदय पिता ही तसा नसे बाळीं. ॥ ३४ ॥
आधीं विप्रमुखश्री कळवी येतां चि माधवागमन, ।
मग मुनि सांगे मज, तों 'ऊठ' म्हणे 'गुरुपदास लाग' मन. ॥ ३५ ॥
द्यावें काय तयास? प्रत्युपकारार्ह तों नसे वस्तु,
स्वस्तुत्यादर न गुरुसि मन सांगे, तें चि मीं म्हणें 'अस्तु'. ॥ ३६ ॥
अश्रुजळप्रक्षाळितगुरुचरणीं वाहिलें शिरःकमळ ।
चारि ढाळिलें निजालकचामर; मग कां उरेल शोकमळ? ॥ ३७ ॥
प्रणतक्लेश हरावे, दुसरी गुरुच्या नसे मनांत रुची, ।
पादोपासककामापूर्त्यर्थस्थिति सुरांचिया तरुची. ॥ ३८ ॥
विप्रें कथिलें मज कीं, 'वत्से! लिहिलेस उत्तम श्लोक, ।
ज्याच्या अर्थश्रवणें आला धांवोनि, उत्तमश्लोक. ॥ ३९ ॥
कोणाला हि न पुसतां, स्वरथीं द्विज बैसवूनि सूतातें ।
'हूं! कुंडिनमार्ग' म्हणे, प्रभुवाक्य कथी 'दया प्रभूता'तें. ॥ ४० ॥
एका रात्रींत चि ये, मध्यें ते देश काय हो! थोडे? ।
जोडे ल्याले पविचे, कीं बाई! वायुमित्र ते घोडे. ॥ ४१ ॥

भावोजींला कळतां ते ही सहसैन्य धांवले, आले, ।
झाले एक मरुदनळ, लोकांचें काय त्यांपुढें चाले? ॥ ४२ ॥
आले प्रभु, हें कळतां सामोरा शीघ्र धांवला बाप, ।
हा पर्जन्यप्रियसखशिखिसुख सेवी, उरे चि ना ताप. ॥ ४३ ॥
तातें पूजा केली, गेली चिंता विलोकितां नखरें, ।
प्रणतांचें तापत्रयहर, हरिपदनीररुहवितान खरें. ॥ ४४ ॥
कृष्णागमनानंदें हृदयांतुनि ज्यां बळें चि घालविलें, ।
चैद्यादिमनें द्याया स्थळ त्या चिंतादिकांसि पालविलें. ॥ ४५ ॥
मित्रोदयभीततमा आश्रय देणें जसा बिळा लागे, ।
प्रभुभीतास्मत्तापा चैद्याद्याश्रय तसा मिळाला गे! ॥ ४६ ॥
अंबेच्या नमनाला न्यावी जीचा विवाह नवरी ती, ।
धरि हरिशंका दादा, देवीयात्रा कुळीं न नव रीती. ॥ ४७ ॥
मग बाई! दादाचे मागधशाल्वादिकां हि मेल्यांचे ।
सैनिक मज रक्षाया आले, धाके विरोनि गेल्यांचे. ॥ ४८ ॥
हस्तीं शस्त्रें, दंशित, रथतुरगगजाधिरूढ ते कोले ।
ओले वरि वीररसें, वीरश्री केंवि त्यांसवें बोले? ॥ ४९ ॥
स्वसखीधात्रीजननीविप्रस्त्रीमंडळी न ती, पेटी, ।
तींत मणी मीं नेलें शुभविधिनें श्रीशिवेचिये भेटी. ॥ ५० ॥
नमिलीं श्रीपदपद्में जी मधुपां देति आसरा जीवां, ।
गंगेच्या हि नसे ती मृदुता, न श्री, न वास, राजीवां. ॥ ५१ ॥
पूजुनि पाय विनविली, 'कन्यांतें प्रसवताति ज्या माता ।
घ्या लटिक्या, तूं चि खरी, तुज कृष्ण चि योग्य होय जामाता. ॥५२॥
हीं तूझीं कीं हरिचीं पदपद्में सेव्य म्हणुनि, देहा तीं ।
स्वीकारून, दयेनें तूं चि मला शौरिच्या चि दे हातीं.' ॥ ५३ ॥
ऐसें प्रार्थित होत्यें चित्तांत चि मीं अशांत विप्रसती ।
'फलितं सर्वं' म्हणती, पूजा सांगों समीप ज्या असती. ॥ ५४ ॥
सर्वसतीपूजा म्यां केली, घेऊनि तत्प्रसादाशी, ।
दासी हरिची, परि पळ झाल्यें भटमीनमंडळा दाशी. ॥ ५५ ॥

देवीप्रासादांतुनि निघतां ध्याया करासि आलीला ।
आलीला धरुनि करीं दाखविली त्या गतींत आलीला. ॥ ५६ ॥
अवलोकनांत माझ्या नसती जरि साजणी ! कृपा मरते, ।
खड्ग प्रथम मग क्षितिपृष्ठीं पडले गळोनि पामर ते. ॥ ५७ ॥
त्या मेल्यांस कशाला पाहों मीं ? प्रियतमास अवलोकीं ।
कीं, आला कीं नाहीं; होय तडित्स्फुरण काय तंव लोकीं ? ॥ ५८ ॥
येतां ऐसें नाहीं, हें कां जातां चि जाहलें साचें ? ।
याचें कारण बाई ! मीं पात्र शिवाकृपाकटाक्षाचें. ॥ ५९ ॥
पत्रीं लिहिलें होतें ' देवीयात्रेंत मज पदें दावा, ।
दावा बहुतासीं हा भाव कळों दुर्जनांसि नेदावा. ' ॥ ६० ॥
नयनांवरि येति सये ! नलिनावरि भृंगबालसे वाल, ।
त्यांसि म्हणे, ' साधु कसे ? पूजिन जरि काय गाल सेवाल.' ॥ ६१ ॥
प्रभुसि पहाया पूर्वींपासुनि मन्नेत्रपद्म बहु लोल, ।
तो लग्नसमय ते उपवास हि, लावील कोण सखि ! बोल ? ॥ ६२ ॥
तों आला हरि, सुंदरि ! जोडा नाहीं च त्या महा भागा ।
आपुलिया घ्याया, ते कोले वारिति कसे महाभागा ? ॥ ६३ ॥
हरि रवि, मीं नलिनी, स्त्री कैरविणी, वीर वायसाराती, ।
आनंदाची वेळा सांगों तुज साध्वि ! काय सारा ती ? ॥ ६४ ॥
माझा भर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन, ।
दर्शन नयनें घेती, जैसें शिशिरीं दरिद्र घे ऊन. ॥ ६५ ॥
तों आलि म्हणे मज, ' सखि ! सुमनोमाळा वरा वहायास, ।
हा या समयीं विधि, मग नित्य असें चि प्रिया, पहा यास. ॥ ६६ ॥
माळ उंचलितां, प्रिय आपण हि रथावरूनियां लवला, ।
लव लागेना तों घे अंकीं, करुणासमुद्र कालवला. ॥ ६७ ॥
हरिनीळनिभवरांकीं बसल्यें, न श्री तसी घनीं चपळे, ।
गेला घेउनि हरि निजभाग सुखें, त्यास म्हणति नीच ' पळे.' ॥६८॥
मज नेल्यावरि रक्षक वीरांनीं उघडिले बळें डोळे, ।
लोळे जरि धूळिमधें केतुच्छायेंत तरि तनू पोळे. ॥ ६९ ॥

हंसें मुक्ता नेली, मग केला कलकलाट काकांनीं, ।
हाकांनी नभ भरलें, जाय सुरांच्या हि नाद हा कानीं. ॥ ७० ॥
कन्या कीर्ति हि हरिली देखत असतां बळें चि गोपानें, ।
'सोपानें वीरशिरें केलीं कीं!' म्हणति भूप कोपानें. ॥ ७१ ॥
शाल्वजरासंधादिक चैद्याचे जे सहाय ते रागें ।
मागें धांवत आले, तळमळती अंतरीं दिल्या डागें ॥ ७२ ॥
पुष्कळ खळ बळ घेउनि हरिवरि आले नृपाळ ते कुतरे, ।
उतरे एक हि न कसीं कनकासीं कोटि मांडतां धुतरे. ॥ ७३ ॥

## ३९. कर्णाचा अनुनय

श्रीकृष्ण म्हणे, कर्णा! तूं कुंतीचा कुमार कानीन, ।
त्वद्वदनोत्थ न पडला अर्थिजनाच्या कधींहि कानीं न. ॥ १ ॥
ऐसा वदान्य विद्वान् विश्रुत तूं शुद्धविप्रजनदास ।
चाल, भजोत भ्राते तुज, चातक भजति जेंवि वनदास. ॥ २ ॥
देईल अजातारी मद्वचनें आजि राज्य अभ्रात्या, ।
भ्रात्या न वळेल कसा? वळवीलचि धर्मवायु अभ्रा त्या. ॥ ३ ॥
सानुजसुत धर्म तुला नमिल, सयादव करीन मीं नमन, ।
सच्चित्त गुर्वनादर तोयानादर करी न मीनमन. ॥ ४ ॥
राज्याभिषेक करातिल तुज मजसह विप्र भूत्रिप दरानें; ।
किंबहुना? घेइल तव तांबूल क्षिप्र भूमि पदरानें. ॥ ५ ॥
चाल कसा, हो राजा, मातेच्या मानसासि दे सुख, गा! ।
यांचा तुज काकांचा सहवास जसा सितच्छदा सुखगा.' ॥ ॥६ ॥
कर्ण म्हणे, 'बा! देवा! वदसि स्नेहेंचि बा! दयालो! हें; ।
भटकरगें जोडावी स्पर्शमणीची कसी दया लोहें? ॥ ७ ॥
मातृत्यक्ता मजला राधाहस्तीं दिलें अधिरथानें, ।
मज पाजाया प्रेमें पय पळ धरिती तिचीं न धिर थानें. ॥ ८ ॥
निष्फळ कसें करूं गा! बा! परिहृतसर्वनतनराधे! तें? ।
मेल्यावांचुनि द्यावें जोडुनि सुतशोकवतन राधेतें? ॥ ९ ॥

दुर्योधन नांवाचा राजा मी सर्व राज्यभोग मला, ।
मूर्त नरक नरकाविच्या हृदयाला, जो कृतघ्न, तो गमला. ॥ १० ॥
संस्कार विवाहावधि केले माझे यथोक्त सूतानें, ।
निर्मळपणें निघावें रक्तपटांतूनि केंवि सूतानें ? ॥ ११ ॥
समरमखाचि होऊं द्या क्षत्रिय सेवूत तल्प न गदानीं, ।
पुण्यरणमरणदानीं वीरां जें, तें न कल्पनगदानीं. ॥ १२ ॥
पतितांसि सांवरी मृदु शुचि हा उपदेश केशवा! तूळ, ।
जैसा अंबार्पित अतिरुग्णासि पदार्थ लेश वातूळ. ॥ १३ ॥
श्रीकृष्णजी ! करावा कैसा विश्वासघात अवसानीं ? ।
युद्ध कसें न करावें आम्हां हा युद्धलाभ नवसानीं ? ॥ १४ ॥
तरि मग उरलें काय ? प्रभुजी ! त्यजिल्या जरि प्रतिज्ञा त्या ? ।
नच सोडवेल देउनि धीर भरंवसा अरिप्रति, ज्ञात्या ! ॥ १५ ॥
राज्य न करील देइल धर्म मला उमजतांचि हें नातें, ।
देइन सुयोधना मी तेव्हां होइल तुम्हांसि हें ना तें. ॥ १६ ॥
आटोपिला न पाहिला, तो आटोपेल काय गा ! ऊत ? ।
जोडा यश; कवि, होउनि रोमांचव्याप्तकाय, गाऊत. ॥ १७ ॥
धारातीर्थींच मिळे सद्गति सत्कीर्ति शुद्धि अधमातें, ।
राज्यपदभोग न लगे, द्यावा देवा! रणांत वध मातें. ॥ १८ ॥
मज समजलें प्रभो ! हें त्वद्दृष्टिपुढें उरेल न क्षत्र; ।
रवि काळरुद्रदृष्टिसि न पुरे, तेथें पुरेल नक्षत्र ? ॥ १९ ॥
तूं स्वाश्रितप्रतिज्ञा करिसिल, न धरूनि शस्त्र, सत्या, गा ! ।
उरतिल कैसे करिते झाले जे, हरुनि वस्त्र, सत्यागा ?' ॥ २० ॥
देव म्हणे, ' राज्य नको ? उपदेश अयोग्य काय हे माहिम्या ? ।
क्लीबाला कन्यासी तुज कां द्यावी बळेंचि, हे माहि, म्यां ? ॥ २१ ॥
जेथें भीम धनंजय बहुदुःसह वासवा रणाजिर तें; ।
हरिलंघन असतांही बलिगजसहवास वारणा जिरतें ? ॥ २२ ॥
धनदानें अधनाचा तुमचा तैसाचि काम रणदानें ।
म्यां पुरविजेल; द्यावीं स्वर्गें इतरें, न का मरणदानें ? ॥ २३ ॥

जा, सर्व सिद्ध व्हा; जरि आहे उद्युक्त मानस मराया, ।
सम रायास तुम्हांसाहि भीमार्जुन वरद, शीघ्र समरा या. ॥ २४ ॥
देईल कुरुक्षेत्रीं धर्म प्रभुवर तुम्हां निधनदानें, ।
धनदानें जासि येणें न दिलीं उदकें तथाविध नदानें.' ॥ २५ ॥
कर्ण म्हणे, बा ! वचना मान्य न झालों म्हणों नको, पावें, ।
वध्यें वधाचि म्हणतां, प्रभुनें आग्रह म्हणोन कोपावें? ॥ २६ ॥
सत्य उपदेश आम्हीं वरचेवरि भव्यहेतु झेलावे, ।
जाणोनि सर्व, देवा ! लाविसि कां बोल? हे तुझे लावे. ॥ २७ ॥
स्वप्नांत पाहिलें नृप शांतनव द्रोण हाहि दाता हे, ।
घेऊनि उष्ट्रयानी बैसुनि दक्षिणदिशेसि जाताहे. ॥ २८ ॥
रक्तोष्णीषधर सकल सुश्वेतोष्णीषधर तिघे मात्र, ।
कृप कृतवर्मा अश्वात्थामा मलयजरजोधवलगात्र. ॥ २९ ॥
शुभसहस्रस्तंभप्रासादीं धरुनि शुभ्र माल्याला ।
चढला धर्म श्वेतोष्णीषा दत्तोडुपभ्रमा ल्याला ॥ ३० ॥
सहदेव नकुळ सात्यकि भीमार्जुन धर्म तूंहि बापा ! हे ।
सप्त तुम्ही श्वेतगजीं, ऐसें स्वप्नांत कर्ण हा पाहे.' ॥ ३१ ॥
श्रीकृष्ण म्हणे, बहुधा मरणाराचि हे समस्त सुपदेश, ।
कीं तव हृदयें माझा हिताहि स्वीकारिला न उपदेश.' ॥ ३२ ॥
कर्ण म्हणे, 'भेटि असो परलोकीं मात्र बा ! दयालो ! कीं ।
कलहीं स्नेह न राहे, हे दुर्लभ म्हणुनि पाद या लोकीं.' ॥ ३३ ॥
ऐसें म्हणोनि कर्ण प्रभुला कडकडुनि भेटला सुचिर, ।
मुग्धासाहि जाडितकनकमरकतनग न गमला तसा रुचिर. ॥ ३४ ॥
झाला मंत्र असा, मग आला नगरांत कर्ण परतोन, ।
पर तो न प्रभु कोपे वरि पुरता पूर्ण आंत पर तो न. ॥ ३५ ॥

# ४ : संत-वाणी

## ४०. नामदेव

(१)

चक्रवाक पक्षी वियोगें बहाती । झाले मज प्रती तैसे आतां ॥ १ ॥
चुकलिया माय बाळकें रडती । झाले मज प्रती तैसे आतां ॥ २ ॥
वत्स न देखतां गाई हंबरती । झाले मज प्रती तैसे आतां ॥ ३ ॥
जीवना वेगळे मत्स्य तळमळती । झाले मज प्रती तैसे आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे मज ऐसें वाटे चित्तीं । करीतसे खंती फार तुझी ॥ ५ ॥

(२)

चतुर्भुज दिसे शंखचक्र हातीं । मुकुट शोभती सर्वांलागीं ॥ १ ॥
कर्णीचीं कुंडलें वैजयन्ती माळा । देखतसे डोळां ब्रह्मा तेव्हां ॥ २ ॥
कौस्तुभ हृदयीं श्रीवत्सलांछन । बाहूचीं भूषणें पाहातसें ॥ ३ ॥
चरणीं तोडर पीत पीतांबर । तेजें दिवाकर लोपतसे ॥ ४ ॥
आपादपर्यंत तुळशीच्या माळा । मुद्रिका दशांगुळा रत्नाचिया ॥ ५ ॥
केशराचे टिळे नेत्र कमळाकार । दंती इंदुकर बैसलेती ॥ ६ ॥
कोटीशारे मूर्ति कोटि ब्रह्म दिसती । स्तवन करिती सुरवर ॥ ७ ॥
नामा म्हणे ऐसे दावीत गोविंद । झालासे सावध ब्रह्मा तेव्हां ॥ ८ ॥

(३)

जीवींचें गुजगौप्य सांगेन वो तूतें । ऐक एकाचित्तें मनोधर्म ॥ १ ॥
आवडते हे माझे भक्त परम सखे । ते सबाह्य सारिखे सप्रेमळ ॥ २ ॥
त्यांपरिस थोर नाहीं मज दुजे । मज त्यांचेनि काजें नांवरूप ॥ ३ ॥
भक्त सर्वांहूनि पढियंते माझ्या जीवा । भक्त हा विसावा ज्ञानियांचा ॥ ४ ॥
भक्त योगियांच्या सुखाचा शृंगारू । भक्त अलंकारू वैराग्याचा ॥ ५ ॥
भक्त माझिया हो जीवींचें निजध्येय । भक्त परमप्रिय कुळदैवत ॥ ६ ॥
भक्तसंगे सुखें विश्रांति विसावा । भक्त माझा ठेवा सर्व धन ॥ ७ ॥
भक्त हे माझिया भाग्याचें भूषण । भक्त तें निधान निक्षेपीचें ॥ ८ ॥
भक्त यश कीर्ति भक्त सुखमूर्ति । भेटे तरी पुरती सकळ काम ॥ ९ ॥
भक्त ते माझ्या सुखाचे अधिकारी । भक्ताचिया घरीं वस्ती माझी ॥१०॥
मज आणि भक्तां नाहीं वेगळीक । ध्यावें सर्व सुख भक्तें माझे ॥ ११ ॥
भक्तें नाम ध्यावें भक्तें रूप ध्यावें । भक्तें मुख पहावें घडिये घडिये ॥१२॥
भक्तें हृदयीं माझें चिंतावे चरण । भक्तें आलिंगन द्यावें मज ॥ १३ ॥
धर्म अर्थ काम मोक्ष मुक्ति चारी । देतां न धरीं करीं भक्त माझा ॥ १४ ॥
भक्त न मागे कांहीं न घाली मज भार । मजहूनि उदार भक्त माझा॥१५॥
पत्र पुष्प फळ जळ तें सर्वभावें । भक्तांचे मज व्हावे आस करूनी ॥१६॥
वाट पाहे भक्त कैं येती आवडते । ते मज पढियंते सर्वभावें ॥ १७ ॥
तरी मी भक्तांचा कीं भक्त ते आमुचे । सोयरे निजांचे एकमेक ॥ १८ ॥
म्हणूनि नामयाचें आर्त थोर जीवा । जवळोनि नवजावा दूर कोठें ॥१९॥

(४)

निवृत्तिदेव म्हणे करितां समाधान । कांहीं केल्या मन राहात नाहीं ॥१॥
बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ॥ २ ॥
बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळा पांगलेंसे ॥ ३ ॥
हरिणीवांण खोपी पडियेली वोस । दशदिशा पाडस भ्रमताती ॥ ४ ॥
मायबापें आम्हां त्यागियलें जेव्हां । ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचें ॥ ६ ॥

(५)

सुखालागीं जरी करिसी तळमळ । तरी तूं पंढरीसी जाय एक वेळ ॥ १ ॥
तेथें अवघाचि सुखरूप होसी । जन्मोजन्मींचें दुःख विसरसी ॥ २ ॥
चंद्रभागे करितां एक स्नान । तुझे दोष पळती रानोरान ॥ ३ ॥
लोटांगण घालोनि महाद्वारीं । कान धरोनि नाचावें गरुडपारीं ॥ ४ ॥
नामा म्हणे उपमा काय द्यावी । माझ्या विठोबाची अलाबला घ्यावी ॥५॥

(६)

देव दाखवी ऐसा नाहीं गुरू । जेथें जाय तेथें दगड शेंदरू ॥ १ ॥
देव दगडाचा बोलेल कैचा । कोणीकाळीं त्यास फुटेल वाचा ॥ २ ॥
देव देव करितां शिणलें माझें मन । जेथें जाय तेथें पूजा पाषाण ॥ ३ ॥
नामा तोचि देव हृदयीं पाहे । नामा केशवाचे न सोडी पाय ॥ ४ ॥

(७)

भेदवादी जन वदतसे भिन्न । नव्हे तें लक्षण भजनाचें ॥ १ ॥
विश्वीं विश्वंभर कोंदलासे एक । भेदाचें कौतुक कैसें सांगा ॥ २ ॥
ब्रह्मीं नाहीं ठाव एकपणाचाही । तेथें दुजें कांहीं सामावणें ॥ ३ ॥
आदि मध्यें अंतीं खेळुनियां खेळ । उरलें तें निखळ अविनाश ॥ ४ ॥
हे मीं जैसे केले तैसे होती नग । तरी ते अव्यंग सोनेपणीं ॥ ५ ॥
केली जैसी भक्ति शैव कीं वैष्णव । पाहतां देवा दुजा नाहीं ॥ ६ ॥
शिव विष्णु दोघे एकचि अवतार । वेदांनीं निर्धार हाचि केला ॥ ७ ॥
नामा म्हणे येथें दुजा नको भाव । विष्णु तोचि शिव शिव विष्णु ॥ ८ ॥

(८)

गोक्षीर लाविलें आंधळिया मुखीं । तेथील पारखी जिव्हा जाणे ॥ १ ॥
तैसें देवा तुझें नाम निरंतर । जिव्हेसी पाझर अमृताचे ॥ २ ॥
सोलुनिया केळें साखरें घोळिलें । अंधारीं खादलें तरी गोड ॥ ३ ॥
द्राक्षफळां घड सेवितां चोखड । तयाहूनि गोड नाम तुझें ॥ ४ ॥
आळुनिया क्षीर तुपाचिये आळे । कालविले गुळे गोड जैसें ॥ ५ ॥
जाणोनिया नामा करी विनवणी । अमृताची खाणी नाम तुझें ॥ ६ ॥

(९)

अग्नि जाळी तरी न जळती पांडव । हृदयीं माधव म्हणोनियां ॥ १ ॥
अग्नि जाळी तरी न जळती गोपाळ । हृदयीं देवकीबाळ धरियेला ॥ २ ॥
अग्नि जाळी तरी न जळे हनुमंत । हृदयीं सीताकांत म्हणोनियां ॥ ३ ॥
अग्नि जाळी तरी न जळे प्रल्हाद । हृदयीं गोविंद म्हणोनियां ॥ ४ ॥
अग्नि जाळी तरी न जळे पैं सीता । हृदयीं रघुनाथ म्हणोनियां ॥ ५ ॥
लंकेसी उरले बिभीषणघर । हृदयीं सीतावर म्हणोनियां ॥ ६ ॥
नामा म्हणे स्वामी स्मरावें गोविंदा । चुके भवबाधा संसाराची ॥ ७ ॥

(१०)

विठ्ठलासी पाहे विठ्ठलासी ध्याये । विठ्ठलासी गाये सर्वकाळ ॥ १ ॥
विठ्ठल हा वृत्ति विठ्ठल जपणें । चित्त वित्त मनें सर्वकाळ ॥ २ ॥
सबाह्य विठ्ठल दाटे घनवट । दश दिशा अफाट विठ्ठलचि ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्ही विठ्ठल होऊन । अभंग भजन करीतसां ॥ ४ ॥

(११)

सद्‍गुरुवांचोनी नाम नये हातां । साधन साधितां कोटिगुणें ॥ १ ॥
जैसा कांतेवीण करणें संसार । तैसा हा व्यापार साधनाचा ॥ २ ॥
जंव सद्‍गुरु नाहीं केला भ्रतार । साधन विचार व्यर्थ गेला ॥ ३ ॥
नामदेव म्हणे सद्‍गुरुपासोनी । नाम घ्या जाणोनि नाना कांहीं ॥ ४ ॥

(१२)

परिसाचेनि संगें लोह होय सुवर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ १ ॥
कीटकीं ध्यातां भृंगी झाला तोची वर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥२॥
वनस्पति परिमळु चंदन झाला जाण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ३ ॥
अग्नीस मिळे तें नये परतोन । तैसा भेटे नारायण संतसंगे ॥ ४ ॥
सरिता ओघ जाय सिंधूस मिळून । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ५ ॥
नामा म्हणे केशवा मज देईं संतसंग । आणिक कांहीं तुज न मागे बापा ।६।

(१३)

शिंपियाचे कुळीं जन्म मज झाला । परि हेतु गुंतला सदाशिवीं ॥ १ ॥
रात्रीमाजि शीवीं दिवसामाजि शीवीं । आराणूक जीवीं नाहीं माझ्या ॥२॥

सुई आणि सातुळी कात्री गज दोरा । मांडिला पसारा सदाशिवीं ॥ ३ ॥
नामा म्हणे शीवी विठोबाचे अंगीं । त्याचेनि मी जगीं धन्य झालों ॥४॥

( १४ )

वाघाचिया गळां बांधलिसे गाय । तैसी तूं गे माय लोभापर ॥ १ ॥
तैसें मज संसारीं घालिसील खेवां । कैसें तुझ्या जीवा गोड वाटे ॥ २ ॥
विषाचें गरळ पाजिसी केवळ । हृदय कोमळ कैसें तुझें ॥ ३ ॥
नामा म्हणे मज आदि अंतीं एकु । जननी आणि जनकु पांडुरंग ॥ ४ ॥

( १५ )

पाषाणाचा देव बोलेचिना कधीं । हरि भवव्याधि केविं घडे ॥ १ ॥
दगडाची मूर्ति मानिला ईश्वर । परि साचार देव भिन्न ॥ २ ॥
दगडाचा देव इच्छा पुरवित । तरि कां भंगत आघातानें ॥ ३ ॥
पाषाण देवाची करिती जे भक्ति । सर्वस्वा मुकती मूढपणें ॥ ४ ॥
प्रस्तराचा देव बोलत भक्तांतें । सांगते ऐकती मूर्ख दोघे ॥ ५ ॥
ऐशांचें माहात्म्य जे कां वर्णिताती । आणि म्हणविती तेणें भक्त ॥ ६ ॥
परंतु ते नर पामर जाणावे । त्यांचे नायकावे बोल कानीं ॥ ७ ॥
धोंडा घडोनिया देव त्याचा केला । आदरें पूजिला वर्षे बहु ॥ ८ ॥
तरी तो उतराई होय केव्हां काई । बरवे हृदयीं विचारा हें ॥ ९ ॥
धोंडा पाण्याविण देव नाही कोठें । होतां सान मोठें तीर्थक्षेत्र ॥ १० ॥
द्वादशीचे गांवीं जाहला उपदेश । देवावीण ओसर स्थळ नाहीं ॥ ११ ॥
तो देव नामया हृदयीं दाविला । खेचरानें केला उपकार हा ॥ १२ ॥

( १६ )

अभंगाची कळा नाहीं मी नेणत । त्वरा केली प्रीत केशीराजें ॥ १ ॥
अक्षरांची संख्या बोलिले उदंड । मेळ सुप्रचंड शर आदी ॥ २ ॥
सहा साडेतीन चरण जाणावे । अक्षरें मोजावीं चौकचारी ॥ ३ ॥
पहिल्यापासोनी तिसऱ्यापर्यंत । अठरा गणित मोज आले ॥ ४ ॥
चौक चारी आधीं बोलिला मातृका । बावीसावी संख्या शेवटील ॥ ५ ॥

दीड चरणाचें दीर्घ तें अक्षर । मुमुक्षू विचार बोध केला ॥ ६ ॥
नामा म्हणे मज स्वप्न दिलें हरी । प्रीतीनें खेचरीं आज्ञा केली ॥ ७ ॥

(१७)

वीतकर पोट लागलेंसे पाठीं । साधूसंगें गोष्टी सांगूं न देई ॥ १ ॥
पोट माझी माता पोट माझा पिता । पोटानें ही चिंता लाविलीसे ॥ २ ॥
पोट माझा बंधु पोट माझी बहीण । पोटानें हें दैन्य मांडिलेंसे ॥ ३ ॥
विष्णुदास नामा पोटाकडे पाहे । अझुन किति ठायें हिंडविशी ॥ ४ ॥

(१८)

लटिका मी गाईन लटका मी नाचेन । संतांसी देखोन लोचन लावी ॥१॥
लटिका माझा भाव लटिकी माझी भक्ति । तूं तव श्रीपति कृपासिंधू ॥२॥
लटिकी माझी क्रिया लटकें माझें कर्म । परि हें तुझें नाम गातु असे ॥३॥
लटिकें माझें ध्यान लटिकें माझें ज्ञान । तूं तव सहज गुण सत्यरूप ॥४॥
लटिकी माझी पूजा लटिकें माझें पूजन । लटिकें माझें भजन भावहीन ॥५॥
लटिकें वत्स प्रेम धेनू हे स्वीकारीं । तैसें मज करी म्हणे नामा ॥ ६॥

(१९)

येई वो कृपावंते अनाथांचे नाथे । निवारी भवव्यथे पांडुरंगे ॥ १ ॥
मी बाळक भुकाळू । तूं माउली कृपाळू । करी माझा संभाळु पंढरीराया ॥२॥
माझें माहेर पै नित्य आठवे अंतरीं । सखा विटेवरी पांडुरंग ॥ ३ ॥
मी देह तूं चैतन्य मी क्षुधार्ति तूं अन्न । तृषार्ति तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥
मी चकोर तूं चंद्र मी सरिता तूं सागर । मी याचक तूं दातार पांडु०॥५॥
मी धनलोभी शुद्र तूं पूर्ण कनककुंभ । मी मगर तूं अंभ पांडुरंगा ॥ ६ ॥
मी चातक तूं मेघ मी प्रवृत्ति तूं बोध । मी शुष्क नदी तूं ओघ पांडुरंगा ॥७॥
मी दोषी तूं तारक मी भृत्य तूं नायक । मी प्रजा तूं पाळक पांडुरंगा ॥८॥
मी पाडस तूं कुरंगिणी मी अंडज तूं पाक्षिणी । मी अपत्य तूं जननी पांडुरंगा ९
मी भक्ति तूं निजसोय मी ध्यान तूं ध्येय । मी आडळ तूं साह्य पांडुरंगा ॥१०॥

ऐसी जे जे माझी विनंति ते तुजाचि लक्ष्मीपति । नित्य सुख सांगती पांडुरंगा ११
शीघ्र येईं वो श्रीरंगे भक्त मानसरंगे । प्रेमपान्हा दे गे नामदेवा ॥ १२ ॥

(२०)

जाणीव शहाणीव वाहियेलें ओझें । तेणें चरण तुझे अंतरले ॥ १ ॥
आतां नेणतेचि करी मज हरी । लौकिकाबाहेरी घाली मज ॥ २ ॥
तुझिया नामाचें लागों देगा पिसें । देहीं देह न दिसे ऐसें करी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुज एकातें मी जाणे । राहत कारणें कल्पनेसी ॥ ४ ॥

(२१)

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥
चरण न सोडी सर्वथा । तुझी आण पंढरीनाथा ॥ २ ॥
वदनीं तुझे मंगळनाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवि माझा ॥ ४ ॥

(२२)

तत्त्व पुसावया गेलों वेदज्ञांसी । तंव भरले त्यापासी विधिनिषेध ॥ १ ॥
तया समाधान नुमजे कोणे काळीं । अहंकार बळि झाला तेथें ॥ २ ॥
म्हणोनि तुझें नाम धरिलें सर्वभावें । उचित करावें पांडुरंगा ॥ ३ ॥
स्वरूप पुसावया गेलों शास्त्रज्ञासी । तंव भरले तयापाशीं भेदाभेद ॥ ४ ॥
एक एकाच्या न मिळती मतासी । भ्रांत गर्वराशि भुलले सदा ॥ ५ ॥
पुराणिकासि पुसूं स्वरुपाची स्थिति । तंव त्यासी विश्रांति नाहीं कोठें ॥६॥
विषयीं ठेवुनि मन सांगति ब्रह्मज्ञान । तेणें समाधान नुपजे कदा ॥ ७ ॥
हरिदासासी पुसूं भक्तिचा उपाय । तव तयापाशीं भाव नाहीं कोठें ॥८॥
वाचेनें सांगति नामाचा वडिवार । विषयीं पडिभर कदाकाळीं ॥ ९ ॥
ऐसें विचारितां बहुत भागलों । म्हणोनि शरण आलों पांडुरंगा ॥ १० ॥
भयाभीत झालों संसार करितां । नामा म्हणे आतां तारी मज ॥ ११ ॥

(२३)

संसारीं गांजलों म्हणोनि शरण आलों । पाठीसी रिगालों देवराया ॥ १ ॥

काळिकाळा वास पाहों न देसी । भरंवसा मानसीं आहे मज ॥ २ ॥
नामा म्हणे देवा स्वामिया तूं एक । आवडता सेवक करीं मज ॥ ३ ॥

(२४)

तुझा माझा देवा कां रे वैराकार । दुःखाचे डोंगर दाखविसी ॥ १ ॥
बळें बांधोनियां देसी काळाहातीं । ऐसें काय चित्तीं आलें तुझ्या ॥ २ ॥
आम्हीं देवा तुझी केली होती आशा । बरवें हृषीकेशा कळों आलें ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा करा माझी कींव । नाहीं तरी जीव घ्यावा माझा ॥ ४ ॥

(२५)

निंदा आणि स्तुति तुझीच करणें । परी आणिकांचे न घेणें गुणदोष ।१।
आतां माझें चित्त असो तुझे चरणीं । अगा चक्रपाणी पांडुरंगा ॥ २ ॥
वैर अथवा सख्य तुझें ये ठायीं । परी न पडो हृदयीं विसर तुझा ॥ ३ ॥
दास्यत्व करावें गोपाळांचे परी । असो तुजवरी सर्व लोभ ॥ ४ ॥
जीणें अथवा मरणें तुझीये द्वारीं । उदास नरहरी करिसी झणीं ॥ ५ ॥
नामा म्हणे थोर शिणलों पंढरिनाथा । स्वामीचें नेणता प्रेमसुख ॥ ६ ॥

(२६)

माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पति ॥ १ ॥
मेघ वर्षे शिळाधारी । तेथें चातक चंचु भरी ॥ २ ॥
महाडोह गंजाजळ । तृप्त एखादा अंजुळ ॥ ३ ॥
साखरेची साठी । तेथें मुंगीची मुखवटी ॥ ४ ॥
नामा म्हणे मी सेवेसी । तूं तो उदाराचा राशी ॥ ५ ॥

(२७)

पतीतपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा ।
पतीतपावन नव्हेसि म्हणुनी जातों माघारा ॥ १ ॥
घ्यावें तेव्हां द्यावें ऐसा अससी उदार ।
काय धरूनि देवा तुझें कृपणाचें द्वार ॥ २ ॥
सोडी ब्रीद देवा आतां नव्हेसि अभिमानी ।
पतीतपावन नाम तुझें ठेवियलें कोणी ॥ ३ ॥

झेंगट घेउनि हातीं दवंडी पिटीन तिहीलोकीं।
पतीतपावन देवा परी तूं मोठा घातकी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा तुझें नलगे मज कांहीं।
प्रेम असो दे चित्ती म्हणुनी लागतसे पायीं ॥ ५ ॥

(२८)

काय मागूं विठ्ठल धुरे। एक तुळशीदळ पुरे ॥ १ ॥
मागूं मुगुट माथांचा। तरी तो आणिला इंद्राचा ॥ २ ॥
मागूं कुंडलें कर्णींचीं। तरी तीं आणिलीं कर्णाचीं ॥ ३ ॥
मागूं पितांबर शेला। तरी तो कासेसी कासिला ॥ ४ ॥
मागूं पादुका चरणींच्या। तरी त्या आणिल्या शेषाच्या ॥ ५ ॥
मागूं तोडर पायींचा। धाक जाईल असुरांचा ॥ ६ ॥
मागूं जातां लक्ष्मीसी। ऋद्धि सिद्धी जिच्या दासी ॥ ७ ॥
मागूं म्हणे शंख जरी। तरी तो मिरवे तुमच्या करीं ॥ ८ ॥
मागों सुदर्शन दळ। त्या शस्त्राचें तुम्हां बळ ॥ ९ ॥
मागों वैजयन्ती माळ। तरी शून्य दिसेल वक्षस्थळ ॥ १० ॥
कारण तेंचि मागितलें। नाम या केशवाचें प्रेम दिलें ॥ ११ ॥
नामा म्हणे कांहीं न मागों। तुझे चरणीं लक्ष लागो ॥ १२ ॥

(२९)

पंढरा माहेर विठ्ठल माउली। धांवोनि हे बोली सांगावी जी ॥ १ ॥
संसारगांवीं लेकी असे तुमची। चिंता कां तियेची सांडियेली ॥ २ ॥
सासुरवासिणी पाहातसे वाट। सांगावे कष्ट विठोबा माउलीये ॥ ३ ॥
अव्हेर माझा असे अविचारु भावा। आशा तृष्णा लावा वहिनी कां ॥ ४ ॥
एकलीये माते खेदती बहुते। एकांते तुमतें आठवीन ॥ ५ ॥
चांडाळी हे सासू तृष्णा पै पापिणी। कांहीं केल्या धनी पुरों नेदी ॥ ६ ॥
रात्रंदिवस मज नाहीं कामाचा शेवट। जीविल्याचा वीट येत असे ॥ ७ ॥
सखी सांगातिणीं तिसी नाहीं भेटी। अज्ञान हें पोटीं वाढतसे ॥ ८ ॥

सुखाचे डोह दुःख कां नावडे । ऐसे कोंवि घडे तुजविण ॥९॥
नवां ठाइं तरळली चोळी असे लेइली । आपुलिये चांग अंगींची ते ॥१०॥
ती धाडी जो कां रुसलिये ऐसे सांगिजे तिजपाशीं ।
जेवीन कां भेटी वांचोनियां ॥११॥
चहूं पुरुषार्थीं नाहीं मज चाड । सेवेचे खाजे मज झडकरी पाठवावें ॥१२॥
रखुमाई माता पांडुरंग पिता । मी त्याची दुहिता म्हणे नामा ॥१३॥

(३०)

निद्रिस्ताचे शेजे सर्प कां उर्वशी । पाहों विषयासी तैसी आम्ही ॥१॥
ऐसी कृपा केली माझ्या केशीराजें । प्रतीतीचे भोजें एकसरां ॥२॥
शेण आणि सोनें भासत समान । रत्न कां पाषाण एकरूप ॥३॥
पायां लागो स्वर्ग वरी पडो आग । आत्मस्थिति भंग नोहे नोहे ॥४॥
नामा म्हणे कोणी निंदा आणि वंदा । झालों ब्रह्मानंदाकार आम्ही ॥५॥

(३१)

अकरा लोचन त्याचे पांच मुख । आठ कान देख पुच्छ दोन ॥१॥
अरत अखंड निरत प्रचंड । उमाळ उदंड उमा फार ॥२॥
दहा पाय चहूं चालत ते जाय । नव्हेत ग माय सावज त्या ॥३॥
नामा म्हणे त्याचा अर्थ करी चोख । पूर्वज पातक लया जाय ॥४॥

(३२)

एक वेळ नयनीं पहावा । मग जाइजे मळत्या गांवा ॥१॥
आठवाल वेळोवेळां । विठोबा आहे रे जवळां ॥२॥
हृदयीं मांडुनिया ठसा । नामा म्हणे केशव असा ॥३॥

(३३)

गूळ गोड न लागे म्हणावा । तैसा देव न लगे वानावा ॥१॥
सेवी तोचि चवी जाणे । येरां सांगतां लाजिरवाणें ॥२॥
नामा म्हणे या खुणा । तुम्ही ओळखा पंढरिराणा ॥३॥

(३४)

आम्हां संगतीं नावडे कांहीं । म्हणोनि बा विदेही ॥
दुःखमूळ संगतीचें । आम्ही नव्हों या गांवींचे ॥ १ ॥
आम्हां नाहीं रूप गांव । वस्तीशीं नाहीं एक ठाव ॥
मग घ्या इच्छेसी धांव । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ २ ॥
स्नान केलें गंगातीरीं । गंध लाविलें पंढरपुरीं ॥
संध्या केली कृष्णातीरीं । आम्ही त्या नव्हों गांवींचे ॥ ३ ॥
भिक्षा केली कोल्हापुरीं । भोजन केलें महाद्वारीं ॥
निद्रा केली माहुरीं । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ ४ ॥
ऐसियाचि संगत करीं । त्याचे चरण हृदयीं धरीं ॥
नामा म्हणे या संसारीं । आम्ही नव्हों त्या गांवींचे ॥ ५ ॥

(३५)

राईएवढें पांखरूं त्रिभुवनीं त्याचा फेरा वो ।
नर आणि नारी तया पांखरांचा चारा वो ॥
आहे पिंडामध्यें त्याचा शोध तुम्ही करा वो ।
मेरूच्या शिखरीं त्या पांखराचा थारा वो ॥ १ ॥
येउनि संसारा याचा अनुभव तुम्ही करा वो ।
चौऱ्यांशी लक्ष योनी चुकेल जन्माचा फेरा वो ॥ ध्रु० ॥
अठ्ठावीस योजनें तया पांखराचा फेरा वो ।
बत्तिसां मुखांनीं तें बा घेतसे चारा वो ॥
अहंसभेमध्यें याचा शोध तुम्ही करा वो ।
अकराही लोचन तया चोंची असती फारा वो ॥ २ ॥
एकवीस स्वर्गांहूनी तया पांखराची उंची वो ।
सप्तही पाताळाखालीं तया पांखरांची निची वो ॥
नेत्रांतील बाहुलीं तयां पांखरांची निची वो ।
उडालें पांखरूं सप्तही सागर घेऊन चोंची वो ॥ ३ ॥

तैसें तें पांखरूं दादा आहे सृष्टीवरी वो ।
मेरु आणि मांदार तया पांखरांचे उदरीं वो ॥
शिवाचें आसन दादा कवणि ये परी वो ।
पिंडीं आणि ब्रह्मांडीं म्हणती दशवें द्वारीं वो ॥ ४ ॥
ऐसें तें पांखरूं गोरक्षरायें वळखिलें वो ।
पिंडीं आणि ब्रह्मांडीं मच्छिंद्रनाथें देखियेलें वो ॥
त्याचियेनी अंगासंगें सद्‌गुरुनाथें दाखविलें वो ।
त्याचियाचि प्रसादें नाम्या शिष्यानें गाइली वो ॥ ५ ॥

## ४१ जनाबाई

(१)

भक्ति ते कठीण इंगळाची खाई । रिघणें त्या डोहीं कठीण असे ॥ १ ॥
भक्ति ते कठीण विषग्रास घेणें । उदास पै होणें जिवें भावें ॥ २ ॥
भक्ति ते कठीण भक्ति ते कठीण । खड्गाची धार बाण न सोसी तया॥३॥
भक्ति ते कठीण विचारूनि पाहे जनी । भक्ति मागे संतसमागमीं सर्व सिद्धी॥४॥

(२)

विठोबा मला मूळ धाडा । धांवत येईन दुडदुडा ॥
चरणीं लोळेन गडबडा । माझा जीव झाला वेडा ॥ १ ॥
कर ठेवुनी कटावरी । उभा राहिला विटेवरी ॥
मुकुट घातला सरीं । कलगीं खोविली वरी ॥ २ ॥
पितांबर नेसुनियां पिवळा । गळां पै तुळसीच्या माळा ॥
कीं रूप सुंदर सांवळा । तेज झळके झळाळा ॥ ३ ॥
नामदेवाचें कौतुक । मला सांपडलें माणिक ॥
विठोबा पाहुन तुझें मुख । हारपली माझी तहान भूक ॥ ४ ॥
विठोबा तुझी संगत बरी । जैसा चंदन मैळगिरी ॥
संत चालले पंढरी । निशाण पताका जरतारी ॥ ५ ॥

जसी मोहकासी लुब्ध मासी । तसी तूं सखी माझी होसी ॥
सुखदुःख सांगेन तुजपासीं । माझा जीव होईल खुषी ॥ ६ ॥
काळी मध्यान रात्र झाली । फेरी विठ्ठलाची आली ॥
जनी म्हणे चूक पडली । भेट नाहीं विठ्ठलाची झाली ॥ ७ ॥

(३)

नवल वर्तलें नवल वर्तलें नवल गुरूचे पायीं ।
कापूर जळूनि गेला तेथें काजळी उरली नाहीं ॥ १ ॥
साखर पेरूनी ऊंस काढिला कान झाला डोळा ।
निबर बायको भ्रतार तान्हा सासरा तो भोळा ॥ २ ॥
नवल वर्तलें नवल वर्तलें नवल चोजवेना ।
डोहामाजी मासोळीनें वांचविलें जीवना ॥ ३ ॥
नवल वर्तलें नवल वर्तलें अनाम चक्रपाणी ।
गोकुळ चोरून नेलें तेथें कैंची दासी जनी ॥ ४ ॥

(४)

खंडेराया तुज करीते नवसु । मरूं दे रे सासू खंडेराया ॥ १ ॥
सासू मेल्यावरी तुटेल आसरा । मरूं दे सासरा खंडेराया ॥ २ ॥
सासरा मेलिया होईल आनंद । मरूं दे नणंद खंडेराया ॥ ३ ॥
नणंद मरतां होईन मोकळी । गळां घालिन झोळी भंडाराची ॥४॥
जनी म्हणे खंडे अवघे मरूं दे । एकटी राहूं दे पायापाशीं ॥ ५ ॥

(५)

ताट विस्तारी रुक्मिणी । देव बैसले भोजनीं ॥ १ ॥
इतुक्यामध्यें अकस्मात । ध्वनि उमटला कानांत ॥ २ ॥
धांवा ऐकतां श्रवणीं । ताट लोटी चक्रपाणी ॥ ३ ॥
उठिला गडबडोनि कैसा । पावे बहिणीचिया क्लेशा ॥ ४ ॥
उभी वृंदावनीं बाळा । पुढें देखिला सांवळा ॥ ५ ॥
मुकुट कुंडलें मेखळा । वैजयंती वनमाळा ॥ ६ ॥

शंखचक्र आयुधें करीं । दिसे घवघवीत हरी ॥ ७ ॥
झळके पीतांबर कासे । नयनीं कोंदला प्रकाशे ॥ ८ ॥
पाहतां आनंदली मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ९ ॥

( ६ )

शूराचें तें शस्त्र कृपणाचें धन । विध्वंसिला प्राण हातां नये ॥ १ ॥
गजमाथा मोती सर्पाचा तो मान । गेलीयाही प्राण हातां नये ॥ २ ॥
सिंहाचें तें नख पतिव्रतेचें स्तन । गेलीयाही प्राण हातां नये ॥ ३ ॥
विराल्यावांचून देह अहंभाव । जनी म्हणे देव हातां नये ॥ ४ ॥

( ७ )

सुंदर माझें जातें गे फिरे वहुतेकें ।
ओव्या गाऊं कौतुकें तूं येरे बा विठ्ठला ॥ १ ॥
जीव शिव दोन्ही खुंटे गे प्रपंचाचे नेटे गे ।
लावुनी पांची बोटें गे तूं येरे बा विठ्ठला ॥ २ ॥
सासू आणि सासरा दीर तो तिसरा ।
ओव्या गाऊं भ्रतारा तूं येरे बा विठ्ठला ॥ ३ ॥
बारा सोळा गडणी अवघ्या कामिनी ।
ओव्या गाऊं बसुनी तूं येरे बा विठ्ठला ॥ ४ ॥
प्रपंच दळण दळिलें पीठ भरिलें ।
सासूपुढें ठेविलें तूं येरे बा विठ्ठला ॥ ५ ॥
सत्वाचें आधण ठेविलें पुण्य वैरिलें ।
पाप तें उतूं गेलें तूं येरे बा विठ्ठला ॥ ६ ॥
जनी जाते गाइल कीर्ति राहिल ।
थोडासा लाभ होइल तूं येरे बा विठ्ठला ॥ ७ ॥

( ८ )

डोईचा पदर आला खांद्यावरी । भरल्या बाजारीं जाईन मी ॥ १ ॥
हातीं घेईन टाळ खांद्यावरी वीणा । आतां मज मना कोण करी ॥ २ ॥

पंढरीच्या पेठे मांडियले पाळं । मनगटावर तेल घाला तुम्ही ॥ ३ ॥
जनी म्हणे देवा मी झालें भेसवा । रिघालें केशवा घर तुझें ॥ ४ ॥

(९)

शून्यावरी शून्य पाहे । तयावरी शून्य आहे ॥ १ ॥
प्रथमशून्य रक्तवर्ण । त्याचें नांव अधःशून्य ॥ २ ॥
ऊर्ध्वशून्य श्वेतवर्ण । मध्यशून्य शामवर्ण ॥ ३ ॥
महाशून्य वर्ण नीळ । त्यांत स्वरूप केवळ ॥ ४ ॥
अनुहात घंटा श्रवणीं । ऐकूनि विस्मय जाहाली जनी ॥ ५ ॥

(१०)

अरे विठ्या विठ्या । मूळ मायेच्या कारट्या ॥ १ ॥
तुझी रांड रंडकी झाली । जन्मसावित्री चुडा ल्याली ॥ २ ॥
तुझें गेलें मढें । तुला पाहुन काळ रडे ॥ ३ ॥
उभी राहुन आंगणीं । शिव्या देत दासी जनी ॥ ४ ॥

(११)

विठो माझा लेकुरवाळा । संगें लेकुरांचा मेळा ॥ १ ॥
निवृत्ति हा खांद्यावरी । सोपानाचा हात करीं ॥ २ ॥
पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर ॥ ३ ॥
गोरा कुंभार मांडिवरी । चोखा जीवा बरोबरी ॥ ४ ॥
बंका कडियेवरी । नामा करांगुली धरी ॥ ५ ॥
जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ॥ ६ ॥

(१२)

नोवरीया संगें वऱ्हाडिया सोहळा । मांडे पुरणपोळ्या मिळे अन्न ॥ १ ॥
परीसाचेनि संगें लोहो होय सोनें । तयाचीं भूषणें श्रीमंतासी ॥ २ ॥
जनी म्हणे जोड झाली विठोबाची । दासी नामयाची म्हणोनियां ॥ ३ ॥

(१३)

माय मेली बाप मेला । आतां सांभाळीं विठ्ठला ॥ १ ॥
मी तुझें गा लेकरूं । नको मजशीं अव्हेरूं ॥ २ ॥

मतिमंद मी तुझी दासी । ठाव द्यावा पायापाशीं ॥ ३ ॥
तुजविण सखे कोण । माझें करील संरक्षण ॥ ४ ॥
अंत किती पाहासी देवा । थोर श्रम झाला जीवा ॥ ५ ॥
सकळ जीवाच्या जीवना । म्हणे जनी नारायणा ॥ ६ ॥

( १४ )

येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥ १ ॥
भीमा आणि चंद्रभागा । तुझे चरणींच्या गंगा ॥ २ ॥
इतुक्यासहित त्वां बा यावें । माझे रंगणीं नाचावें ॥ ३ ॥
माझा रंग तुझे गुणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

( १५ )

आतां वाट पाहूं किती । देवा रुक्माईच्या पती ॥ १ ॥
येई येई पांडुरंगे । भेट देई मजसंगें ॥ २ ॥
मी बा बुडतें भवजळीं । सांग सांग वरवी ब्रीदावळी ॥ ३ ॥
राग न धरावा मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

( १६ )

धन्य ते पंढरी धन्य पंढरिनाथ । तेणें हा पतित उद्धरिले ॥ १ ॥
धन्य नामदेव धन्य पंढरिनाथ । तयानें अनाथ उद्धरिले ॥ २ ॥
धन्य ज्ञानेश्वर धन्य त्याचा भाव । त्याचे पाय देव आम्हांभेटी ॥ ३ ॥
नामयाची जनी पालट पैं झाला । भेटावया आला पांडुरंग ॥ ४ ॥

( १७ )

झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणी ॥ १ ॥
पाटी घेऊनियां शिरीं । नेऊनियां टाकी दुरी ॥ २ ॥
ऐसा भक्तीसी भुलला । नीच कामें करूं लागला ॥ ३ ॥
जनी म्हणे विठोबाला । काय उतराई होऊं तुला ॥ ४ ॥

( १८ )

ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणे पडों नेदी त्याचें । वारे सोसी आघाताचे ॥ २ ॥

तयाविण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥ ३ ॥
अंगा आपुले ओढोनी । त्याला राखे जो निर्वाणी ॥ ४ ॥
ऐसा अंकित भक्तासी । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

( १९ )

पक्षी जाय दिगंतरा । बाळकांसी आणी चारा ॥ १ ॥
घार हिंडते आकाशीं । झांप घाली पिल्लापाशीं ॥ २ ॥
माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापाशीं ॥ ३ ॥
वानर हिंडे झाडावरी । पिलीं बांधुनी उदरीं ॥ ४ ॥
तैसी आम्हांसी विठ्ठलमाये । जनी वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

( २० )

भक्तिसाठीं याती नाहीं । नाहीं तयासी ते सोई ॥ १ ॥
रोहिदास तो चांभार । त्याचा करी कारभार ॥ २ ॥
जो कां भक्त यातिहीन । देव करी त्याचा मान ॥ ३ ॥
त्यासी भक्ताचा आधार । वाट पाहे निरंतर ॥ ४ ॥
जनी म्हणे भक्तासाठीं । विठो सदा गोण्या लोटी ॥ ५ ॥

## ४२. तुकाराम

( १ )

याती शूद्र वंश केला वेवसाव । आदि तो हा देव कुळ पूज्य ॥ १ ॥
नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥ २ ॥
संवसारे झालों अतिदुःखें दुःखी । मायबाप सेखीं क्रमिलिया ॥ ३ ॥
दुष्काळें आटलें द्रव्यें नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ॥ ४ ॥
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखे तुटी येतां ॥ ५ ॥
देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेसें ॥ ६ ॥
आरंभीं कीर्तन करी एकादशी । नव्हतें अभ्यासी चित्त आधीं ॥ ७ ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ८ ॥

गातां पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ९ ॥
संताचें सेविलें तीर्थ पायवाणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ १० ॥
टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ ११ ॥
वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ १२ ॥
सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियलें नाहीं बहुमता ॥ १३ ॥
मानियेला स्वामी गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १४ ॥
यावरी या झाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १५ ॥
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १६ ॥
बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १७ ॥
विस्तारी सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरें ॥ १८ ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १९ ॥
भक्तां नारायणा नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ २० ॥
तुका म्हणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंग ॥ २१ ॥

( २ )

याचसाठीं वनांतरा । जातों सांडुनिया घरा ॥ १ ॥
माझें दिठावेल प्रेम । बुद्धि होईल निष्काम ॥ २ ॥
अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अहं ब्रह्म । आड येऊं नेदी भ्रम ॥ ४ ॥

( ३ )

हातीं धरूं जावें । तेणें परतेचि व्हावें ॥ १ ॥
ऐसा कांहो आला वांटा । हीन भाग्याचा करंटा ॥ २ ॥
देव ना संसार । दोनी ठायीं नाहीं थार ॥ ३ ॥
तुका म्हणे पीक । भूमि नेदी न मिळे भीक ॥ ४ ॥

( ४ )

आतां काय खावें कोणीकडे जावें । गांवांत रहावें कोण्या बळें ? ॥ १ ॥
कोपला पाटील गांवींचे हे लोक । आतां मज भीक कोण घाली ? ॥ २ ॥

आतां येणें चवी सांडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ ३ ॥
भल्या लोकांपाशीं सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥४॥
तुका म्हणे याचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥५॥

(५)

पांडुरंगा आतां ऐका हे विनंति । बहु माझे चित्तीं भय वाटे ॥ १ ॥
नाहीं आइकिलें संतांचियां मुखें । तें या मज लोकें भेडसाविलें ॥ २ ॥
विष्णुदासां गति नाहीं तरावया । म्हणतां गेले वायां कष्टतही ॥ ३ ॥
धिक्कारिती मज करितां कीर्तन । काय सांगों शीण ते काळींचा ॥४॥
तुका म्हणे मज वाटतें उदास । काय करूं यास पांडुरंगा ॥ ५ ॥

(६)

लाज वाटे मज मानिती हे लोक । हे तों नाहीं एक माझे अंगीं ॥ १॥
मोजुनी झिजलों मापाचिया परी । जाळावी हे थोरी लाभाविण ॥२॥
कोमळ कंटक तीक्षण अगरी । पोचट ते वरी अंगकांति ॥ ३ ॥
चित्रीचें लेप शृंगारिलें निकें । जीवेंविण फिके रूप त्याचें ॥ ४ ॥
तुका म्हणे दिसे वायां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ५ ॥

(७)

लोक म्हणती मज देव । हा तो अधर्म उपाव ॥ १ ॥
आतां कळेल तें करीं । सीस तुझे हातीं सुरी ॥ २ ॥
अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांहीं ॥ ३ ॥
मन जाणे पापा । तुका म्हणे मायबापा ॥ ४ ॥

(८)

बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ॥ १ ॥
विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ २ ॥
बाइल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥ ३ ॥
पोरें मेलीं बरें झालें । देवें मायाविरहित केलें ॥ ४ ॥
माता मेली मज देखतां । तुका म्हणे हरली चिंता ॥ ५ ॥

(९)

आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी ॥ १ ॥
बोलले जें ऋषि । साच भावें वर्ताया ॥ २ ॥
झाडूं संतांचे मारग । आडरानीं भरलें जग ॥ ३ ॥
उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं ॥ ४ ॥
अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ॥ ५ ॥
विषयलोभी मनें । साधनें बुडविलीं ॥ ६ ॥
पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ॥ ७ ॥
तुका म्हणे करा । जयजयकार आनंदें ॥ ८ ॥

(१०)

धर्माचें पाळण । करणें पाखांड खंडण ॥ १ ॥
हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥ २ ॥
तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेउनि बाण फिरे ॥ ३ ॥
नाहीं भीड भाड । तुका म्हणे साना थोर ॥ ४ ॥

(११)

न वजतां घरा । आम्ही कोणाच्या दातारा ॥ १ ॥
कां रे छळूं येती लोक । दाट बळेंचि कंटक ॥ २ ॥
नाहीं आम्ही खात । कांहीं कोणाचे लागत ॥ ३ ॥
कळे तैसी सेवा । तुका म्हणे करूं देवा ॥ ४ ॥

(१२)

आम्हां गांजी जन । तरि कां मेला नारायण ? ॥ १ ॥
झालीं पोरटीं निढळें । ठाव नाहीं बुड आळें ॥ २ ॥
आम्ही जनां भ्यावें । तरि कां न लाजिजे देवें ? ॥ ३ ॥
तुका म्हणे देश । झाला देवाविण ओस ॥ ४ ॥

(१३)

पराविया नारी रखुमाई समान । हें गेलें नेमून ठाईंचेंच ॥ १ ॥
जाई वो तूं मातें न करीं सायास । आम्ही विष्णुदास नव्हें तैसे ॥२॥

न सहावें मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार । तरि कां इतर लोक थोडे ॥४॥

( १४ )

न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥
उठतें तें कुटतें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥ २ ॥
जिवंताचे मेले । लाजा वाटोनियां प्याले ॥ ३ ॥
संवसाराकडे । न पाहातां आंस पडे ॥ ४ ॥
तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नांवें धोंडा ॥५॥
तुका म्हणे बरें झालें । घे गे बाइलें लिहिलें ॥ ६ ॥

( १५ )

आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥१॥
जेणें योगें तुम्हां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ २ ॥
निंदक दुर्जन संग्रही असती । त्यांची युक्ति चित्तीं आणूं नका ॥ ३ ॥
परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेका विवेक पाहोनियां ॥ ४ ॥
सांगणें नलगे, सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ५ ॥
हेंचि ऐकोनियां चित्त समाधान । आणीक दर्शनें चाड नाहीं ॥ ६॥
घेऊनियां भेटी कोण हा संतोष ? । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ७ ॥
एक दोन्ही कर्में जाणोनियां वर्में । आपुलिया भ्रमें राहूं आतां ॥ ८ ॥
कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वांभूतीं देख एक आत्मा ॥ ९ ॥
आत्मारामीं मन ठेउनियां राहे । रामदासीं पाहे आपणेयां ॥ १० ॥
तुका म्हणे राया धन्य जन्म क्षिती। त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥११॥

( १६ )

अणुरणीयां थोकडा । तुका आकाशाएवढा ॥ १ ॥
गिळुनी सांडिलें कळिवर । भवभ्रमाचा आकार ॥ २ ॥
सांडिली त्रिपुटी । दीप उजळिला घटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरतां ॥ ४ ॥

(१७)

घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं । मुक्तां आत्मस्थिति सांडवीन ॥ १ ॥
ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥
तीर्थ भ्रामकासी आणीन आळस । कडु स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥
सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥
भक्ति भाग्य प्रेमा साधिन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निज ठेवा ॥५॥
धन्य म्हणवीन इह लोकीं लोका । भाग्य आम्हीं तुका देखियेला ॥ ६॥

(१८)

पैल आले हरी । शंखचक्र शोभे करीं ॥ १ ॥
गरुड येतो फडत्कारें । ना भी ना भी म्हणे त्वरें ॥ २ ॥
मुगुट कुंडलांच्या दीप्ति । तेजें लोपला गभस्ति ॥ ३ ॥
मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥ ४ ॥
चतुर्भुज वैजयन्ती । गळां माळ हे रुळती ॥ ५ ॥
पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ६ ॥
तुका झालासे संतुष्ट । घरा आलें वैकुण्ठपीठ ॥ ७ ॥

(१९)

आम्ही जातों अमुच्या गांवा । अमुचा राम राम घ्यावा ॥ १ ॥
तुमची आमची हेचि भेटी । येथुनियां जन्म तुटी ॥ २ ॥
आतां असों द्यावी दया । तुमच्या लागतसे पायां ॥ ३ ॥
येतां निजधामीं कोणी । विठ्ठल विठ्ठल बोला वाणी ॥ ४ ॥
रामकृष्ण मुखीं बोला । तुका जातो वैकुंठाला ॥ ५ ॥

(२०)

कपट कांहीं एक । नेणें भुलावयाचे लोक ॥ १ ॥
तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ॥ २ ॥
दाउं नेणे जडी बुटी । चमत्कार उठाउठी ॥ ३ ॥
नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ॥ ४ ॥

नव्हे मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ति ॥ ५ ॥
नाहीं देवार्चन । असे मांडिलें दुकान ॥ ६ ॥
नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाणाखूण ॥ ७ ॥
नव्हे पुराणिक । करणें सांगणें आणिक ॥ ८ ॥
नेणे वाद घटा पटा । करितां पंडित करंटा ॥ ९ ॥
नाहीं जाळीत भणदी । उदो म्हणोनि आनंदी ॥ १० ॥
नाहीं हालवीत माळ । भोंवतें मेळवुनि गाबाळ ॥ ११ ॥
आगमीचें कुडें नेणें । स्तंभन मोहन उच्चाटणें ॥ १२ ॥
नव्हे यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १३ ॥

( २१ )

कोणे गांवीं आहे सांगा हा विठ्ठल । जरी ठावा असेल तुम्हां कोणा ॥१॥
लागतसे पायां येतो लोटांगणीं । मात तरी कोणी सांगा याची ॥२॥
गुणरूप याचे वाणिती या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ॥३॥
सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं । पांडुरंग कोणी दावी तया ॥४॥
तुका म्हणे गाईवत्सां तडातोडी । तैसी जाते घडी एकी मज ॥५॥

( २२ )

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥ १ ॥
तुळसीहार गळां कासे पितांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥ २ ॥
मकर कुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणी विराजित ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

( २३ )

वेद अनंत बोलिला । अर्थ इतुकाचि साधला ॥ १ ॥
विठोबासी शरण जावें । निज निष्ठें नाम गावें ॥ २ ॥
सकळ शास्त्रांचा विचार । अंतीं इतकाचि निर्धार ॥ ३ ॥
अठरा पुराणीं सिद्धान्त । तुका म्हणे हाचि हेत ॥ ४ ॥

( २४ )

जिकडे पाहे तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥
डोळां बैसलें बैसलें । रूप राहोनि संचलें ॥ २ ॥
न वर्जितां दाही दिशा । जिकडे पाहे तिकडे सरिसा ॥ ३ ॥
तुका म्हणे समपदी । उभा दिठीचिये आधीं ॥ ४ ॥

( २५ )

विश्वास तो देव । म्हणुनि धरीयेला भाव ॥ १ ॥
माझी वदवितो वाणी । ज्यानें धरिली धरणी ॥ २ ॥
जोडिलीं अक्षरें । नव्हतीं बुद्धीचीं उत्तरें ॥ ३ ॥
नाहीं केली आटी । कांहीं मानदंभासाठीं ॥ ४ ॥
कोणी भाग्यवंत । तयां कळेल उचित ॥ ५ ॥
तुका म्हणे झरा । आहे मुळींचाचि खरा ॥ ६ ॥

( २६ )

अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ति । तयाचिये चित्तीं बोध कैंचा ॥१॥
अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ॥ २ ॥
अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ॥ ३ ॥
तुका म्हणे जळो ऐसियाचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढवितीं ॥ ४ ॥

( २७ )

नाना मतांतरें शब्दाची वित्पत्ति । पाठांतरें होती वाचाळ ते ॥ १ ॥
माझ्या विठोबाचें वर्म आहे दूरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥ २ ॥
यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥ ३ ॥
तुका म्हणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमच येणें लागे ॥ ४ ॥

( २८ )

काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥ १ ॥
अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥ २ ॥
काय उंदिर नाहीं धांवी । राख लावी गाढव ॥ ३ ॥
तुका म्हणे सुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ४ ॥

(२९)

झुंझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख । करितां हें दुःख थोर आहे ॥ १ ॥
तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ २ ॥
पिंड पोसलिया विषयांचा पाईक । वैकुंठनायक कैंचा तेथें ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हावें देहासी उदार । रकुमादेवीवर जोडावया ॥ ४ ॥

(३०)

नको सांडूं अन्न, नको सेवूं वन । चिंती नारायण सर्व भोगीं ॥ १ ॥
मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण । भावना त्या भिन्न मुंडावया ॥ २ ॥
नको गुंपो भोगीं नको पडों त्यागीं । लावुनि सरे अंगीं देवाचिया ॥३॥
तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥४॥

(३१)

मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ॥ १ ॥
वैष्णवांचा माल खरा । तृतातूर्त वस्तूंसी ॥ २ ॥
भस्मदंड नलगे काठी । तीर्थ आटी भ्रमण ॥ ३ ॥
तुका म्हणे आड काठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ४ ॥

(३२)

जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥ १ ॥
बुका लावूं नये भाळां । माळ घालूं नये गळां ॥ २ ॥
तट्टा वृषभासी दाणा । तृण मागों नये जाणा ॥ ३ ॥
तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥ ४ ॥

(३३)

ऐसे संत झाले कळी । तोंडीं तमाखूची नळी ॥ १ ॥
स्नान संध्या बुडविली । पुढें भांग वोढवली ॥ २ ॥
भांग भुर्का हें साधन । पचनीं पडे मद्यपान ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ ४ ॥

(३४)

होउनी संन्यासी भगवी लुगडीं । वासना न सोडी विषयांची ॥ १॥
निंदिती कदान्न इच्छिती देवान्न । पाहताती मान आदराचा ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसें दांभिक भजन । तया जनार्दन भेटे केंवी ॥ ३ ॥

(३५)

दाढी डोई मुंडीं मुडूनियां सर्व । पांघुरती वस्त्र बरवें काळें ॥ १ ॥
उफराटी काठी घेउनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रांसी ॥ २ ॥
चाळवुनी रांडा देउनियां भेष । तुका म्हणे त्यास यम दंडी ॥ ३ ॥

(३६)

भिक्षा पात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥ १ ॥
ऐसीयासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ २ ॥
देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव ॥ ३ ॥
समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥ ४ ॥
जगा घालावें सांकडें । दीन होउनि बापुडें ॥ ५ ॥
हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥ ६ ॥
काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार ॥ ७ ॥
तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥ ८ ॥

(३७)

जगीं कीर्ति व्हावी । म्हणोन जालासी गोसावी ॥ १ ॥
बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलेसें दूर ॥ २ ॥
चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ॥ ३ ॥
तुका म्हणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥ ४ ॥

(३८)

परपीडक तो आम्हां दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणऊनी ॥ १ ॥
दंडूं त्यागूं बळें नाव लोकूं डोळां । राखूं तो चांडाळा ऐसा दुरी ॥२॥
अनाचार कांहीं न साहे अवगुण । बहु होय मन कासावीस ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी एकविध सेवा । विमुख ते देवा बाळी चित्तें ॥ ४ ॥

(३९)

करिसी तें देवा करीं माझे सुखें । परी मी त्यासी मुखें न म्हणे संत ॥ १ ॥
जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभ माना इच्छे जालें ॥ २ ॥
जग देव परी निवडीन निराळें । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥ ३ ॥
तुका म्हणे भय न धरी मानसीं । ऐसियाचे विशीं करितां दंड ॥ ४ ॥

(४०)

अर्भकाचे साठीं । पंते हातीं धरिली पाटी ॥ १ ॥
तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥ २ ॥
बाळकाचे चाली । माता जाणुन पाउल घाली ॥ ३ ॥
तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥ ॥ ४ ॥

(४१)

माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥
जातां आड उभा राहे नारायणा । दयासिंधुपणा साच करी ॥ २ ॥
वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां अधीन झालीं देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥ ४ ॥

(४२)

कासियानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह फेडी आतां ॥ १ ॥
उदकें न्हाणूं तरी स्वरूपचि तुझें । तेथें देवा माझें काय वेंचे ॥ २ ॥
गंधाचा सुगंध, पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय वाहूं ॥ ३ ॥
वाहूं दक्षिणा परी धातु नारायण । अन्न परब्रह्म दुजें नाहीं ॥ ४ ॥
गातो तो ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया भार नाहीं कोठें ॥ ५ ॥
फळ दाता तूंच तांबूल अक्षता । तेथें मी अनंता काय वाहूं ॥ ६ ॥
तुका म्हणे हरी अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्ण हरी ॥ ७ ॥

(४३)

हेंचि माझें तप हेचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ १ ॥
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ २ ॥

हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ३ ॥
हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि जप ध्यान नाम तुझें ॥४॥
हेंचि माझें ज्ञान श्रवण मनन । हेंचि निजध्यासन नाम तुझें ॥ ५ ॥
हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ६ ॥

( ४४ )

माझा देवा तुम्ही केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळें ॥ १ ॥
कांहो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहे तैसा ॥ २ ॥
लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरीरत्न भार दुःखाचा हा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥ ४ ॥

( ४५ )

आम्ही मागों ऐसें नाहीं तुजपासीं । जरी तूं भीतोसि पांडुरंगा ॥ १ ॥
पाहें विचारूनि आहे तुज ठावें । आम्ही धालों नांवें तुझ्या एक ॥२॥
ऋद्धि सिद्धि तुझें मोक्ष भांडवल । हें तो आम्हां फोल भक्तीपुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाऊं वैकुण्ठा चालत । बैसोनि निवांत सुख भोगूं ॥ ४ ॥

( ४६ )

लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ॥ १ ॥
तैसा समरस जालों । तुजमाजीं हरपलों ॥ २ ॥
अग्नि कर्पूराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥ ३ ॥
तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥ ॥ ४ ॥

( ४७ )

जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेच करी ॥ १ ॥
उत्तमाचि गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीव खाणी ॥ २ ॥
परउपकारी नेणे परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ ३ ॥
भूतदया गाईपशूंचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजीं ॥ ४ ॥
शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडिलांचें ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परम पदबळ वैराग्याचें ॥ ६ ॥

( ४८ )

साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाहीं ॥ १ ॥
लोलुपता काय निद्रेसी जिंकावें । भोजन करावें परिमित ॥ २ ॥
एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण बोलों नये ॥३॥
संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥५॥

( ४९ )

प्रथम भाव शुद्ध कर । अंगीं वैराग्याचा भर ॥ १ ॥
भक्ति पाहिजे शिरजोर । याहूनि योग कोणता ॥ २ ॥
नको त्यजूं स्त्रिया पोर । बांधी सोपे माड्या घर ॥ ३ ॥
आपल्या अतिथा आदर । याहूनि धर्म कोणता ? ॥ ४ ॥
करी नामाचा गजर । जाणे संताची कदर ॥ ५ ॥
तुका म्हणे तोचि नर । ब्रह्मज्ञानी पुरता ॥ ६ ॥

( ५० )

मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचें कारण ॥ १ ॥
मोक्ष अथवा बंधन । सुखसमाधान इच्छा ते ॥ २ ॥
मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली ॥ ३ ॥
मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥ ४ ॥
मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य ॥ ५ ॥
प्रसन्न आप आपणांस । गति अथवा अधोगति ॥ ६ ॥
साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात ॥ ७ ॥
नाहीं नाहीं आन दैवत । तुका म्हणे दुसरें ॥ ८ ॥

( ५१ )

परिसें गे सुनेबाई । नको वेचूं दूध दही ॥ १ ॥
आवा चालली पंढरपुरा । वेसीपासुन आली घरा ॥ २ ॥
ऐक गोष्टी सादर बाळे । करी जतन फुटकें पाळें ॥ ३ ॥

माझे हातींचा कळवडू । मज वांचोनि नको फोडूं ॥ ४ ॥
बळवट क्षीराचें लिंपन । नको फोडूं मज वांचुन ॥ ५ ॥
उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥ ६ ॥
भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥ ७ ॥
भक्षीं परिमित आहारू । नको फारसी वरी सारूं ॥ ८ ॥
सून म्हणे बहुत निकें । तुम्ही यात्रेसि जावें सुखें ॥ ९ ॥
सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागिल आशा सोडा ॥ १० ॥
सूनमुखीचें वचन कानीं । ऐकोनि सासू त्रिवंची मनीं ॥११॥
सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ॥ १२ ॥
आतां कासया यात्रे जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ॥ १३ ॥
मुलें लेकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपुर ॥ १४ ॥
तुका म्हणे ऐसे जन । गोवियेलें मायें करून ॥ १५ ॥

( ५२ )

काय बा करिसी सोंवळें ओवळें । मन नाहीं निर्मळ वाउगेंचि ॥ १ ॥
काय बा करिसी पुस्तकाची मोट । घोकितां हृदयस्फोट हातां नये ॥२॥
काय बा करिसी टाळ आणि मृदंग । जेथें पांडुरंग रंगला नाहीं ॥ ३ ॥
काय बा करिशी ज्ञानाचिया गोष्टी । करणी नाहीं पोटीं बोलण्याची ॥४॥
काय बा करिसी दंभलौकिकातें । हित नाहीं मात तुका म्हणे ॥ ५ ॥

( ५३ )

ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतित पावना देवराया ॥ १ ॥
संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥ २ ॥
आचार करितां म्हणती हा पसारा । न करितां नरा निंदताती ॥ ३ ॥
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ॥ ४ ॥
धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा । समर्थासी ताठा म्हणताती ॥ ५ ॥
बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥६॥
भेटिसी नव जातां म्हणती हा निष्ठुर । येतां जातां घर बुडविलें ॥ ७ ॥

लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥ ८ ॥
निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ॥ ९ ॥
लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरेना संतसंग ॥ ॥ १० ॥
तुका म्हणे आतां ऐकावें वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

( ५४ )

दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें ॥ १ ॥
पाप त्याचें नांव न विचारी नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा ॥ २ ॥
धर्मनीतीचा हा ऐक वेव्हार । निवाडिलें सार असार तें ॥ ॥ ३ ॥
तुका म्हणे धर्म रक्षावयासाठीं । देवासही आटी जन्म घेणें ॥ ४ ॥

( ५५ )

विधीनें सेवन । विषय त्यागातें समान । ॥ १ ॥
मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ ॥ २ ॥
बहु अतिशय खोटा । तर्क होती बहुवाटा । ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । कृपा करिजेते देवें ॥ ॥ ४ ॥



## ५ : स्फुट-काव्य

### ४३. आरती

फळलें भाग्य माझें । धन्य झालों संसारीं ।
सद्‌गुरु भेटले हो । त्यांनीं धरियेलें करीं ॥
पश्चिमे चालवीलें । आत्मा तेथें निर्धारी ।
त्रिकुटावरी नांदे । देखियेली पंढरी ॥ १ ॥

तें सुख काय सांगूं । वाचे बोलतां नये ।
आरतीचेनि योगें । गेलें मीपण माये ॥ ध्रु० ॥

राउळामाजी जातां । राहे देह अवस्था ।
मन हें उन्मन झालें । नसे बद्धतेची वार्ता ॥
हेतु हा मावळला । शब्दा आली निःशब्दता ।
तटस्थ होउनि ठेलें । निजरूप पाहातां ॥ २ ॥

त्रिगुण गुण बाई । पूर्ण उजळल्या वाती ।
नवलाव अविनाश । न जाये स्वयंज्योती ॥
लावितां लक्ष तेथें । हालूं विसरलीं पातीं ।
नातुडे मन माझें । नकळे दिवस रात्री ॥ ३ ॥

आरती विठ्ठलाची । पूर्ण उजळली अंतरीं ।
प्रकाश थोर झाला । सांठवेना अंबरीं ॥

रविशशि मावळले । तया तेजा माझारीं ।
वाजती दिव्यवाद्यें । अनुहत गजरीं ॥ ४ ॥
आनंदसागरांत । प्रेमें बुडी दिधली ।
लाधलें सौख्य मोठें । नये बोलतां बोली ॥
सद्गुरुचेनि संगें । ऐसी आरती केली ।
निवृत्ति आनंदांत । तेथें वृत्ति निमाली ॥ ५ ॥

## ४४. नामदेवाचा बोबडा

कुत्ना थमाल ले थमाल अपुल्या गाई ।
आम्ही अपुल्या घलासि जातों भाई ॥ ध्रु० ॥
तुम्ही थोलल्या पातलाचे लेक ।
तुम्हामधी ले मी गलीब आहे एक ॥
मदला म्हनतां ले जाई गायी लाग ।
किती मी धांवूं ले कांता लागला पाई ॥ कुत्ना ॥ १ ॥
काली पिवली ले गाय आहे तान्हेली ।
या या गवल्याची धवली गाय पलाली ।
मदला देखुनि तो गवली हांका माली ।
काली कांबली हिलुनि घेतली थाली ॥ कुत्ना ॥ २ ॥
काल बलाचि ले बलाचि खलवस केला ।
तुम्हि सल्वांनीं फाल फाल घेतला ॥
मी गलीब ले म्हनुनि थोलका दिला ।
तूं म्हनसिल ले 'याला कलतचि नाहीं!' ॥ कुत्ना ॥ ३ ॥
कृष्ण म्हणे 'रे उगा राहिं बोबड्या ।
तुझ्या गायी रे मीच वळवितों गड्या ॥
नाहीतर धाडिन रे गोपाळांच्या जोड्या' ।
नामा म्हणे रे गोष्ट रोकडी पाहीं ॥ कुत्ना ॥ ४ ॥

## ४५. कानोबा

पहिलें कोठेंच नव्हतें कांहीं । चंद्र सूर्य तारा नाहीं ।
अवघें शून्यचि होतें पाही । कानोबा तें रे तें रे तें ॥ १ ॥

तेथें एक ढालगज निर्माण झाली । तिनें पहा एवढी ख्याती केली ।
इंद्रादिकांस म्हणे बाहुली । अमरपुरीं तिची घरकुली ॥ कानोबा ॥ २ ॥

ती मूळची कर्णकुमारी । तिचा बाप तो ब्रह्मचारी ।
तो जन्मला तियेचे उदरीं । ऐसी पाहतां नवल परी ॥ कानोबा ॥ ३ ॥

तिनें बापचि दादला केला । कोण वाईट म्हणे या बोला ।
अवघें तिच्याच बोलणें चाला । तरी कैवल्यसुख तुम्हांला ॥ का० ॥ ४ ॥

तो तियेस शिवला नाहीं । वांझ गर्भिण झाली पाहीं ।
व्याली पांच पंचवीस पोरें ताहीं । ऐसें तियेचें नवल पाहीं ॥ का० ॥ ५ ॥

ऐशी व्याली ते सकळ सृष्टी । न पडतां भ्रताराचे दृष्टी ।
एकाजनार्दनी या गोष्टी । विचारा सद्गुरुच्या मुखीं ॥ का० ॥ ६ ॥

## ४६. पांखरूं

कृष्णा एक पांखरूं आहे । तें मुखावीण चारा खाय रे ।
डोळे नाहीं परि ते पाहे । वाचे विण स्वयें गाय रे ॥१॥

सख्या त्याचें नांव कान्होबा । कृष्ण म्हणती सर्व रे ।
त्याचें वास्तव्य कोठें आहे । पर नाहीं परि तें उडे रे ॥ ॥२॥

तिन्ही लोकीं हिंडतें । त्रिभुवन त्याला थोडें रे ।
त्याचे नखांत आकाश बुडे । तो सन्मुख चहुंकडे रे ॥३॥

अहो त्याला मायबाप दोन्ही नाहीं रे । एकपणें विण पहाती
जनार्दनाचे पायीं रे ॥४॥

## ४७. भूपाळी

उठि रे गोपाळा । उघडी स्वरूपलोचना ।
सरली अविद्याराती उदय झाला रविकिरणा ॥
इंद्रिय-गोधनें नेइ निर्गुण कानना ।
सुटलीं मानस-वत्सें तुजविण नाकळती कोणा ॥ ध्रु० ॥

प्रबोध पहाट झाली सरले तिमिर तम-रज ।
गुरुकृपेचा अरुण दावी सुरंगसम तेज ॥
आत्मादिनकर पाठीं प्रगटे तात्कालिक सहज ।
जिवचंद्राचें मंडळ तेणें झालें निस्तेज ॥ १ ॥

दृश्यभास चांदणिया असते ठायींच लोपलिया ।
लिंगदेह कमळींचे मधुकर सुटले आपसया ॥
बुद्धिबोध चक्रवाकें मिनलीं आपणियां ।
देहबुद्धि कुमुदिनी सुकोनी गेलीसे विलया ॥ २ ॥

योगविद्येच्या पंथें साधकवृंदे चालियलीं ।
उपनिषद्भागार्थ शब्द केला कोकिळीं ॥
वाग्वादाचे उलूक निघती मौनाचें ढोलीं ।
विकल्प अटवीं साही चोरी सांडियली ॥ ३ ॥

विरागरश्मी जवळीं धरितां चित्त रविकांत ।
आत्मा वन्ही प्रगटे विषयवन हें जाळीत ॥
तृष्णेच्या श्वापदावरी प्रळय अद्भूत ।
विश्व हें लटिकें मूढां मृगजळवत् ॥ ४ ॥

जार व्यसनीं जिव हा झाला उदमीं सुविचार ।
वासना कुंटिणीचा सहजे खुंटला व्यापार ॥
लीलाविश्वंभरस्वामी उठिला सत्वर ।
चाले मुक्तेश्वर संगीं धरुनियां कर ॥ ५ ॥

## ४८. श्रीवनभुवनी

( अनुष्टुभ् छंद )

जन्मदुःखें जरादुखें। नित्य दुःखें पुन्हपुन्हा।
संसार त्यागणें जाणें। आनंदवनभुवना ॥ १ ॥
वेधलें चित्त जाणावें। रामवेधी निरंतरीं।
रागें हो वीतरागें हो। आनंदवनभुवना ॥ २ ॥
संसार वोढितां दुःखें। ज्याचें त्यासीच ठाउकें।
परंतु येकदां जावें। आनंदवनभुवना ॥ ३ ॥
न सोसे दुख तें होतें। दुःख शोक परोपरी।
येकाकी येकदां जावें। आनंदवनभुवना ॥ ४ ॥
कष्टलों कष्टलों देवा। पुरे संसार जाहला।
देहेत्यागासी येणें हो। आनंदवनभुवना ॥ ५ ॥
जन्म ते सोसिले मोठे। अपाय बहुतांपरी।
उपायें धाडिलें देवें। आनंदवनभुवना ॥ ६ ॥
स्वप्नीं तें देखिलें रात्रीं। तें तें तैसेंची होतसे।
हिंडतां फिरतां गेलों। आनंदवनभुवना ॥ ७ ॥
हे साक्ष देखिली दृष्टी। किती कल्लोल उठीले।
विघ्नघ्ना प्रार्थिलें गेलों। आनंदवनभुवना ॥ ८ ॥
स्वधर्माआड जें विघ्नें। तें तें सर्वत्र उठीलीं।
लाटिलीं कुटिली देवें। दापिलीं कापिलीं बहु ॥ ९ ॥
विघ्नाच्या उठील्या फौजा। भीम त्यावरी लोटला।
घडिलीं चिर्डिलीं रागें। रडविलीं बडविलीं बळें ॥ १० ॥
हाकिलीं टाकिलीं तेणें। आनंदवनभुवनीं।
हांक बोंब बहु जाली। पुढें खेतल्ल मांडिलें ॥ ११ ॥
खौळले लोक देवाचे। मुख्य देव ची उठीला।
कळेना काय रे होतें। आनंदवनभुवनीं ॥ १२ ॥

स्वर्गीची लोटली जेथें । रामगंगा महा नदी ।
तीर्थासी तुळणा नाहीं । आनंदवनभुवनी ॥ १३ ॥

ग्रंथीं जे वर्णिली मागे । गुप्तगंगा महा नदी ।
जळांत रोकडे प्राणी । आनंदवनभुवनीं ॥ १४ ॥

सकळ देवांची साक्षी । गुप्त उदंड भूवने ।
सौख्यच पावणें जाणें । आनंदवनभुवनी ॥ १५ ॥

त्रैलोक्य चालिलें तेथें । देव गंधर्व मानवी ।
ऋषी मुनी माहा योगी । आनंदवनभुवनी ॥ १६ ॥

आक्रा आक्रा बहु आक्रा । काय आक्रा कळेचिना ।
गुप्त तें गुप्त जाणावें । आनंदवनभुवनीं ॥ १७ ॥

त्रैलोक्य चालिल्या फौजा । सौख्य बंदविमोचनें ।
मोहीम मांडली मोठी । आनंदवनभुवनीं ॥ १८ ॥

## ४९. करुणाष्टकें

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ।
परम दिनदयाळा नीरसी मोहमाया ॥
अचपल मन माझें नावरे आवरीतां ।
तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥

भजनरहित रामा सर्वही जन्म गेला ।
स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥
रघुपति मति माझी आपलीसी करावी ।
सकळ त्यजुनि भावें कास तुझी धरावी ॥ २ ॥

विषयजनितसूखें सूख होणार नाहीं ।
तुजविण रघुनाथा वोखटें सर्व कांहीं ॥
रघुकुलटिळका रे हीत माझें करावें ।
दुरित दुरि हरावें स्वस्वरूपीं भरावें ॥ ३ ॥

तनु मन धन माझें राघवा रूप तूझें ।
तुजविण मज वाटे सर्व संसार ओझें ॥
प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।
अचल भजनलीला लागली आस तूझी ॥ ४ ॥

चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ।
सकळस्वजनमाया तोडितां तोडवेना ॥
घडिघडि बिघडे हा निश्चयो अंतरींचा ।
म्हणवुनि करुणा हे बोलतो दीनवाचा ॥५॥

जळत हृदय माझें जन्म कोटयानुकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी ॥
तळमळ निववी रे राम कारुण्यसिंधू ।
षडरिपुकुळ माझें तोडिं यांचा समंधू ॥ ६ ॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ।
शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी ॥
झडकरि झड घालीं धांव पंचानना रे ।
तुजविण मज नेती जंबुकी वासना रे ॥ ७ ॥

सबळ जनक माझा राम लावण्यकोटी ॥
म्हणवुनि मज पोटीं लागली आस मोठी ॥
दिवस गणित बोटीं ठेवुनी प्राण कंठीं ।
अवचट मज भेटी होत घालीन मीठी ॥ ८ ॥

जननिजनकमाया लेकरू काय जाणे ।
पय न लगत मूखीं हाणितां वत्स नेणे ॥
जलधरकण आशा लागली चातकासी ।
हिमकर अवलोकी पक्षिया भूमिवासी ॥ ९ ॥

तुजविण मज तैसें जाहलें रामराया ।
विलग विषमकाळीं सांडिती सर्व माया ॥

सकळजनसखा तूं स्वामि आणीक नाहीं ।
विषय वमन जैसें त्यागिलें सर्व कांहीं ॥ १० ॥
स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ॥
जिवलग जिव घेती प्रेम सोडून जाती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ११ ॥
सकळ जन भवाचे आखिले वैभवाचे ।
जिवलग मज कैचे चालतें हेचि साचें ॥
विलग विषयकाळीं सांडिती सर्व माळी ।
रघुविर सुखदाता सोडवीं अंतकाळीं ॥ १२ ॥
सुख सुख म्हणतां हें दुःख ठाकोनि आलें ।
भजन सकळ गेलें चित्त दुश्चित्त झालें ॥
भ्रमित मन कळेना हीत तें आकळेना ।
परम कठिण देहो देहबुद्धी गळेना ॥ १३ ॥
उपरति मज रामीं जाहली पूर्ण कामी ।
सकळजनविरामी राम विश्रामधामीं ॥
घडि घडि मन आतां रामरूपीं भरावें ।
रघुकुळटिळका रे आपुलेंसें करावें ॥ १४ ॥
जळचर जळवासी नेणती त्या जळासी ।
निशिदिनिं तुजपाशीं चूकलों गूणराशी ॥
भुमिधरनिगमांसी वर्णवेना तयांसी ।
सकळ भुवनवासी भेटि दे रामदासी ॥ १५ ॥

## ५०. मनास बोध

मना ! वासना शुद्ध तूझ असावी, दया सर्व भूतादिकीं ही वसावी, ।
असावें तुवां सात्विकें, सांडि कोपा, म्हणे वामना जाणिजे पुण्यपापा ॥ १ ॥

मना ! कर्मठा ऐक रे ! ऐक माझें, नको घोर संसार हा व्यर्थ ओझें, ।
बुडाला वृथा मानवी देह तापें, म्हणे वामना जाणिजे पुण्यपापें ॥ २ ॥
मना ! रे ! तुला सत्य संसार भासे, नव्हे सत्य संसार हा व्यर्थ नासे, ।
असें जाणुनी बुडसी अंधकूपा, म्हणे वामना जाणिजे पुण्यपापा ॥ ३ ॥
मना ! बोलण्याचें नको दुःख मानूं, जनीं निंद्य तें व्यर्थ वाचेस आणूं ।
दिसंदीस तूं मूर्ख होशील बापा, म्हणे वामना जाणिजे पुण्यपापा ॥४॥
मना ! वासना सत्य जीवीं धरावी, पराशा तुला स्वल्प तेही नसावी ।
विवेकें मदा लेश तो आवरावा, म्हणे वामना पुण्यठेवा करावा ॥ ५ ॥
मना ! मानसीं सांगतों हीत तूझें, तुटे सर्व अज्ञान हें भ्रांतिओझें ।
तुझा हेत तो रामरूपीं भरावा, म्हणे वामना पुण्यठेवा करावा ॥ ६ ॥
मना ! वीषयीं गुंतसी कोण काजें, तुला ज्ञान वैराग्य हें सर्व साजे, ।
बहूतां परी बोध जीवीं धरावा, म्हणे वामना पुण्यठेवा करावा ॥ ७ ॥
मना ! बोध जीवीं धरी हीतकारी, नव्हे व्यर्थ हा पाहिं तूं कां विचारी, ।
तुझे अंतरीं संशयो तो नुरावा, म्हणे वामना पुण्यठेवा करावा ॥ ८ ॥

## ५१. उमारमासंवाद

एके काळीं पार्वती आणि पद्मा, सारीपाटा खेळती चित्रसद्मा; ।
डावीं हर्ता बोलती लोकधर्मा, हांसोनिया काढिती वर्मकर्मा ॥ १ ॥
‘ कोठें भिक्षुक ? सांग गे ! ’ ‘ बळिगृहीं मागे भुमीदान तो. ’
‘ कोठें तो पशुपाळ ? ’ ‘ गोकुळिं असे, वत्सें गुरें राखतो ॥
‘ सर्पाधीश कुठें असे ? वद सखे ! ’ ‘ निद्रिस्थ शेषावरी ’
‘ कोठें सांग स्मशानवास करितो ? ’ ‘ वृंदास्मशानीं हरी ’ ॥ २ ॥
‘ इंद्राची अमरावती बळि बळें घे; शक्र यज्ञादिकें ।
तेव्हां श्रीहरि साह्य येउनि, तया मागे महाकौतुकें; ।
दैत्याच्या वचना जिणोनि, सखये ! देवेंद्र तो राक्षिला;
भिक्षा मागुनि शंकरें नृपतिचा सत्पुत्र तो भक्षिला ’ ॥ ३॥

‘ ऐकें गे सखये । स्वभक्त अपुला जाणोनियां, निश्चयें ।
त्यातें शोधुनि, तुष्टला अतिशयें पुत्रासि देतां स्वयें: ।
स्त्रीपुत्रासमवेत नेउनि पदीं श्रीशंकरें स्थापिलें;
देतां मावाशिनें स्तनासि हरिनें जीवें कसें भक्षिलें ? ॥ ४ ॥

राक्षेसी पुतना स्तनीं विष भरी, मारीन हें अंतरीं;
आली ते शर्वरी, कृपा बहु परी केली जयीं श्रीहरी, ।
नेली मोक्षपदा, हरी विषमता नेणे कदा तो स्वयें;
पोटालागिं नसे, तरी शिव सखे ! घे वीष गे ! निश्चयें ’ ॥ ५ ॥

‘ क्षीराब्धी मथिला सुरासुर इहीं, रत्नें तदा काढिलीं;
दीलीं उत्तम पाहुनी सकळिकां श्रीशंकरें त्या स्थळीं; ।
वांटी त्यासि सुरे, उरे विष तया कोणी न घेती पहा;
अंगीकार करी म्हणोनि सखये ! कंठीं धरी शीव हा ॥ ६ ॥

‘ पोटालागिं नसे, तरी व्रजपुरीं चोऱ्या करी श्रीहरी; ।
मागे दुग्ध, दधी बरें, नवनिता, मारी यशोदा बरी; ॥
तेव्हां जाउनि, भक्षिली यमुनिची माती किती ? सांग गे, ! ।
क्रोधें धांवुनि मारितां जननिनें, वासी कसें तोंड ? गे ! ॥ ७ ॥

‘ गौळी जे ! गिरिजे ! तयांसि न कळे सद्ब्रह्म हा श्रीहरी; ।
भक्तीनें भुलला, म्हणोनि सखये ! भावार्थ चोऱ्या करी; ॥
ऐसें कीं न कळे, म्हणोनि वदनीं मातीमिसें दाविलीं, ।
ब्रह्मांडें शतकोटि, तोंड पसरी त्यामाजि तों देखिलीं. ॥ ८ ॥

‘ ऐकें गे गिरिजे ! हरें वर दिला भस्मासुराला जयीं, ।
तेव्हां तो सखये ! फिरोनि पडला श्रीशंकराला तयीं; ॥
तोंडें वासुनियां शिवें स्मरियला श्रीकान्त माझा भला; ।
दैत्या भस्म करोनि सोडवि हरी, तें सांग तूं कीं मला ! ॥ ९ ॥

‘ लक्ष्मी ! ऐकासि • काळयौवन जधीं पाठीस तो लागला, ।
तेव्हां श्रीहरिनें शिवास स्तावितां, तत्काळ तो पावला; ॥

कृष्णातें मुचकुंद आड करितां दैत्येंद्र तो पावला; ।
निद्रा मोडित त्यासि भस्म करुनी श्रीकृष्ण तो रक्षिला' ॥ १० ॥
बाई ! ब्रह्मकपाट पाठिसि जधीं श्रीशंकरा लागलें, ।
ब्रह्मांडीं फिरला, परंतु न सुटे, विष्णूसि बोभाइलें; ॥
ब्रह्मयाला उपदेश देउनि, सखे ! रुद्रासि गे ! रक्षिलें; ।
दोघांच्या स्वरुपासि भेद नसतां, सुःशासन तें राहिलें ॥ ११ ॥
विष्णू शंकर दोन भिन्न नसती, सद्ब्रह्मिंच्या चित्कळा; ।
दोघांची नकळे अतर्क्य करणी, ते कोण वर्णी लिळा ? ॥
शब्दांची कुसरी, विनोद रचिला, संवाद झाला भला; ।
लक्ष्मी पार्वति भेटल्या अनुभवें, आनंद झाला मला ॥ १२ ॥
लक्ष्मीपार्वतिचा विवाद बरवा गाती, स्वयें ऐकती; ।
त्याला विष्णुपदीं उमा आणि रमा नेऊनियां स्थापिती; ॥
सत्पुत्रादि कलत्र मित्र सकळीं, आनंद भोगी स्वयें; ।
भावार्थे वदला अनंदतनयो, सत्यार्थ हा निश्चयें ॥ १३ ॥

## ५२. अमृतरायाचीं पदें

(१)

होउनि गोसांवी गोसांवी । हरिकथाची परिसावी ॥ ध्रुवपद ॥
गमन नसे ज्या गांवीं । तेथिल वाट कशास पुसावी॥ होउनि० ॥ १ ॥
भिक्षा मागुन निस्पृहतेनें । संगतिचीं पोसावीं ॥ होउनि० ॥ २ ॥
मिळोत कां खंबाळें । अथवा भगवींही नेसावीं ॥ होउनि० ॥ ३ ॥
दुर्वाक्यें सोसावीं । आपण अमृतवृष्टि वर्षावी ॥ होउनि० ॥ ४ ॥

(२)

कोठें नवजावें नवजावें । श्रीहरिलागिं भजावें ॥ ध्रुवपद ॥
दोचौ दिवसा घाटा भरडुनि । उदक करुनियां प्यावें ॥ कोठें० ॥ १ ॥
समयीं आल्या अतीताशीं । यथाशक्ति भोजन द्यावें ॥ कोठें० ॥ २ ॥
स्त्रीपुत्रादिक छळिती । त्यांचें वचन उगेच सोसावें ॥ कोठें० ॥ ३ ॥

श्रीमद्भगवतालागिं वाचुनि । आपण आपणा उमजावें ॥ कोटें० ॥ ४ ॥
स्वच्छंदें उठतां बसतां । नामीं अमृतेश्वरासी गावें. ॥ कोटें० ॥ ५ ॥

( ३ )

जगव्यापका हरीला नाहीं कसें म्हणावे ॥ ध्रुवपद ॥
तंतूपटीं मिळाले भूमी नभापरी हो ! ।
घट मृत्तिका निराळी ऐसें कसें म्हणावें ? जग० ॥ १ ॥
मुक्ता सुतेज पाणी पुष्पीं सुगंध तो हा. ।
मैळागिरी सुवासा नाहीं कसें म्हणावें ? जग० ॥ २ ॥
गोडी ती साखरेची पाखडीतां न ये बा ! ।
भिन्नत्व हेम वस्तू ऐसें कसें म्हणावें ? जग० ॥ ३ ॥
मी मागतों तुम्हांला तुम्हि ध्या श्रीपांडुरंगा, ।
अमृतेश्वराचे भजनीं द्वैत कसें म्हणावें ? जग० ॥ ४ ॥

( ४ )

बा ! तुझा चालता काळ । खायाला मिळती सकळ ॥ ध्रुवपद ॥
हे कोण बायकोचे मामे । घरांत वागती रिकामे ।
सगरशेल्याचे रुजामे । भोजनभाऊ केवळ ॥ बा तुझा० ॥ १ ॥
हे कोण बायकोचे साले । तुपाविगळा घांस न गिळे ।
तांदूळ रांधावे मोकळे । केलें बेबीचें उखळ ॥ बा तुझा० ॥ २ ॥
साल्या मेहुण्या घरास येती । फराळाच्या बसती पंक्ती ।
नातें उकरोनी काढिती । अवघा मायेचा गोंधळ ॥ बा तुझा० ॥ ३ ॥
अमृतेश्वर म्हणे रे मूर्खा । कां भुललासि मायेच्या सुखा ? ।
अंतीं एकटा जाशिल नरका । भज भज श्रीगुरुदयाळ ॥बा तुझा०॥४॥

( ५ )

अशाश्वत संग्रह कोण करी ? ॥ ध्रुवपद ॥
कोण करी परि सोपे माड्या । वस्ति बरी विवरीं ॥ अशाश्वत० ॥ १ ॥
चिरगुट चिंध्या जोडुनि कंथा । गोधडि हेचि बरी ॥ अशाश्वत० ॥२॥

नित्य नवें जें देईल माधव । मक्षं तेंचि घरीं. ॥ अशाश्वत० ॥ ३ ॥
आत्मस्त्रीसुत परकीं होतीं । ठेविति भूमिवरी ॥ अशाश्वत ॥ ४ ॥
नित्य मिळेल तें नित्यचि भक्षुनी । चिंतिन देव हरी ॥अशाश्वत० ॥५॥
सांडुनि सेवा कल्पतरूमम । भिक्षा हेचि बरी ॥ अशाश्वत० ॥ ६ ॥
त्रिविधजना त्याजुनि उपार्जन । स्वस्थ बसेन घरीं ॥ अशाश्वत० ॥ ७ ॥
अमृत म्हणे मज भिक्षेचे डोहळे । उठति आशालहरी ॥ अशाश्वत ॥८॥

## ५३. केकावलि

सदाश्रितपदा ! सदाशिवमनोविनोदास्पदा ! ।
स्वदासवशमानसा ! कलिमलांतका ! कामदा ! ॥
वदान्यजनसद्‌गुरो ! प्रशमितामितासन्मदा ! ।
गदारिदरनंदकांबुजधरा ! नमस्ते सदा. ॥ १ ॥

पदाब्जरज जें तुझें, सकलपावनाधार तें, ।
अघाचलहि तारिले बहु तुवांचि राधारतें; ॥
अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा, ।
अशां गति दिली; उरे न तृण भेटतां इंगळा. ॥२॥

तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें; ।
न तें अनृत, वर्णिती बुध जनीं सदाचार जें; ॥
असे सतत ऐकते, सतत बोलते, मीच ते ।
प्रमाण न म्हणों जरी उचित माझिया नीचते. ॥३॥

तसाचि उरलों कसा ? पतित मी नसें काय ? कीं ।
कृपाचि सरली ? असेंहि न घडे जगन्नायकीं; ॥
नसेन दिसलों कसा ? नयन सर्वसाक्षी रवी; ।
विषाद धरिला म्हणों ? न सुरभी विषक्षीर वी. ॥४॥

व्रजावन करावया वसविलें नखाग्रीं धरा; ।
सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्टीं धरा; ॥
वराहतनु घेउनी उचलिली रदाग्रे धरा; ।
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ! न कां उद्धरा ? ॥५॥
नतावनधृतव्रत ! ज्वलन तूंचि वाधावनीं; ।
पदप्रणतसंकटीं प्रजव तूंचि वा ! धावनीं; ॥
दया प्रकट दाखवी कवण सांग त्या वारणीं ? ।
सतीव्यसनवारणीं, जयजयार्थ त्या वा रणीं ? ॥६॥
न पावसि, म्हणोनि मी म्हणतसें तुला आळशी; ।
बरी न असदुक्ति हे रविसखोल्थिता आळशी; ॥
असंख्य जन तर्पिले, क्षुधित एकला जेमनीं ।
चुकेल, तरि त्यास दे, परि वदान्य लाजे मनीं. ॥७॥
'अगा ! प्रणतवत्सला !' म्हणाति त्या जनां पावलां, ।
म्हणोन तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां ? ॥
'करूं बरि कृपा, हरूं व्यसन, दीन हा तापला.'
असें मनिं धरा खरा भंरवसा मला आपला. ॥८॥
मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा ।
म्हणे, 'अगइ ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप' गा ! ॥
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला; ।
न घालिन भिडेस मी, जरिहि कार्यलोभी तिला ॥९॥
सदैव नमितां जरी पदललाट केलें किणें, ।
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें; ॥
नतां करुनि मुक्तही म्हणसि 'मी बुडालों रिणें',
अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ! ॥१०॥
पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनीं,
द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं; ॥

यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली; तरी हा 'वरा'
म्हणे ' अधिक द्याच कीं,' अखिल याचकीं हावरा. ॥११॥
असें न म्हणशील तूं वरद वत्सल, श्रीकरा ! ।
परंतु मज भासलें म्हणुनि जोडितों मी करा; ॥
दिलें बहु बरें खरें, परि गमे कृपा व्यंग ती,
अलंकृतिमती सती मनिं झुरें, न जो संगती. ॥१२॥
कराल पुरती दया, तरि असो दिलें पावलें; ।
परंतु हरि ! एकदां त्वरित दाखवा पावलें; ॥
प्रसाद करणें मनी जरि नसेल, हें आवरा; ।
जया बहु तयास द्या, मज कशास ? मी हावरा. ॥१३॥
' दिलें, फिरुनि घेतलें, अशि अकीर्ति लोकीं न हो; ।
सुनिर्मल तुझीं पदें कधिं तरी विलोकीन, हो ! ॥
निजप्रियजनाकडे तरिहि दे हवाला; जशी ।
पडेल समजाविशी, तशि करोत; कां लाजशी ? ॥१४॥
अहा ! निपट धृष्ट मीः प्रभुवरासि ' कां लाजशी ? ' ।
म्हणें: तुज नसो तशी विकृति, भाविकांला जशी. ॥
परंतु अपराध हा गुरु, म्हणोनि शिक्षा करीं; ।
असेचि धरिली नयच्युतदमार्थ दीक्षा करीं ॥१५॥
सदैव अपराध हे रचितसें असे कोटि, गा ! ।
स्वयेंहि कथितों, नसे तिळहि लाज, मी कोटिगा; ॥
अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवाः ।
न त्यांत अवकाश या ? स्थळ दिलें तदा कां दवा ? ॥१६॥
तुझ्या जिरविले बहु प्रणतमंतु पोटें, पण ।
त्यजी मदपराध, हें मजकडेचि खोटेंपण; ॥
दवाग्नि जठरीं अतिक्षुधित, त्यास हें अन्न द्या; ।
वितृष्ण करिती श्रितां तुमचिया दयासन्नद्या ॥१७॥

न होय कवणाहि, तें तुमचियाचि लीलालसें, ।
पदें चरित दाविजे त्रिजगदब्जकीलालसें; ॥
मदुद्धरण मात्र कां जड तुम्हां दिसे ? वारिती ।
स्वकव्यसन मर्त्यही, न करितीच सेवा रिती ॥१८॥
दयाब्द वळशील तूं, तरि न चातकां सेवकां ।
उणें किमपि; भाविकां उबगशील तूं देव कां ? ।
अनन्यगतिका जनां निरखितांचि सोपद्रवा,
तुझेंचि, करुणार्णवा ! मन धरी उमोप द्रवा ॥१९॥

## ५४. संशयरत्नमाला

कीं न श्रवणीं गेली ही माझी हाक; हा कसा तर्क ? ।
कशि गुरुजनीं सतीची ? शिवला ज्या कुमुदिनीस असदर्क. ॥१॥
कीं हाक ऐकतांचि, प्रभुला हा रक्षणार्हसें वाटे; ।
वाटे या दुःशीलग्रीष्मीं नवनव दयानदी आटे ॥२॥
कीं पावावें समयीं, सदय ! मनांतूनि योजिलें जरि तें, ।
तरि जेविं रुक्मिणीचें चित्ता, माझें अधीर मन करितें ॥३॥
किंवा पुराणपुरुषा ! संप्रति बहु भागलासि, या कामीं, ।
तुज नीज लागली तो, सजलों मारावयासि हाका मी ॥४॥
किंवा, बरी परीक्षा केल्यावांचूनि, न प्रसाद करा ।
तरि, वरि तसाचि आंतहि उगाळितां कोळसा, प्रयास करा ॥५॥
कीं धाडिलें पुढें निज नाम, करो सर्व सिद्धता आधीं;
ऐसें प्रभो ! म्हणावें, तरि तुमचीं चरणसारसें साधीं ॥६॥
कीं आर्जविला नामप्रतिनिधि; हा अमृत उधळितो स्वैर; ।
न पुसे, न भी; न ऐके; यास्तव दोघांत लागलें वैर ॥७॥
कीं संप्रति अभय दिलें कलिला, चालावया बरें राज्य ।
परि कोण प्राणि सदय शिंपील बळें दवानलीं आज्य ? ॥८॥

किंवा म्हणसि ' समर्थोऽहं कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं ' ।
दीनावनाविणें क्षण देइल दयितादया कशी वर्तुं ? ॥९॥
कीं अक्षक्रीडेनें हरिलें मन; सर्व कार्य जी चुकवी ।
तरि बद्धमूळ एकचि भजदवनव्यसन वर्णिती सुकवी ॥१०॥
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे, नसावेंची, ।
वसवा पुरे, 'पुरे' कां म्हणतां ? धनवंत कण कसा वेंची ? ॥११॥
कीं बहुकाळ विसरला, फारचि संकोचला, सखा लाजे ।
येत असेल हळूहळू, म्हणुनाचि एकाहि न पादुका वाजे ॥१२॥
कीं श्रीभुजबंधांतुनि व्हावे त्वां मुक्त, म्यांहि तव्हांची; ।
स्त्रीजित नसोनि, होतें स्त्रीचीं समजाविशीच केव्हांची ? ॥१३॥
कीं नाम स्पर्शमणि स्पर्शे, परि काय करिल ? खापर मी ।
सदयहि घालील कसा दुर्द्रव्याला सुखी सखा परमीं ? ॥१४॥
कीं प्रथम मदपराधें ' तारूं ना ' म्हणुनि वाहिल्या आणा ।
प्रभुजी ! पुरे प्रतिज्ञा; भारतरणवृत्त तें मनीं आणा. ॥१५॥
कीं याचकांसि देतां; सरले चारीहि मुक्तिधनराशी; ।
भक्तिच मज द्या; द्यावें देवाला अमृत; योग्य न नरासी. ॥१६॥
कीं जरि म्हणाल, ' असतां जन्मशुाचि, स्वपदनीरजा मिळतों; ।
तरि झकावितां मला, आजि चुकला नव्हताचि कीं अजामिळ तो. ॥१७॥
कीं हो कळानिधि द्विजराज, नको, ज्यासि लागला डाग
तरि काय प्रभुवर्या चुकला तुमचा गुरू महाभाग ? ॥१८॥
कीं वाटलें खळाला मुक्ति न द्यावी, जशी सुधा सर्पा;
तरि ती अघादिकांला द्या, सुवरा भक्तिमात्र मज अर्पा. ॥१९॥
कीं अकृपा नावडती, आवडती स्त्री कृपा, तिचें प्राज्य ।
लेकत्रयांत, देवा ! पहिलीचें काय एक मी राज्य ? ॥२०॥
कीं गमलें जरि आधीं म्हणतों दावा स्वपाद; या लोकीं ।
जो जो वांछिल जें जें, तें द्यावें हें मुधा दयाळो ! कीं ? ॥२१॥

कीं आजकाल ज्याचा तेणें अधिकार घेतला रागें; ।
तरि हें अश्रद्धेय; प्रभ्वंतर ऐकिलें नसे मागे; ॥२२॥
कीं भेटि वहुदिसां; भय भेटाया दीन बंधुला वाटे;
तरि भेटावें विधिनें; गेले जाताति साधु ज्या वाटे ॥२३॥
कीं स्त्रीपूर्वशिखंडी, त्यातें समरांत भीष्म पाहेना ।
मीही पहिला पापी; तैसें करितां सुकीर्ति राहेना. ॥२४॥
कीं 'धर्मसंकटीं बळ न चले' रोषें म्हणों नको; पार्थ ।
ब्राह्मणकार्य कसें करि? वदतों प्रीत्यर्थ हें न कोपार्थ. ॥२५॥
की भीशी, मज एका उद्धरिता, लागतील फार झटे ।
तरि, कोणाहि न कळतां, न्यावा झाकोनि दास पीतपटें ॥२६॥
कीं लक्षभोजनापरि केला संकल्प संपला, देवा! ।
तरि, दाते क्षुद्रिकळा मग न म्हणति काय? 'या; बसा; जेवा' ॥२७॥
कीं एक मीच उरलों पापी, हें बीज ठेविलें जतन; ।
वतन स्वकीय मज कां करितें त्वन्नाम मंगलायतन? ॥२८॥
कीं कार्यबहुत्वें तुज फावेना यावया जगत्पाळा! ।
तरि रूप घ्या दुजें; ती विद्या कंठीं वसे जशी माळा. ॥२९॥
कीं मागें गुप्त उभा असशि, प्रेमें उभारुनी बाहे;
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी बा! हे? ॥३०॥

  

# टीपा

## १. यमुनावर्णन

( वच्छहरण–दामोदरपंडित )

दामोदरपंडिताच्या ' वच्छहरण ' नामक काव्यांतील हा उतारा आहे. ' पंडित ' हे नागदेवाचार्यांचे एक प्रमुख शिष्य होते. या ग्रंथाव्यतिरिक्त त्यांच्या नांवावर पदें, अष्टकें, धुवें, चौपया, आणि ओव्या आढळतात. ग्रंथाचा रचना–काल शके १२०० आहे. मत्सरामुळें श्रीकृष्णाच्यीं गाईवासरें ब्रह्मदेवानें हरण केलीं. परंतु श्रीकृष्णाच्या अगाध लीलेनें ' देव आपणचि झाले वत्सगोपाळ. ' ब्रह्मदेवाचा एक क्षण संपला, एक वर्ष गेलें, पाहतात तों सर्व यथापूर्व आहे ! त्यानें श्रीकृष्णाची क्षमा मागितली. हा कथाभाग या ग्रंथात आहे. उताऱ्यांतील यमुनावर्णन आरंभींच आहे. त्यांत दामोदर-पंडिताची निसर्गवर्णनाची सोपी, रसाळ वर्णनशैली, त्याच्या तात्त्विक उपमा, उत्प्रेक्षा हे विशेष दिसून येतात.

२ आळंगितां–शरण गेले असतां. ३ तरंगिणी–नदी. ४ पढियासले–वाटले. ५ मीनिली–मिळाली. ७ भोगावती–पाताळगंगा. १० किळ–तेज:-किरण रत्नकूट–मेरुपर्वत. मोवाळ–मऊ. ११ टीकल्ग–रत्नजडित अलंकार. आंगाथिले–घातले. सतांग लेणें–पुरुषांचे सतांग व स्त्रियांचे द्वादशांग अलंकार. १४ ढोंक–गिधाडासारखा पक्षी. १८ वेधु संचरताती–त्याचे वेध लागले आहेत. परेशु–श्रीकृष्ण परमात्मा १९ हातिरुवें–हत्ती. पाखवा–पंखाखालीं. फणिकु–नाग. २० मूखकु–उंदीर. पालखती–मांडीवर. पानिअेडा–पाणवठा. २१ पाळांति–पाहतात. २५ अघमर्पण–प्रार्थना. ३० साउमीली–पुढील. भणेमुनी केशवराजु–केशवराज सूरि हे दामोदर पंडिताचे गुरुबंधु; विशेष लोभाचे म्हणून आपल्या नांवाऐवजीं त्यांचें नांव घालून त्यांचा गौरव केला आहे.

## २. अस्तमान समय

( रुक्मिणीस्वयंवर–नरेंद्र )

नरेंद्र रामदेवराव जाधवाच्या दरबारांत कवि होता. रामदेवराव नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवरावर इतका खूप झाला कीं त्याचें कर्तृत्व मिळविण्यास अमूप द्रव्य कवीस देण्यास तयार झाला. नरेंद्रानें तें साफ नाकारलें. तेव्हां त्यानें तें काव्य संग्रहीं ठेवण्यास्तव मागितलें. नरेंद्रास तें देणें मान्य करणें भाग पडलें. परंतु रातोरात ९०० ओव्यांची नक्कल करून घेऊन दुसरे दिवशीं सकाळीं घरीं आलेल्या राजदूतांस त्याने ग्रंथ सविषाद चित्तानें दिला. १८०० ओव्यांपैकीं या नकललेल्या ९०० ओव्यांचें रुक्मिणीस्वयंवर महानुभाव पंथांतील सर्वश्रेष्ठ साती ग्रंथांत मोडतें. प्रा. कोलते यांच्या मतें या ग्रंथाचा लेखन शक १२१४ आहे. काव्याचा थाट महाकाव्याचा आहे. नरेंद्राची कल्पनाशक्ति व निसर्ग-वर्णनपद्धति यांचें स्वरूप उताऱ्यांत दिसेल.

पूर्वसूत्रः–भीमक राजास रुक्मिणीच्या विवाहाची काळजी लागली. भाटा-जवळ पृच्छा केली असतां त्यानें श्रीकृष्ण हा वर सुचविला, परन्तु रुक्मीस हें नापसंत होतें. त्याच्या भिडेस्तव भीमकानें शिशुपालास वर निश्चित केले. पण यामुळे रुक्मिणीची विरहव्यथा बळावली. उपचार सुरू झाले. अशा स्थितीत दिवस जात असता उचितचंद्रिका नांवाची सेविका संध्याकाळ झाल्याचें सांगते.

२ उपेणें–विश्रांति-स्थान. वोपणें–अर्पणें. पवळेयाचां–पोवळ्याच्या. मढीं–घरीं. ३ मुडा–सांठा, निधान. आर्घिला–अर्घ्य देऊन पूजा केली. ४ गिवसू–शोध. सारसित्रा–सारस पाक्षिणीचा. ५ बोरे–लाल खडा. द्वितीयार्धः नीलवर्ण पाचूची उत्पत्ति गरुडाच्या वमनापासून अशी समजूत. ६ माजिरें–उन्मादक भावार्थ. सागौर–गगनांतील एक श्याम पक्षी. ७ धुपाडी–धूर. ठौळ–समूह अथवा खिल्लार. कांतिलोह–काळें लोखंड. ८ असामितें–त्वेषानें. १० अविसाळें–घरटीं. ११ उधाति– दरवळतात. राजाविदी–राजमार्ग. मांदी–गर्दी. पेठेफुल–सांतेचा–फुलांच्या बाजारपेठेंत. १३ पेखनेकार–नर्तक. १४ उगाणा–ऐश्वर्य. खागे-स्थान. १५ मेहलनी–रात्र.

## ३. नारदाचें निवेदन

( शिशुपालवल–भास्करभट्ट )

हा आणि पुढील उतारा भास्करभट्ट बोरीकर यांच्या ‘ शिशुपालवध ’ या ग्रथांतून घेतला आहे. ‘ शिशुपालवध ’ हा काव्यग्रंथ महानुभावांच्या साती ग्रंथांपैकी एक आहे. नांव ‘ शिशुपालवध ’ असलें तरी प्राधान्यानें ग्रंथांतील रस शृंगारच आहे. भास्करभट्टानें हा ग्रंथ शके १२३० मध्यें लिहिला असावा असें प्रा. कोलते यांचे मत आहे. पूर्वसूत्र असे आहे:— श्रीकृष्ण आपल्या सुधर्मासभेंत सपरिवार एकदां बसले असतां नारदमुनि तेथें आले. श्रीकृष्णास त्यामुळें फार संतोष झाला. श्रीकृष्णाच्या भापणानें नारदमुनि गहिंवरले व श्रीकृष्णस्तुति करूं लागले. यानंतर तेथेंच असलेल्या उद्धवानें नारदाची थट्टा करण्यास सुरुवात केली व म्हटलें, “ देवांनी तुमचीच आठवण केली होती. श्रीकृष्णास वाटलें कीं आजकाल कुठे नारद आले नाहींत. तेव्हा लावालाव्या बंद झाल्या कीं काय ? ” नंतर नारदानें उत्तर केलें तें उताऱ्यांत दिल्याप्रमाणें. या उताऱ्यांत भास्करकवीचा विनोद कशा प्रकारचा आहे ते समजेल. भास्कराचे उद्धवगीता, नगविलापस्तोत्र, चाळिसाख्यस्तोत्र, आणि संस्कृत पूजावसर असे इतर ग्रथ आहेत.

१ गोसावी–स्वामी, श्रीकृष्ण. एतखे ॲं–येतांक्षणींच. २ सापें–सांप्रत. एउतें–इकडे. लावकैआ–चहाडी, लावालावी. आगतीचिना–उत्पन्न होत नाहींत. ३ तेहीं–त्यांनीं. सांडिले–सोडलें पदस्थपणा–गभीरता, भारदस्तपणा. ४ बीजे केलें–गमन केले. ५ निर्‍हां–केवळ. राडिकें–विनोदवचन. कळी–भांडण. कामठा–कर्मस्थान. अर्थः देशकालपरिस्थितीने लावालावीचें कार्यालय लाभदायक होत नाहीं ? कीं तंट्याच्या अभावीं अरुचि–बाधा झाली आहे ? ६ खाजें–खाद्य. ७ झोंट धरणी झडाडा–शेंड्या उपटण्याचा धंदा. ११ धुस गेलें–धस्स झालें. १२ तंवकें–रागानें, तंवकें–तेव्हां काय ( म्हणे ) १७ टाटाॲंनि–करकचून. १८ विवसी–खंती, किळस. वारानशी–बनारस, काशी. दीॲंनी–दिनापासून. २० फुन–पुन्हा. नावेकु–क्षणैक, खरोखर. रांकडू–गरीब, निकृष्ट, नीरस. पाडू–बरोबरी. २१ लिपिजे इ० या लावालावीची गोडी सुटत नाहीं; नाहींतर श्रीकृष्णचरणांस अंतरून लावालाव्या करून

पापलिप्त होणें हें खरोखर काय चांगलें आहे? २२ उटरेटें–उठाठेव, लावालावी. वटें–वाटे. २३ मणिकर्णिका–काशीक्षेत्रींचें तीर्थस्थान. २६ मैत्रावरुण–काशीक्षेत्रींचें तीर्थस्थान. भगवंतु–ऐश्वर्यशाली, ( ऋषि, तपस्वी ) ब्राह्मण. २७ साव्रडा–भोळा. कें–कुठें. २८ ऽन्दुण–घडी. ३२ भणौनु–म्हणून. ३३ लोथां–उन्मत्त धूडांनीं.

## ४. विरही रुक्मिणी

( शिशुपालवध–भास्करभट्ट )

पूर्वसूत्रः—श्रीकृष्ण सुधर्मासभेंत बसले असतां नारदमुनि त्यांस भेटण्यास आले व त्यांनीं शिशुपालाचा वध करण्याविषयीं विनंति केली. दुसरे दिवशीं युधिष्ठिराकडून निरोप आला कीं राजसूय यज्ञार्थ बोलावणें आहे. त्यामुळें बुचकळयांत पडलेल्या श्रीकृष्णानें या दोहींपैकीं यज्ञार्थ जावें असेंच ठरवलें. कारण अग्रपूजेच्या मानाच्या वेळीं तंटा होईल व शिशुपालाचा समाचार घेतां येईल असा श्रीकृष्णाने सुज्ञपणें विचार केला. राजसूय यज्ञासाठीं श्रीकृष्ण गेल्यावर त्याच्या सोळा हजार स्त्रियांस विरहानें व्याकुळ केलें. त्यांत रुक्मिणीची अवस्था अत्यंत विकल झाली. या ग्रंथांतील कवीची वर्णनशैली चित्तवेधक विविधरसपरिपूर्ण असून त्याचे शब्द समयोचित, रसानुकूल व सहृदयांस आल्हाद देणारे आहेत. तो जागोजाग सुंदर कल्पनांचीं मंदिरें तर उभारतोच पण त्यामध्येंहि शब्दालंकारांची व अर्थालंकारांची मनोहर आरासहि करतो.

१ विरिणी–वैरिणी. २ दिसाळपण–ढिलाई. ३ काळें पाखिरू–कोकिळा. विरू–वैर. ४ सूती–देतात. ५ आहान–ताप, तडाखा. ६ मारें घातिलें–मदनानें घात केला. मालतिआं सांघितलें–मालतीनें ( फुलझाड ) सांगितलें. सांवरेआ आंतु–कुंजांत. ७ थोरकांडी–जबर बाणांनीं. ११ निनिली–झोपली. खिरडणें–खुरडत चालणें. १२ ऽदरुं–वास, घाम. उधावतु–वाढत. १४वीजनें–पंखा. १५ पांचवनें–दृष्ट होणें. १६निःपरवसा–धटिंगण. उघाइली–उघडली. पुसा–पोपट. कोप–रागें भर. १७ माधवी–लता. कुडी–खोटी. दिहींदिहूं ओसावली–दिवसेंदिवस अशक्त झाली. १८ सकडतरू–कांटेरी झाड. तोंडी हे तोंवरू–तोमर. १९ ऽभावी–नाहींसें कर. विसारी–दूर लोट.

## ५. ऋद्धिपुर माहात्म्य

### ( ऋद्धिपुरवर्णन–नारो व्यास बहाळिये )

'ऋद्धिपुरवर्णन' या ग्रंथांतील हा उतारा असून ऋद्धिपुर हें महानुभावी-यांना अत्यंत पवित्र असणारें एक क्षेत्र आहे. त्याचें वर्णन या ग्रंथांत नारो-व्यास बहाळिये यांनीं केलें आहे. हा ग्रंथहि महानुभावांच्या प्रसिद्ध साती ग्रंथांतला एक आहे. या क्षेत्री गोविंदप्रभूंच्या लीला व अवतारकार्य झालें, येथेंच श्रीचक्रधरस्वामी व गोविंदप्रभु यांची भेट झाली, चक्रधरास उपदेश झाला आणि महानुभाव पंथाची स्थापना पण येथेंच झाली. अशा रीतीनें महानुभावांच्या धर्मांत या क्षेत्राचें महत्त्व आहे.

परेशास नमन करून परावाचेचें व ईशकृपेचें महत्त्व कवि वर्णन करतो. यानंतर श्रीनागांबिका व श्रीनागदेवाचार्य या पंथांतील श्रेष्ठ व्यक्तींना नमन करून व त्यांचें माहात्म्य सांगून आपल्या 'परमार्गाचे' मोक्षदायक विशेष त्यानें वर्णिले आहेत. आपण संसारतापानें तापलो असतां हे ऋद्धिपुर पाहताच संसारश्रमाचें विसर्जन झाल्याचें तो सांगतो व या पुराचें महत्त्व वर्णन करतो. हा ग्रंथ नारो व्यास यांनीं शके १२८५ मध्यें लिहिला. त्यांचें 'वछ्य' नांवाचें एक खंडकाव्य उपलब्ध आहे. प्रस्तुत काव्यांत भक्ति, कारुण्य, उदात्तता व शांति हे भाव उत्कटतेनें आढळून येतात.

२ मोळिकार–मोळीविक्या. बावनें–सोनें. दुर्भक्षीं–दुष्काळांत. ३ आडुळे–आढळावी. अनार्यांतें–अनाचारी माणसास. निःकंचना–अकिंचनास. टाकों-निए–प्राप्त व्हावी. ६ जगदेकनायक–श्रीकृष्णावतार. ८ उत्तरवेठ–उतारपेठ. ओळगवट–सेवकवर्ग. संसृतीसि वज्रलेप–संसाराला दृढलेप. ९ पाळेगण–समूह. बोहरी–हांकून देणें. १४ दोनि लक्षाचे नि अंतर, इ० दोन्ही डोळ्यांचा ताप दुरूनच चंद्राच्या किरणांनीं नाहीसा होतो.

## ६. अभ्यासयोग

### ( परमामृत–मुकुंदराज )

हा उतारा मुकुंदराजांच्या 'परमामृतां'तील आहे. 'विवेकसिंधु' नांवाच्या त्यांच्या सुप्रसिद्ध ग्रंथाच्या अखेरीस शके १११० असा ग्रंथकाल

दिला आहे. हाच स्थूल मानानें मुकुंदराजाचा काळ मानण्यांत येतो. मुकुंदराजाच्या स्थलकालाचा विषय अजून वादग्रस्त आहे. परमामृतांत १४ प्रकरणें असून ग्रंथविस्तार ३२३ ओंव्यांचा आहे. प्रस्तुत उतारा नववें प्रकरण असून तत्पूर्वी मंगलाचरण, अन्यमतखंडन, महावाक्य–विवरण, स्थूलदेहनिरसन, लिंगदेहनिरसन, कारणदेहनिरसन, महाकारणदेहनिरसन व शून्यखंडन असे विषय आले आहेत. या उताऱ्यात मन विषयांवरून काढून घेऊन अंतरात्म्यांत विलीन करण्याविषयींचें विवेचन आहे.

२ प्रत्यगावृत्ती–परत फिरणें. ८ तरी तो इ०–विवेकानें संकल्पविकल्पहीन चित्त केल्यावर कुठलाहि विषय स्थिर होतो. ९ पाहिजे–पाहावें. १० निरालंबीं स्फुरे–आकाशांत स्फुरण पावतें. १५ देखणेंचि देखण्यावरी इ० दृश्यावरून द्रष्टा परतल्यावर दृश्य राहात नाहीं.

## ७. ग्रंथपरिहार

( अमृतानुभव–ज्ञानेश्वर )

ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवाचें हें दहावें प्रकरण. ज्ञानेश्वरांचे ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी व अभंगांची गाथा हे ग्रंथ सर्वमान्य आहेत. अमृतानुभवांत अद्वैताचा स्वानुभव आपल्या रसाळ पद्धतीनें ज्ञानेश्वरांनीं सांगितला असून या प्रकरणी हा अद्वयानंदाचा अनुभव सर्वांनीं घ्यावा हें प्रतिपादन केलें आहे.

१ हातातळीं–तळहात मस्तकावर आशीर्वादार्थ ठेवून. २ महेशें–परमेश्वरानें. सुती–सूत्र. ३ मेघाचि भागु–मेघाच्याच पुरतें. ४ दिवा–दिवसा. सुखाडु–सुख, आनंद. पवाडु–मोठेपणा. ५ अगाधें–समुद्र. झाडांचे दानीं–झाडें पुष्पफळाचे दान करण्यास समर्थ होतात. ६ असंवर्य–अफाट. दैविकीचें–दैवी संपत्तीचें. वांचोनि–यावांचून. ७ परिहारु–ग्रंथसमाप्तीचे चार शब्द. प्रभुप्रभाव विन्यासा आड ठावूनी–सद्‌गुरूच्या–सामर्थ्यास उणेपणा आणून. ९ विपायें–कदाचित. १० अर्थ–एका दृष्टीनें द्रष्टाच दृश्यें बनतो तर दुसऱ्या तऱ्हेनें केवळ तोच असून दुसरें कांहींच नाहीं. 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति।' ११ संविद्रहस्य–ज्ञानाचें रहस्य. तया आधींहि–ग्रंथांतील प्रतिपादनापूर्वीहि. १२ अर्थ–मग ग्रंथाची जरूर काय असें म्हणाल तर स्वसुखार्थच जें सिद्ध

आहे त्याचा मी अनुवाद करीत आहे. १३ पाढियंते—आवडती वस्तु. १४ आपमया—आपोआप, सहज. १५ वेटलें—प्राप्त झाले. भेव—सर्वत्र. १६ आपणपें—आपणाला. ओपें—अर्पणें, देणें, विकणें. १७ पाणियावरी मकरी—पाण्यावर माशाचें चित्र काढावे त्याप्रमाणे. २० वेल्हाळ—चांगली. निखळ—शुद्ध स्वरूप. अमृताही—मुक्तिरूप अमृतासहि. अमृतें—अनुभवामृत. २१ हें कां इ०—लोकदृष्टीनें पुनवेचा चांद विशेष असेल पण सूर्यदृष्टि अशा मला तो काय होय? २२ सावायिली—समागम झाला असतां. २३ गगनाचिया डाळा—गगनचुंबी. पेल्ती—डोलतात. २४ परगुणें—पक्वान्नाची मेजवानी. २७ वानियाच्या—हलके, भारी अशा प्रकारच्या. परिसाच्या कसोटीच्या स्पर्शानें हीणहि शुद्ध सोनेंच होतें. २८ अक्षरा, इ०—ग्रंथाच्या गाभाऱ्यांत शिरतात, ग्रंथार्थाचें आकलन करतात. २९ आकारादि अक्षरा—ॐकारास. मात्रा—वर्ण. ३० अंगुळी नव्हेचि दुसरी इ०—एकमेवाद्वितीयम्; दुसरी करंगळी दुमडावी लागत नाही. ३१ सणु भोगिजे इ०—विश्वानें या आनंदाचा उपभोग घ्यावा.

## ८. स्वानुभव–खाजें

(चांगदेव–पांसष्टी–ज्ञानेश्वर.)

अनुभवानें थोर व वयानें लहान असणाऱ्या ज्ञानेश्वरांस पत्र लिहिताना मायन्याची सुरुवात कशी करावी हा चांगदेवांस प्रश्न पडला व त्यांनी कोरें लिखित पाठविलें. त्या निमित्तानें ६५ ओव्यांचें उत्तर त्यास ज्ञानेशांनी दिलें. हा त्यांतील कांहीं भाग आहे. त्याचा मथितार्थ मी–तूं या उपाधीनेंच आपण वेगळे आहोंत, वास्तविक आत्मस्वरूप सर्वत्र समानच आहे असा आहे. या ग्रंथाचा रचनाकाळ शके १२१६ मानतात.

१ अवजतन—व्यवहार होत नाहीं. रूपा—आत्मरूपास. २ उमसू—उत्पत्ति. ४ थावो—खोली. मा काय घेवों माप जळा—मग जळाची खोली मापणार कोण? ६ जो जागोनि इ०—तुझ्याकडे वेगळेपणानें पाहतांच येत नाहीं, जसें. जागेपणीं निद्रा कशी येते हें पाहणें जमत नाहीं कारण तेथें अद्वैत आहे. ८ उखते पडे ग्रासीं, भेटीचि उरे—मी—पण तूं—पणास सर्वच ग्रासून टाकतें व ऐक्यच उरतें. १३ मेळियेचि—एकत्वाची. १७ आपणपें—आत्मत्व. स्वानंद जीवनपें—आत्मानंदाच्या अनुभवानें. १८ वेद्यवेदकत्वही

ऽ० ज्ञाता-ज्ञेयाच्या पलीकडे. २२ नाहीं वाटतें तें आहे, तेंच दिसतें, पण सामान्य जनांस तें दिसत नाहीं हें आश्चर्य आहे. २३ देहातीत निर्विकार निद्रा व देहातीत आत्मरूप जागृति यांचें ऐक्य जाण.

## ९. श्रोत्यांस विनवणी

( ज्ञानेश्वरी-ज्ञानेश्वर )

ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाच्या सुरवातीच्या भागांत ज्ञानेश्वर श्रोत्यांना आपल्या व्याख्यानाकडे अवधान देण्याची त्यांना गौरवून नम्रतेनें विनंति करीत आहेत. ज्ञानेश्वरांचा विनय, त्यांची अपार व अमोल दृष्टान्त-संपत्ति, भावनेची गोडी व विचारपरिप्लुत अर्थ म्हणजे तत्त्वज्ञान ही अंतःकरणांत केव्हां प्रविष्ट झालीं तें कळत नाहीं, अशी अरूपास रूप देण्याची ज्ञानदेवांची हातोटी आहे. ज्ञानेश्वरी शके १२१२ त लिहिली गेली.

३ मनोरे-मनोरथ असाहि पाठ आहे. ४ ओले-' ओले ' असा पाठ = ओलाव्यानें. मांसिनले-भरास आले. ६ वांकुडां-विचुकीं-वेड्यावाकड्या. ७ पढियो-प्रेम. अलुकी-उत्कंठा. ९ खुंघुरु-काजवा. बोगरू-वाढावी. १० केही-कधीं. ११ तुरुंगावें-हुंगावें. पवाडु-मोठेपणा, विस्तार. १३ गभस्ती-सूर्य. हाथिवेनि-काडवातीनें. चूलोदक-चूळभर पाण्यानें. १४ गंगापती-निगडीचा पाला ( बेलाच्या अभावी ) १६ चावटे-बाळलीला. बालमती-बाळाप्रमाणें. १७ बोहें-बहुत प्रकारें. १९ चेइलें-जागे झालें. ण्यालागिं-म्हणून. २० यऱ्हविं-एरवीं. चेंपणी-दडपण घालून, आटींत ठेवून. वारे या घापत ऽ०-वाऱ्याला वळण लावतां येते का ? २१ बोंशिजावे-पातळ करणें. माथुला-रवी. वाखाणु-वर्णन, व्याख्यान. २२ पाडु-सामर्थ्य. २३ धिंवसा-धैर्य. धीटिव-धीटपणा. २४ चंद्रापासौनि-चंद्रापेक्षां. जिवविते-जीवन देणारें. कीजो-करावें. २५ दीठिवा-दृष्टि. कोंभैला-अंकुर फुटलेला. २६ चारा-पोषण. दोंदे पेलति-शब्दाचीं प्रमेयार्थानें पोटें फुगतात. २८ सुवाऊ्लें-अनुकूल वारा वाहील. सारस्वतेंऊ्लें-सारस्वत-मेघाचा ओलावा येतो. दुचिता-दुश्चित्त. २९ कीरु-निश्चयेंकरून. ३० माइखेडे-लाकडाच्या बाहुल्या. ३१ बाउलेयांचां-बाहुल्यांच्या. ३२ सांघें-सांग.

## १०. स्त्रिया, वैश्य व शूद्र

(ज्ञानेश्वरी-ज्ञानेश्वर)

ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायांतील "स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्' या गीतेंतील ९ व्या अध्यायांतील ३२ व्या श्लोकाच्या उत्तरार्धावरील हें व्याख्यान आहे. भागवतधर्माचा हा गाभा असल्यानें त्यावर ज्ञानेश्वरांनीं विशेष जोर दिला आहे. यांत त्यांची पोट तिडीक व सामाजिक अनुभव असला पाहिजे असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं.

१ सावजें–नक्रानें. हातिरु–गजेंद्र. २ ओखटी–वाईट. ६ विषो–विषय. ७ परीं प्रकारें. ८ होतु कां–असोत. श्रुताधीत–विद्वान्. मासिं तूंकितां इ०–माझ्याबरोबर तोलल्यास कमी भरणार नाहींत. ९ आथिलेपणें–संपन्नतेनें. लेणें–अवतार. ११ साचोकारें खरोखर. सरे–परिपूर्ति होते. १२ आथि–असलेल्या. १३ लाहे–लाभे. १६ मलतेणें भावें–भक्तीच्या अतिशयानें. १८ विवंचना–भेद. नेघपती येकावटें इ०–अग्नींत एकत्र पडत नाहींत तोंवर. २० बिंदुलें–शून्य. मीनले–मिळाले. २२ आपैसें–आपोआप. २४ वालभ–प्रेम. व्याज–निमित्त. व्रजांगनाचि नीजे–स्वकीय गोपी. २५ भियाचोनि मीसें–भीतीच्या मिषानें. चैद्य–शिशुपाल. २७ ध्रुव–उत्तानपाद राजाचा मुलगा, भक्तीनें अढळ पद मिळविणारा. नारद–प्रजापतीचा पुत्र, सुप्रसिद्ध मुनि व भक्त. अक्रूर–यास कृष्ण व बलराम यांस घेऊन येण्यास कंसानें पाठविलें होतें. शुक-व्यासपुत्र, नैष्ठिक ब्रह्मचारी. सनत्कुमार–ब्रह्मदेवाचा मानसपुत्र. हान–पादपूरणार्थक शब्द. २९ एकुलाणिचें खागें–अखेरचें स्थान. ३० केणि–प्रकार, वस्तु. 'वाणी' अशा पाठ घेतल्यास 'वाण' असा अर्थ. ३२ निरुतें–पूर्ण.

## ११. गीतामाहात्म्य

(ज्ञानेश्वरी)

हा उतारा ज्ञानेश्वरीच्या १८ व्या अध्यायांतून घेतला आहे. त्यांत गीतेची थोरवी गायिली आहे. गीतेस उद्देशून त्या ग्रंथावर नाना प्रकारच्या मंगल, दिव्य, भव्य, उदात्त उपमा, रूपकें व उत्प्रेक्षा करून त्यांचा पाऊस पाडला आहे. त्यांच्यामुळें वाचक स्तिमित होऊन त्यांचा जीव आनंदानें गुदमरून जातो.

१ सें सात—७००. २ ओडविले—लावले, उभे केले. प्रतिभे ऐसे एंती—मला वाटतें. ३ सप्तशती—जगदंबेचे स्तवन करणारा ग्रंथ. ५ सावाइकें—मदतनीस. ७ कल्हार—कमल. श्रीकृष्णास्यसरोवर—कृष्णमुखरूपी सरोवर. ९ आवरां—आचार. सौंदरा—सुंदर. सर्वागम—वेद. १० आत्मा हा कांत, गीता ही कांता, श्लोक हे बाहू. १२ गीता—गंगा, श्लोक—तीर्थे, अर्जुन—सिंहस्थपर्वणी. १५ गोठि—गोष्ट, संवाद. १६ बोरमें—प्रेमानें. तेव्हलिं—ते वेळीं. १७ अफाट वाऱ्यांत पंख्याच्या साहाय्यानें सोसवेल एवढा वारा शहाणा मनुष्य अगावर येऊं देतो. १८ सामविलें—ग्रहण करण्याजोगें केलें. २० नैयंता—न येतां. फुलें नव्हतां घेपतां आमोद केविं—फुलें नसतीं तर सुवास कुठून मिळता ? २८ उन्मेप—बुद्धि. साशंक राहाटती—जपून पाऊल टाकते (बुद्धि). (राहाटणें—क्रिया, व्यापार करणें). वाचालें—बडबड. २९ ले—धारण करतो. ३० गजघंटा—हत्तींच्या रांगा. मुरकुटां—घुंगुरटें. ३२ कुंटेपणें—बांकडेपणानें. ३३ घेपे—घेतां येतें. ३४ आणी कीं ना—आणतेच कीं नाहीं. ३५ पैस—विस्तार. थिलर—डबकें. ३६ निमलेंचि—असिद्ध आहे, लय पावतें. कीर—निश्चयानें. ३७ मंदराकारें—मंदरपर्वताएवढीं. सफर—छोटा मासा. ३८ नेदखे—न देखे. ४० न पवों काइ—प्राप्त होत नाहीं का ?

## १२. मराठी गीता

(ज्ञानेश्वरी)

हा व यापुढील उताराहि १८ व्या अध्यायांतीलच आहे. यांत ज्ञानेशांनीं संस्कृत विरुद्ध मराठी या वादांत मराठीची वकिली केली आहे. येथें नम्रता, स्वाभिमान व स्वसामर्थ्याची जाणीव काव्यात्मतेनें व्यक्त झाली आहे. अध्यात्मविषयाच्या ग्रंथांत अध्यात्माला प्राधान्य आहे, त्याच्या भाषादि माध्यमाला नाहीं असा सिद्धान्त ठामपणें सांगून काव्यानंदाच्या भुकेल्यांना ते सांगतात कीं हवा असल्यास तोहि तुम्हांस ज्ञानेश्वरींत मिळेल.

१ आइती—संस्कृत निरपेक्षतेनें. भंगीं—पद्धतीनें. २ एकावद—एकवट. एकलव्यानें द्रोणाचार्यांचा मृत्तिकेचा पुतळा करून या गुरूच्याकडून धनुर्वेदाध्ययन केलें. त्याचा उल्लेख. ३ सूर्य प्रकाशेना तेव्हां वसिष्ठ ऋषींनीं आपली छाटी काठीवर लावून जगाला प्रकाश दिला असा संदर्भ. अशा तऱ्हेनें

छाटीनें सूर्याशीं स्पर्धा (भांडण) केली. वेधिलीं—सहवासांत राहिलीं. ४ चित्ताथिला—तन्मय. दादुला—समर्थ. ६ नीच—नित्य. प्रबंध—ग्रंथ. ७ विखो—विषय. ८ पांगें—आवडीनें. गीतांगें—गाइलें असतां. एकावट—पूर्ण. १२ वाटोलिं—टपोर. मोगरिं—मोगऱ्याचीं फुलें. १३ लोभाचां बंधु ओवी केली मियां—प्रेमळ ग्रंथ मी ओवीरूपानें केला आहे. १५ पारुखणें—परकेपणा येणें. १६ आइकिलेयां इ०—व्याख्यान ऐकल्यावर गोडी लागणार नाहीं का ? १७ पाकु करिति व्याजें इ०—गीतापाकाला पांडित्याचा वेष प्राप्त होऊन अमृताकडेहि कानाडोळा होईल. १८ जींतलें—जिंकलें. १९ मेल—टोंक. २० आंगवगें—स्वसामर्थ्यानें. सिहाणें—मुखी.

## १३. पसायदान

(ज्ञानेश्वरी)

ज्ञानेश्वरी—ग्रंथ पूर्ण झाल्यावर ईश्वराजवळ ज्ञानदेव प्रसादयाचना करतात. ' पसायदानां 'त ज्ञानेश्वरांची सर्वात्मैक्याची व मानव्याची भावना उत्कटपणें दृष्टोत्पत्तीस येते.

१ तोखोनि—संतोषून. पसायदान—प्रसाददान, वरदान. २ वाकुडें—वांकडेपणा. मैत्र—मैत्री, प्रेम. ३ पाहो—पहांट होवो. ४ मांदियली—गर्दी. अनव्रत—अनवरत, सतत. ५ आरव—बाग. ६ आलछन—लांछनावांचून. तपहीन—शीतल. ८ दृष्टादृष्ट—ऐहिक व पारलौकिक. ९ दाओ पसाऊ—पारितोषिक, वरदान.

## १४. स्वधर्म

(एकनाथी भागवत)

एकनाथी भागवत म्हणजे श्रीमद्भागवताच्या एकादश-स्कंधाची टीका. तींतील १८ व्या अध्यायांतील स्वधर्मावरील हें नाथांचें व्याख्यान आहे. या उताऱ्यांत तत्कालीन ब्राह्मणांच्या आचारभ्रष्टतेचें प्रतिबिंब, निष्काम-कर्माचा उपदेश व मार्मिक दृष्टान्त-पद्धति हे विशेष दिसून येतील. नाथांनीं आपल्या या भागवतटीकेचा काल शके १४९५ असा दिला आहे. ज्ञानेश्वरीप्रमाणेंच एकनाथी भागवत हा ग्रंथ वारकरी संप्रदायाचा प्रधान ग्रंथ आहे. नाथ-

वाङ्मय विविध व विपुल असून भागवताशिवाय त्यांचीं भावार्थरामायण, रुक्मिणीस्वयंवर, ८।१० आध्यात्मिक प्रकरणें, संत-चरित्रें, भारुडें, आख्यानक, काव्यें, पदें, अभंग अशी रचना आहे.

३ भद्रजाति–हत्ती. ४ कोरान्न–धान्य. ५ हेळसूनू–अवहेलना करून. नागवणू–हानि. ८ बरळ–बडबड. १० रोचना–गोडीसाठीं. १२ वेचूनि–खर्चून. १६ फळाभिलाख–फलेच्छा. १७ ताम्रपर्णी–मानारच्या आखातास, मिळणारी नदी. १८ अमरावतीचे चाडे–स्वर्गाच्या इच्छेनें.

## १५. एकादशस्कंधमाहात्म्य

( एकनाथी भागवत )

ग्रंथसमाप्तीचे वेळीं एकतिसाव्या अध्यायाच्या अखेरीस नाथांनीं एकादशस्कंधाचें माहात्म्य वर्णिलें आहे. येथें त्यांची रसाळ वाणी, रसिकांस डोलावयास लावणाऱ्या चमत्कृतिपूर्ण व हृद्य रूपकांचा ललितरम्य विलास, भक्तांचें भावोत्कट अंतःकरण व लीनता प्रकट झाली आहे.

१ मिरासी–वतन. २ निडारे–भरपूर पीक येणें. ३ सोंकारा–राखणदार. पागोरा–दोरीनें ( गोफणीनें ) ४ संवगण–कापणी. ५ पडिपाडीं–युक्तीनें, प्रतिपादनानें. परवडी–तऱ्हा. चोखडी–चांगली. ७ त्यक्तोदक–संकल्पोत्तर. ८ पक्षेंसी–पंखांनीं. १२ पोसणें–आश्रित. भाणें–भांडें. १९ गजेंद्र–अगस्तिशापित इंद्रद्युम्न राजा हा हत्तीच्या जन्मास आला. त्याला नक्रानें धरलें असतां विष्णूचा धांवा करून त्यानें मोक्ष मिळविला. २० हिरण्यकशिपू–भक्त प्रल्हादाचा पिता. नरसिंहानें त्याचें पोट फाडून त्यास मारलें. २३ कपिलाषष्ठी–६० वर्षांनीं येणारी पर्वणी. २९ परमहंस–संन्याशांचा एक वर्ग. ३१ आनिर्वाच्य–अवर्णनीय. ३५ अर्थविलें–अर्थ स्पष्ट कराविला. ३८ शेखीं–शेवटीं.

## १६ व १७. गुरुलक्षण व बंधमोक्ष

( ग्रंथराज–दासोपंत )

दासोपंत नाथ-पंचकांतील प्रमुख कवि. त्यांची रचना अफाट आहे. त्यांनीं ४६ ग्रंथ लिहिले. त्यांत गीतार्णव ही सवा लाख ओव्यांची गीताटीका, गीताभाष्य, पंचीकरण, अनेक स्तोत्रें, पदार्णव, संस्कृतमध्यें उपनिषद्भाष्यें,

हे प्रमुख ग्रंथ आहेत. त्यांची व्याख्यान-पद्धति सहज, सुबोध व चटकदार असून त्यांजवळ विद्वत्ता आहे खरी, पण ती बोजड नाहीं. त्यांच्या 'ग्रंथराजां-' तून हा उतारा घेतला आहे. 'बंधमोक्ष' हा उताराहि त्यांतीलच आहे. हे भाग अनुक्रमें १ ल्या व २ ऱ्या प्रकरणांतील असून तात्त्विक विषय विशद करण्याची त्यांची गंभीर, आटोपशीर व प्रौढशैली दर्शवितात. रामदासांचा ग्रंथराज 'दासबोध' हा दासोपंतांच्या 'ग्रंथराजाची' त्यावर छाप असल्याचें स्पष्टपणें दर्शवितो.

७ आन आन-वेगवेगळे. १० अडीं-विहिरींत. १२ पादार्थिक-पदार्थाविषयीं.

## १८. जुनाट पुरुषग्रंथ

(रामदास-स्फुटकाव्य)

'जुनाट-पुरुषग्रंथ' हें श्रीरामदासांचें ओवीबद्ध स्फुटकाव्य आहे. श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं प्रसिद्ध केलेल्या श्रीरामदासांच्या काव्याच्या द्वितीय खंडांत अकरा ओवीबद्ध लघुकाव्यांत याचा समावेश करण्यांत आला आहे. हीं सारीं काव्यें वेदान्तपर आहेत. जुनाट-पुरुषग्रंथ या प्रकरणाचा विषय ब्रह्मज्ञान हाच आहे. श्री. देवांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे "सर्व-सत्ताधारी चालक, सूत्रधार असूनहि ज्याचा एकान्त कधीं मोडला नाहीं, असें जें ब्रह्म, तोच जुनाट पुरुष होय. माया ही त्या पुरुषाची कन्या व काळ हा त्या कन्येचा पुत्र होय." एवढें लक्षांत ठेवलें म्हणजे बाकीच्या विवेचनाची संगति लागण्यास अडचण पडणार नाहीं.

६ व्युत्पत्ति-शास्त्रवाङ्मयाशीं परिचय, ज्ञान. ७ आक्षेप-शंका. ७सुचित-स्वस्थ. ८ रेटमकहाणी-भाकडकथा. ९ विज्ञान-अनुभवयुक्त ज्ञान. १० खडूळ-गढूळ. १४ लिगटे-चिकटते. १६ अहं-मीपणा. १६ सोहं- "मी ब्रह्म आहे" ही भावना. १८ भातें-खाद्य २१ अनामी-नामरहित (ईश्व-राचें विशेषण). २४ अचळ-पर्वत. अवलीळा-लीलेनें. २६ लडिवाळ-लाडीक. २८ परवडी-अनेक तऱ्हांनीं. कडाफोडी-आदळआपट. २९ बोहरी-नाश, चुराडा. ३२ निरंजनीं-एकांतांत. ३८ टकळा-ध्यास, छंद. ३९ गोंवीं-गुंत्यांत. ४६ आस-इच्छा. ५० झळंबली-पछाडली. ५२ निःसंगाची-सर्व बंधनापासून मुक्त असलेल्याची. नासली-नाश पावली.

# १९. राजकारण

( रामदास—दासबोध )

' राजकारण ' हें एकच नांव असलेले दोन उतारे श्रीरामदासांच्या दासबोध या ग्रंथांतील अनुक्रमें दशक अकरा समास पांच व दशक एकोणविसावा समास नऊ हे होत. यांचा विषय एकच आहे. नांवहि राजकारणनिरूपण हेंच आहे. दोन्ही समासांच्या शेवटीं ' राजकारणनिरूपणं नाम ' असा त्यांचा उल्लेख केलेला आढळतो. यांतील राजकारण या शब्दाचा अर्थ काय यासंबंधीं विद्वानांत मतभेद आहेत. कै. शंकर कृष्ण देव यांच्या मतें हा शब्द हल्लीं रूढ असलेल्या अर्थानें म्हणजेच राज्यविषयक चळवळी, व्यवहार या अर्थानें रामदासांनीं वापरलेला आहे. या अर्थानें राजकारण करणें हा श्रीरामदासांच्या व त्यांच्या शिष्यांच्या कार्याचा एक भाग आहे असें ते मानतात.

परंतु प्रा. न. र. फाटक यांना हें मान्य नाहीं. " समुदायाची जूट राखण्यासाठीं जें धोरण सांभाळावें लागतें त्याचें विवेचनचातुर्य, राजकारण या नांवाच्या समासांतून आहे " असें ते मानतात. ते म्हणतात, " समर्थांनीं राज्यव्यवस्थेवरून हा शब्द निर्माण केला असेल परंतु तो राज्यसाधनाचा उपाय अशा अनन्य अर्थानें निर्माण केला ही कल्पना तो शब्द ज्या विषयाच्या विवेचनांत आढळतो तिकडे लक्ष दिल्यास टिकणारी नाहीं. पूर्वग्रहाचा आग्रह आवरून हे समास तुलनेनें पाहणाराला राजकारण म्हणजे राज्यकारभाराची नीति की व्यवहारांतील चातुर्याची एक तऱ्हा याचा बोध होऊं शकेल. "

' व्यवहारचातुर्य ' हाच प्रा. फाटकांच्या मतें त्याचा वास्तविक अर्थ आहे.

१

३ अनन्य—अगतिक. समुदाव—समाज. ४ एक—प्रथम मुख्य. ५ साक्षेप—व्यवसाय, उद्योग. ७ संकेतें—योजनेनें. ९ उपाधीस—अडथळ्याला. नीचत्व—नम्रता. ११ तऱ्हें भरोंच नय—नादीं लागूं नये. १२ फड—मंडळीची एकी. १३ दिगंतरासी—दुसऱ्या दिशेला, दुसऱ्या देशाला. १६ तऱ्हे—एककल्लीपणा. २१ हिरवटासि—अविचाऱ्याला. कचरटासि—नीच मनुष्याला. २२ असाधारण—महत्त्वाचें. २३ वृक्षारूढास—भीतीनें झाडावर चढलेल्यास. २४ अभिलाषिना—इच्छित नाही.

२

१ हव्यास–नाद, छंद. २ चाळणा–चालना. ३ झाडाचें–हिशेब चुकता करणें. ४ मिराशी–हक्कदारी. थित्या–जवळ असलेल्या. व्यापकपणाची–उपद्व्यापाची. ६ सलगी–मैत्री. विश्रांतीतें घेता नये–एकेच ठिकाणीं फार दिवस राहूं नये. ७ अंतरहेत–अभिप्राय. ९ भांडारा–खजिन्यांत, कोठारांत. ९ गोवा–गुंता. १२ कळकटपणाची पदवी असों न द्यावी–भांडखोरपणाला जागाच देऊ नये. १३ गिचड्यांत...चमत्कार–चव्हाट्यावर आणलें असतां त्यांत मजा नाहीं. १७ रितें–रिकामें. १८ खल्क–लोक. उगवावे–नेमावे. १९ झटे–हिसके, झोंबी. २० ग्रामण्य वर्मा–ग्रामण्यामध्यें म्हणजे निरनिराळ्या तटांत वर्म पकडावें. २२ तणावा–ताणदोर. २३ समजावे–ओळखावे, जाणावे. २३ आळवावे–हाक मारावी, बोलवावें. २५ गलामांच्या–शत्रूंच्या. कैपक्षी–कैवार घेणारा. २६ बंड–साधुत्वाचें सोंग, थोतांड. पाषांडाचे–नास्तिक मतांचे. वाग्ब–नाश. २७ संभ्रमें–उद्योगानें. २९ हुंब्यासी–धुम्यास, मंदास. टोणप्यास–मूर्खास. लोंदापुढें–लबाडापुढें. ३० धटासी–धष्टपुष्टास. खटनटासी–वाईटासाईटाला. ३१ मजालसी–सभा.

## २०. महंतलक्षण.

(रामदास–दासबोध)

श्रीरामदासांनीं ठिकठिकाणीं मठ स्थापून त्यांवर आपल्या शिष्यांची मठपति म्हणून नेमणूक केली होती. "आधार बहुतांचा" असा मठपति अथवा महंत कसा असावा याविषयीं त्यांच्या अपेक्षा प्रस्तुत उताऱ्यांत व्यक्त झाल्या आहेत. हा उतारा म्हणजे त्यांच्या दासबोध या ग्रंथांतील अकराव्या दशकांतील सहावा समास होय.

१ नेटके–नीट, चांगलें. २ मातृका–अक्षरें. धाटया–प्रकार, वळणें. ५ अर्थांतर-निरनिराळे अर्थ. ६ दीर्घसूचना–पुढील होणाऱ्या गोष्टी. प्रबळे–जोरकस होई. जाण–ज्ञान. ७ महंत–थोर. अंतवंत–नाश पावणारे ८ प्रबंध–ग्रंथरचना. जाड वचनें–मोठमोठीं वचनें. १० उगवी–सोडवी, समजावी. १२ पवाडे–शिरतो. १३ सांकडीमध्यें–अडचणीच्या वेळीं. उपाधीमध्यें–अनेक संबंधांमध्यें. १६ विवरी–विवेचन करतो. १७आपणाकरितां–आपोआप, स्वप्रयत्नानें. सोय धरिती–नीट मार्गाला लागतात. १९ धारणेचा–दृढनिश्चयी.

## २१. उत्तम-पुरुष-निदर्शन

( रामदास-दासबोध )

' उत्तम-पुरुष-निदर्शन ' हा दासबोधांतील बाराव्या दशकांतील दहावा समास आहे. त्यांतील उत्तम पुरुषाचीं लक्षणें सामान्यतः कोणालाहि लागूं पडण्यासारखीं असलीं तरी समाजाचें धार्मिक नेतृत्व करणाऱ्या मठपती-साठींच हा समास लिहिण्यांत आला आहे हें त्यांतील शेवटल्या भागावरून स्पष्ट होतें.

२ तरतें-पोहणाऱ्यानें. ८ पारिखे जन-दुसरे, इतर लोक. २० ढका-धक्का. तुका-मोठेपणा, महत्त्व. २३ कठिण शब्दे-कठोर शब्दांनीं. २४ चिमोटा-चिमटा. २५ वैखरी-वाणी. २८ भगवद्गीतेंत बोलिलें-भगवद्गीता अ. १६-४मध्यें म्हटलें. ३३अवाचितें-एकाएकीं. ३५ बोळेसा-प्रसन्न होईलसा. ३७ प्रबोधशक्ति-उपदेशाचें माहात्म्य. ४१ सांगातीं-सोबती.

## २२. निःस्पृह-लक्षण

( रामदास-दासबोध )

' निःस्पृह-लक्षण ' हा दासबोधाच्या पंधराव्या दशकांतील दुसरा समास. रामदासांना आपल्या भोंवतालच्या समाजांत जी धार्मिक आणि सामाजिक बेबंदशाही व अनवस्था माजलेली दिसली तिचें वर्णन या समासाच्या पहिल्या भागांत आहे. तर ती नाहींशी करून समाजपोषक अशा समष्टिधर्माची स्थापना करण्यास विरक्त पण व्यवहारचतुर पुरुषानें काय केलें पाहिजे याचें वर्णन त्याच्या दुसऱ्या भागांत आहे. स्वतः रामदासांच्या जीवनसरणीचें वर्णनहि अभावितपणें त्यांत आलें आहे.

२ प्रकृती-स्वभाव. ३ म्लेंच्छ-यवन वगैरे. फिरंगणांत आटले-फिरंगी लोकांच्या देशांत-नाहींसे झाले. रोधिले-आडलें. ७ षट् दर्शनें-सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा आणि वेदान्त. ८ गथागोवी-गोंधळ. ११ प्रत्ययाचें-अनुभवज्ञान. १२ कळला-समजलेला. १४ विचक्षण-शहाणा, चतुर. १५ अव्हाटांची-आडमार्गाची. १६ प्रबोधशक्तीची-उपदेशाच्या सामर्थ्याची. १६ निरूपणें-वर्णनानें. १७ सगट-सर्व. १७ दंडक-रीत, संप्रदाय. १८ गुमानें-अधिकपणानें. २१ सीमा सांडिली-मर्यादा

सोडली. २२ मत्सरमताची गोवी–मत्सराची गुंतागुंत. २३ खनाळामध्यें–घळीमध्यें. २४ कठिण–क्वचित्. नेमक–नेमानें. २५ कट घालून–एकमत करून. २७ ताथे–समुदाय. २९ कैवाड–वेगवेगळे प्रकार, युक्तिप्रयुक्ति.

## २३. मंगलाचरण

( वामनपंडित–यथार्थदीपिका )

वामनपंडितांच्या सुप्रसिद्ध 'यथार्थदीपिका' या भगवद्गीतेवरील ओवीबद्ध टीकेचें मंगलाचरण वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांतील पहिल्या पंचवीस ओव्या प्रस्तुत उताऱ्यांत आहेत. आपल्या पूर्वीच्या कोणत्याच टीकाकारांनीं गीतार्थाचें यथार्थ निरूपण केलेलें नाहीं आणि म्हणून तें काम आपण अंगावर घेत आहोंत असा वामनपंडितांचा दावा आहे. त्यामुळें आपले म्हणणें मांडतांना त्यांनीं पहिल्यापासूनच आपल्या वैशिष्ट्याची चमक दाखविली आहे. ज्ञानेश्वरांच्या सुप्रसिद्ध 'भावार्थदीपिके'च्या मंगलाचरणांत गणपतीला नमन आहे, तर 'मामेकं शरणं व्रज,' या वचनाला अक्षरशः प्रमाण मानून वामनपंडित गीता सांगणाऱ्या श्रीकृष्णालाच नमन करतात. भगवंताच्या स्वरूपाचें त्यांचें विवेचन अद्वैत वेदान्तमतास अनुसरून असून, त्यांत त्यांनीं इतरत्रहि वापरलेल्या उपमा व दृष्टान्त हेहि आले आहेत. त्यांत ज्ञानेश्वरांच्या काव्यांचें मनोहरत्व नाहीं, पण पांडित्याचा डौल आहे. वाचकांनीं हीं दोन्ही मंगलाचरणें एकत्र वाचून पाहावींत.

१ वासुदेव–श्रीकृष्ण. देवाधिदेव–देवांचा देव. अर्जुन गुरो–श्रीकृष्णानें अर्जुनाला भगवद्गीता सांगून कर्तव्याकर्तव्याचा उपदेश केला म्हणून हें विशेषण. २ षड्गुणा–सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान आणि वैराग्य हे सहा गुण मानले आहेत. ३ गुणातीत–गुणापलीकडचा. त्रिगुण–सत्त्व, रज, तम. अपरोक्ष–अदृश्य. ४ इंद्रियगम्य–विषय. ध्येय–ध्यान करण्यास योग्य. रम्य–रमण्यास योग्य. ६ ऐश्वर्य–षड्गुणांपैकी एक. ८ श्रीसच्चिदानंदगुरु–सत्य, ज्ञान आणि आनंद असा ईश्वरस्वरूप गुरु. ९ चिद्घन–ज्ञानघन. १२ निपट–केवळ. चराचराचि–जंगमस्थावर. १३भागवत–विष्णुभक्त, वैष्णव. १४ एवं–अशाप्रकारें करून. १५ नग–दागिना. १६ अधिष्ठान–आधार. विवर्ता–भोंवरा. विश्वभर्ता–विश्वाचें पोषण करणारा.

१८ जन्मादि साहि विकार=जन्म–अस्तित्व, वृद्धि–विकृति, क्षय–नाश. १९ ज्ञान–षड्गुणांपैकीं एक. २० वृत्तिरूप–मनोवृत्तिरूप. २२ वाणे–दृढ वाटे. २५ मंगलाचरणामिसें–मंगलचरणाच्या मिषानें–निमित्तानें.

## २४. यथार्थदीपिकासमर्थन

( वामनपंडित–यथार्थदीपिका )

वामनपंडितांच्या यथार्थदीपिकेंतील सातव्या अध्यायांतील या शेवटच्या बत्तीस ओव्या आहेत. ज्ञानयुक्त सगुणभक्ति हीच सर्वश्रेष्ठ होय. श्रीकृष्णाच्या ठिकाणीं अद्वैत व अव्यभिचारिणी सगुण-भक्ति हेंच गीतेचें सार होय, असें यथार्थदीपिकेचें प्रतिपादन आहे. तें त्यांत स्पष्टपणें आलेलें वाचकांना आढळून येईल. इतर टीका असूनहि आपण यथार्थदीपिका कां लिहिली, तिचें प्रयोजित काय व वैशिष्ट्य काय हें वामनपंडितानें दहा व अकरा या ओव्यांत सांगितलेलें आहे, त्यापुढील बारा ते अठरा या ओव्यांतील टीकेचा रोख ज्ञानेश्वरावर आहे. हें उघड आहे. आत्मविश्वास, स्पष्टवक्तेपणा, निर्भीड, निश्चित व आवेशयुक्त प्रतिपानद् हीं वामनपंडिताच्या शैलीचीं वैशिष्टयें या उताऱ्यांत दिसून येतात.

१ निपुण–कुशल. ४ भक्तिसम तुकेना-भक्तीची बरोबरी करितां येईना. ५ भगवत्सुवर्ण–भगवान् हेंच सुवर्ण. ९ चाड–आवड, इच्छा. ११ श्रीवत्सांका–श्रीवत्स हे चिन्ह ज्याच्या छातीवर आहे त्याला. जगद्गुरूतें–ईश्वराला. १३ अव्यभिचारिणी–एकनिष्ठ. १७ इतरदेवताभजन–ज्ञानेश्वरांनी आपल्या ग्रंथाच्या आरंभीं गणपतीस नमन करून मंगलाचरण केलें आहे त्यावर ही टीका आहे. १९ सेव्यत्वें–सेवा करण्यास योग्य म्हणून. २१ अविधिपूर्वक–नियमरहित २२ परता–दुसरा परका. २३ गीताटीका तो आणि वामन–यथार्थदीपिका भगवंत आणि वामन हे स्वरूपतः अभिन्न आहेत. २९ कुमुदें–चंद्रविकासी कमळें. ३० कुश्चित–वाईट मनाचा, अमंगळ. ३२ प्रतिपदीं–प्रत्येक शब्दांत.

## २५. रुक्मीचें भाषण

( रुक्मिणीस्वयंवर–एकनाथ )

नाथांच्या रुक्मिणीस्वयंवरांतून हा उतारा घेतला आहे. दुसऱ्या प्रसंगांत रुक्मी कृष्णाची निंदा करून रुक्मिणी शिशुपाळासच द्यावी असें सांगतो त्या प्रसंगांतील हें कृष्णवर्णन आहे. वर्णनांतील पदांमुळें निंदा तीच स्तुति होते व कृष्णचरित्राची अद्‌भुतता काव्याच्या चमत्कृतीमुळें अधिक उठावदारपणें प्रतीत होते. त्यांत वीरोचित आवेशहि आहेच.

१ शरीरसंबंध–विवाह, शरीर धारण. अबद्ध–असंबद्ध. ६ काळयवन–गर्गमुनींचा यवनीपासून झालेला पुत्र. कृष्णाने याम मुचकुंदाकरवीं मारलें. मुचकुंद–इक्ष्वाकुवंशी मांधाता पुत्र, देवांचा साहाय्यकर्ता.हा एका दरींत युद्धोत्तर विश्रांतीस झोपला होता. यानें काळयवनास देवांनी दिलेल्या वराच्या शक्ती-मुळें नेत्र उघडतांच मारलें. ७ गाढा–शूर. जरासंध–कंसाचा सासरा. याचा भीमाकरवीं कृष्णानें वध करविला. भेणें–भीतीनें. अगड–छेदक. ८ केशी, रिष्ट–कृष्णास मारण्यास कंसानें धाडलेले असुर. सुभट–वीर. ९ वत्सासुर, बकासुर, अघासुर–कृष्णास मारण्यास कंसानें पाठविलेले असुर. १० विंदाणें–अद्‌भुतचरित. लपतीं–लपण्याचीं. १२ मत्स्य, सूकर, कमठ–मत्स्यावतार, वराहावतार, कच्छावतार. १४ बळीनें इ०–वामन बळीस वर देऊन पाताळांत त्याचा द्वारपाळ झाला. २० वृत्तिशून्य–शून्याकार. २४ स्वबोध–आत्मबोध. २५ लाथ हाणितली इ०–'श्रीवत्स'पदलांछनत्वाचा उल्लेख. २९ कुडें–खोटें. ३० जीवांतू–मरण, मोक्ष.

## २६. रुक्मिणीवर्णन

( रुक्मिणीस्वयंवर–एकनाथ )

नाथांच्या रुक्मिणीस्वयंवरांतील ७ व्या प्रसंगांतील हा उतारा आहे. हें रुक्मिणीचें स्वयंवर नाथाच्या संस्कृत काव्याभ्यासाचें व साहित्यकलेंतील कौशल्याचें द्योतक आहे. रुक्मिणीच्या रूपवर्णनांत अनायासें त्या काळच्या अलंकारांचा उल्लेख झाला आहे. हें वर्णन लौकिक पद्धतीचें असूनहि आध्यात्मिक छटेमुळें व भक्तिध्येयामुळें अलौकिक आहे. रुक्मिणीस्वयंवर शके १४९३ त पुरें झालें.

१ बरवेपणा–सौंदर्य. ४ पूर्वील माझा बंधु–लक्ष्मी व चंद्र हीं दोन रत्नें समुद्र–मंथनांत निघालीं होतीं. ५ भीमकी–रुक्मिणी. सम्यक–चांगलें. ७ तानवडें–कर्णभूषणें. ८ भोंवरी–भ्रमरासारखा डोक्यांतील अलंकार, उटी. १० निढळीं–कपाळावर. ११ व्यकटा–वांकड्या. १७ फरा–पिंपळपान. २१ घाई–घावांनी. २२ बीक–सौंदर्य, भूषण. २४ सधर–धारण करणारे. ३२ अहेवतंतु–मंगळसूत्र. ३३ चितांक–गळ्यांतील सरीवजा अलंकार. ३७ पांखे–काचोळी. कमणी–नंद, कसे. ४० क्षीरोदक–रेशमी पातळ. पाटोळा–रेशमी चित्रविचित्र वस्त्र. ४२ विरडे–गुंडी. ४३ सुभटें–सुरेख. उद्भटे–उत्तम. ४८ चेइरें–जागृति. वाइलें–धारण केलें, ओढलें.

## २७. पैलें पुराण

( क्रिस्तपुराण–फादर स्टीफन्स )

हा उतारा फादर स्टीफन्सच्या ( शके १४७१–१५४१ ) क्रिस्तपुराणांतील आहे. हा कवि इकडे आलेला पहिला इंग्रज. शेवटचीं चाळीस वर्षें त्यानें साष्टी कॅथॉलिक समाजांत धर्मोपदेशकत्व केलें. कोंकणीचें व्याकरण व मार्कस जॉर्ज याच्या पोर्तुगीज ग्रंथाचें भाषांतर त्यानें केलें आहे. क्रिस्तपुराणास गद्यप्रस्तावना पण आहे. क्रिस्तपुराणाच्या भाषेवर ज्ञानेश्वरादि पूर्वसूरींच्या अध्ययनाची छाप स्पष्ट दिसते. या ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयानें हिंदुवेष धारण केला आहे.

२ साघरु–सागर. नातुडे–सांपडत नाहीं. ३ ग्यानदीपु–ज्ञानदीप. ४ सर्वग्न्या–सर्वज्ञा. ५ हेळामात्रें–लीलेनें. नख्यत्रें–नक्षत्रें. ६ स्पिरिटु सांक्टु–पवित्र आत्मा. ७ स्वस्तकरा–स्वस्तिकारका, कल्याणमया. ९ फेडिसी–नाहीसें करतोस, दूर करतोस. घोडिव–गोडिव. १० त्रिंदादिचिया तिसरिआजाणा–त्रितयांतील तिसऱ्या ! १८प्रतिस्वरूपीं घातला–स्वसमान केला.१९देयाचार बंदी माझारीं–सैतानाच्या पकडींत. २० प्रॉफेट–प्रेषित. २१ अंकुवारी–कुमारिका- २६ त्रिभुवथु–त्रिभुवनांत. २९ नवे फौजांचे दळभारी, दळभारपत्य पुढारी–देवदूत प्रमुख. ३१ सांतां–( Saint ) संतांस. ३२ पॅट्रिआर्का प्रॉफेटां–पितृसत्ताक ज्यू जमातीच्या प्रमुखांपैकीं जे परमेश्वराचे प्रेषित झाले त्यांस उद्देशून. ३४ अवस्वरां–वेळीं. दीपवाडु–दिवा. ३५ उजुवाडु–उजेड. ३६ अॅपॉस्टोलां–खिस्ताच्या बारा संदेशवाहकांस. ३९ तां आश्चर्यें–ते चमत्कार.

४० मार्टिर—हुतात्मे. ४२ कन्फेसोर—पापानिष्कृतीसाठीं ज्याजवळ पाप कबूल करायचें तो धर्मोपदेशक. ४३ रविभानु—सूर्य.

## २८. रंभाशुकसंवाद

( मुक्तेश्वर–स्फुटकाव्य )

मुक्तेश्वराच्या 'रंभाशुकसंवाद' या स्फुट काव्यांतून प्रस्तुत उतारा घेतलेला आहे. शुक तपश्चर्या करीत असतांना त्याचें सत्त्वहरण करण्यासाठीं इंद्र रंभा या अप्सरेला पाठवितो. ती आपल्या सौंदर्याचें प्रदर्शन करून व भोगविलासांतील सुखाचें अत्यंत मोहक भाषेंत वर्णन करून त्याला मोह पाडण्याचा प्रयत्न करते. तो स्त्रीदेहाच्या ओंगळपणाचें वर्णन करून त्यापासून प्राप्त होणाऱ्या सुखाविषयीं तुच्छता दर्शवितो. त्यावर रंभेनें दिलेलें उत्तर या उताऱ्यांत आहे. यांतील उत्तान शृंगारिक व बीभत्स वर्णनें कांहींशीं सदाभिरुचीस सोडून आहेत असें वाटलें तरी त्यांत मुक्तेश्वराचें भाषाप्रभुत्व निःसंशय व्यक्त होतें.

मुक्तेश्वराच्या अनुपलब्ध भागवतांतील 'रंभाशुकसंवाद' हें एक प्रकरण असावें असा के. ल. रा. पांगारकरांचा कयास होता. हें भागवत अजूनहि सांपडलेलें नाहीं.

३ उच्चैःश्रवा—क्षीरसागरांतून निघालेला इंद्राचा घोडा. ५ गजवेली—तांदळाची एक जात. ७ देवानिढला—देवाच्या कपाळावर. पायखोळा—पायतळीं, पायदळी. १० पेरोज—वैदूर्य, एक रत्न. मरगज—मरकत, एक प्रकारचें रत्न, पाच. १२ जांबुनद—सोनें. तगटे—भरजरी वस्त्र. रगटे—रकटें, हलकें, जीर्ण, फाटकें वस्त्र. १४ जाडे—स्थूल माणूस, शरीर. रिघे—बळानें प्रवेश करे. फुडे—पुढें. १६ काबाड—भारभूत असलेले. पाषांडी—नास्तिक, वाममार्गी. १९ कोरान्न—न शिजविलेलें धान्य, अशी भिक्षा. २१ पाडें—प्रमाणें. २२ नाहिजे—नाहावें. २४ नातळती—न स्पर्शती. २७ ग्राहीक—ग्रहण करणारा रसिक.

## २९. नलोपाख्यान

( मुक्तेश्वर–महाभारत, वनपर्व )

मुक्तेश्वरी महाभारताच्या वनपर्वांतील सातव्या अध्यायांतून प्रस्तुत उतारा घेतलेला आहे. धर्मराज वनवासांत असतांना त्याला बृहदश्वऋषीनें सांगित-

लेल्या कथांपैकीं नलोपाख्यान ही एक कथा आहे. द्यूतांत राज्य घालविल्या-नंतर नलाला दमयंतीसह वनांत जावें लागतें. वनवासांत तिला होणारे कष्ट त्याच्यानें पाहावत नाहीत. शेवटीं आपण हिला सोडून गेलों म्हणजे तरी ही पितृगृहीं जाईल, या कल्पनेनें तो तिला झोंप लागली असतां एकटी सोडून निघून जातो. जागी झाल्यावर पति आपल्याला एकाकी सोडून निघून गेला आहे हें कळून येऊन दमयंती त्याला शोधीत फिरते व त्याच्या-साठीं शोक करते असा कथाभाग.

मुक्तेश्वराच्या काव्यशक्तीचा उत्कर्ष जेथें पाहावयास मिळतो अशा स्थळां-पैकी हें एक आहे. कै. चिं. वि. वैद्य म्हणतात, " दमयंतीचा नलविरहा-नंतरचा शोकहि फारच सुंदर आहे आणि तो मुक्तेश्वराचा स्वतःचा असून त्याला महाभारतात आधार नाही. "

( निबंध आणि भाषणें–चिं. वि. वैद्य, मुंबई १९१५ )

३ अर्धवस्त्रछेदनालागीं–अर्धे वस्त्र फाडण्याच्या कामीं. ४ इतें–हिला. ५ कोशराहित–म्यानाशिवाय. ७ आगळे–अधिक. ८ हुताश–अग्नि. ९ विजनीं–अरण्यांत. १० आदित्य–सूर्याच्या बारा विभूति. रुद्र–शंकराचीं अकरा स्वरूपे. वसव–अष्टदिक्पाल. सप्तऋषि–प्रत्येक मन्वंतरांत सात धर्मो-पदेशक ऋषि होत असतात. त्यांनाच " सप्तर्षि" म्हणतात—कश्यप, अत्रि, वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, भरद्वाज. १२ ग्रह–नवग्रह. गुल्म–झाडी, झुडपी. १५ वसतिया–वसणाऱ्या. १६ आपतत्त्वा–हे पाण्या. २० सूदलें–घातलें. २१ खेचर–आकाशांत विहार करणारे पक्षी, यक्ष, किन्नर इत्यादि. २५ चामकती–जाती, उचलती. २९ धाय मोकलणें–हंबरडा फोडणें. ३४ आक्रांतली–आक्रांत केला. ३५ रिघों–शिरूं पाहे. ३७ चर–पृथ्वीवर चालणारे प्राणी. ३९चक्रवाकाचिया युग्मा–चक्रवाकाच्या जोडप्यास.४३ अरिष्ट–संकट. ४६ वाहळ–ओढा. दरकुटें–दऱ्या,गिरिकपाटें–पर्वतांतील गुहा.

## ३०. दुष्यंतशकुन्तलोपाख्यान.

( मुक्तेश्वर–महाभारत )

कालिदासाच्या शाकुन्तलामुळें सर्वांना परिचित झालेली ही मूळांत महा-भारताच्या आदिपर्वांत उपाख्यान म्हणून आलेली कथा आहे. मुक्तेश्वरानें केलेला या उपाख्यानाचा अनुवाद अत्यंत सुरस असून त्यांतील दुष्यंताचें

कण्वाच्या आश्रमांत झालेलें आगमन व शकुन्तलेनें त्याचें केलेले स्वागत हा भाग येथें घेतलेला आहे.

२ महीध्रा–पर्वतास. ६ वोपी–देई, अर्पण करी. ८ भूपाळचूडामणि–राजांतील शिरोरत्न. १० पदाती–पायदळांतील सैन्य. १२ डागें–अरण्यें. १४ भार्जित–भाजलेले. १६ पवित्रजीवनी–जिचें पाणी पवित्र आहे अशी. देवतटिनी–गंगा. तरंगलिंगें–तरंगरूपी शिवलिंगें. सुफेन सुमनीं–पाण्यावरील फेसरूपी फुलांनीं. २० इंदिरावेशें–लक्ष्मीवेशानें. २२ अर्घ्यपाद्यें–अर्घ्य व पाद्य यांनीं म्हणजे ओंजळीत किंवा लहान पात्रांत पाणी घेऊन त्यांत गंधाक्षता फुलें घालून, त्यांनी. २३ विधिपूजनीं–विधिपूर्वक पूजा करून. ३१ ऊर्ध्वरेता–नैष्ठिक ब्रह्मचारी. ३४ गाधिज–विश्वामित्र. ४१ मृगडोळसे–मृगासारखे डोळे असलेल्या स्त्रिये. ४७ हिमवंतगिरीच्या–हिमालयाच्या. ४९ झडपोनि–झडप घालून. परौतें–पलीकडे. ५१ ओमंगी–मांडीवर.

## ३१. वनसुधा

### ( वामनपंडित-स्फुटकाव्य )

यथार्थदीपिकेंत वामनपंडिताचें पांडित्य प्रगट होतें तर कृष्णचरित्रविषयक त्याच्या आख्यानांत रसाळपणा, वर्णनकौशल्य व कृष्णाविषयक भक्तिभाव हे त्याच्या काव्याचे गुण दिसून येतात. ‘ वनसुधा ’ या आख्यानांत श्रीकृष्णानें आपल्या संवगड्यांसह केलेल्या विविध प्रकारच्या क्रीडेचे वर्णन केलें आहे. प्रस्तुत उताऱ्यांत अघासुराचा वध केल्यानंतर श्रीकृष्ण ‘ सरोवराच्या बरव्या तटातें आला व तेथें त्यानें आपल्या मित्रांसह भोजन केलें, ’ असा कथाभाग आलेला आहे. त्यांतील सृष्टिवर्णन व वनभोजनाच्या वर्णनातील स्वभावोक्ति हीं उल्लेखनीय आहेत. त्याची शब्दचमत्कृतीची व. यमकाची आवडहि या उताऱ्यांत व्यक्त होते.

१ वैदिकविप्रसिद्धा–वैदिक ब्राह्मणांनीं सिद्ध केलेली. २ सौलभ्य–सुलभता. कमळा–लक्ष्मीला. कमळासनाहि–ब्रह्मदेवासहि. थोर–राहे. ४ अजित–कृष्ण. ५ बाळसंता–गोपाळ बाळकरूपी संतास. संताप–दाह. संप–दाहाची समाप्ति. ६ विद्रुमाची–पोवळ्याची. ७ स्वपद्मींच–आपल्या पायींच. पद्मालयाश्री–कमलांत निवास असलेली, लक्ष्मी. मानसाच्या–

मानससरोवराच्या. ८ सुफळें-चांगल्या फळांनीं युक्त. पोफळें-सुपारीचीं झाडे. सजळें-पाणी असलेलें. प्रबळें-मोठीं. तुंबळें-उंच. विमळें-पांढरीं स्वच्छ कुळें-समूह. ९ पाळीयुक्त-पाळ असलेलीं. सुतळीं-चांगलीं तळीं. अली-भ्रमर. महाशतदळीं-मोठ्या कमळांत. घे पैज मुक्ताफळी-मोत्याशीं पैज मारतो, बरोबरी करतो. १४ दुर्वांकुरदर्भकांहीं-दुर्वांकुरांनीं आणि दर्भांनीं. व्रजअर्भकांहीं-गोपालबालकांनी. १५ मंडलाकार-वर्तुलाकार. १६ स्वसंस्कारशेषें-आपले संस्कार शिल्लक राहिल्यामुळें. १७ भवसागरसांगडी-संसारसागर तरून जाण्यास भोपळ्याच्या सांगडीप्रमाणें. कवळ-घांस.

## ३२. दमयंती-स्वयंवर

### ( दमयंतीस्वयंवराख्यान-रघुनाथपंडित )

रघुनाथपंडितविरचित 'दमयंतीस्वयंवरां'तून प्रस्तुत उतारा घेतलेला आहे. विदर्भ देशाचा राजा भीमक आपली कन्या दमयंती हिच्यासह दरबारांत बसलेला असतांना, निषध देशाहून कांहीं ब्राह्मण येऊन त्याची भेट घेतात. त्यानें प्रश्न केल्यावरून नळाचें लोकोत्तर शील, रूप व पराक्रम यांचें ते वर्णन करतात. तें ऐकून दमयंती नळावर मोहित होते. नळाचे गुप्तचर येऊन हें वृत्त त्याला सांगतात व दमयंतीच्या सौंदर्याचें वर्णन करतात. तें ऐकून नळहि तिच्यावर अनुरक्त होतो. दमयंतीच्या विरहानें त्याला चैन पडत नाहीं म्हणून तो वन-विहार करायला निघतो, असा पूर्वकथाभाग आहे. या उताऱ्यांत नळ नगराबाहेरील एका उद्यानांत प्रवेश करतो, तेथें आलेल्या राजहंसांपैकीं एकाला तो पकडतो, पण त्याच्या विनवणीरून त्याला सोडून देतो. या उपकाराबद्दल हंस त्याला "चतुर जे तरुणी हृदयंगमा करवितो तिजसीं तुज संगमा" असें आश्वासन देतो एवढा कार्यभाग या उताऱ्यांत आला आहे. संस्कृतप्रचुर, माधुर्यपूर्ण सुश्लिष्ट रचना, वर्णनकौशल्य, स्वभावोक्ति या अलंकारांचा वापर हे रघुनाथपंडिताचे विशेष यांत व्यक्त झालेले आढळतील. यांतील सृष्टिसौंदर्याचें वर्णन वास्तव नसून अद्भुत आहे. या अद्भुततेचें समर्थन श्री. प्रियोळकरांनीं आपल्या दमयंतीस्वयंवराच्या चरित्र व काव्यविवेचन

या भागांत चांगलें केलें आहे. (:पाहा.पृ. ४८-४९.) हें सृष्टिवर्णन व कवीनें साधलेला हंसाचा स्वभावपरिपोष हीं या उताऱ्यांतील लक्षणीय स्थळें आहेत.

१ सीम—सीमा. मित—निवडक. २ फनस—फणस. जंबू—जांभूळ. जंबीर— ईडालिंबू. कुंद—एका जातीचें फूल. माकंद—आम्रवृक्ष, आंवळी, पीतचंदन, आवळा. कदंबें—कदंब वृक्ष. शुकसारिकाकदंबें—पोपट, साळुंकीचे समूह. ३ मकरंद—पुष्पमधु. सांद्र—दाट. भृंगतती--भ्रमरांचे समूह. ५ तटाक--तळें. तुडुंबलें—तुडुंब भरलें. तामरसानपायें—नष्ट न होणाऱ्या रक्तकमळांनीं. निरंतरामंद—सारखा व पुष्कळ. मरंद—पुष्परस, मकरंद. तपांतहि-- ग्रीष्मऋतूंतहि. ६ सारस—तळ्याचें. ७ उदरंभर—खादाड. भ्रमरांचे— भ्रमरांचें. विकासवीतें--खुलवितें. ८ राजहंस—नृपश्रेष्ठ. पोहे—पाणपोई. ९ अधरराग—खालच्या ओंठाचा रक्तिमा. ११ डौरहि—अंगरख्याचा घेरहि. १२—मणिबंधीं—मनगटीं, मनगटाच्या ठिकाणीं. पंचू—पंजा. १३ भेणें— भीतीनें. सजण—सखा. १४ हंसाहिंसका—हंसाची हत्या करणारा. १५ जुंझार— झुंजार. १६ कटकमुकुटादी—कडें, मुकुट इत्यादि. १७ नवप्रसव—नुकतीच प्रसूत झालेली. १८ फांसां—फाश्यांत. शेली—मान. २० वेल्हाळे—प्रिये. शोकशालें—शोकशाळेंत. आळवितां—नांव घेऊन शोक केला असतां. २१ पति— नवरा, राजा. २३ हेलावला—उचंबळला. पयोधि—समुद्र. मुक्ति विश्रांति— सुटकेचा विसावा, मुक्ततेमुळें प्राप्त झालेली शांति. कवाळिति—आलिंगिती. २४ क्षोणीपतिस—पृथ्वीपतीस, राजास. केवा—खजिना, ठेवा. २५नीतिसुंदर—नीतीमुळें आल्हादकारक, किंवा रम्य. निखंदूनि—झिडकारून. मंदूं—विषण्ण होऊं नकोस. सकलवंदनीय—सर्वांना पूज्य असे. २८ करपंजर—हात हाच कोणी पिंजरा. वचनौघ—वाक्प्रवाह, भाषण. दुग्धचारा—दूध हाच चारा किंवा अन्न. हंसक्षीरन्यायांत सूचित झालेली हंसाची दुधाविषयींची आवड प्रसिद्धच आहे. सत्यलोकेश—ब्रह्मदेव. गुणागारा—गुणाच्या आश्रया. २९ लगामीं—लगामामध्यें, ताब्यामध्यें. नृपस्वामी—धनी असलेला राजा. ३० पूरितलोककामा—लोकांच्या इच्छा ज्यानें पूर्ण केल्या आहेत अशा. व्यजनहि—पंखाहि. पुटारीं—पुटें. करूं— करण्यासाठीं. तपनदीप्तिस—सूर्यप्रकाशास म्हणजे उन्हास. ३१ हृदयंगमा— मोहक, मनांत भरलेली.

# ३३. रुक्मिणीस मातेचा उपदेश

( सामराज-रुक्मिणीहरण )

सामराज या कवीच्या संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर लिहिलेल्या ' रुक्मिणीहरण ' काव्यांतील सातव्या सर्गांतून हा उतारा घेतलेला आहे. रुक्मिणीच्या विवाहाच्या तयारीची धांदल व तिच्या मातेनें विवाहाच्या पूर्वी तिला केलेला उपदेश, हे विषय यांत आलेले आहेत. प्रसंगांचें हुबेहूब वर्णन करण्याची हातोटी, मनुष्यस्वभावाचें सूक्ष्म ज्ञान, आणि रसपरिपोष करण्याचें कौशल्य, हे सामराजाचे गुण येथें ठळकपणें आढळून येतात. तत्कालीन स्त्रियांची परिस्थिति, त्यांचा सामाजिक व कौटुंबिक दर्जा व त्यांच्यापुढील आदर्श, यांवरहि यांतील वर्णनामुळें प्रकाश पडतो.

१ सन्मुख–पुढें, समोर. २ प्रलयसूचक–अनर्थसूचक. तांत्रिकांचें–तंत्रशास्त्रज्ञांचे. ३ मधुपर्क–अतिथीची पूजा. ४ लग्न–राशीचा उदय, तदुपलक्षित काल. उगलेच–मुकाट्यानें. ६ प्रसुवचनविलासें–आईच्या बोलण्यानें. करिणीला–हत्तीणीला. अभिमत–इष्ट, प्रिय. जनयित्री–आई. ७ अकथित मला ग्रंथ उकले–तूं कांहीं बोलली नाहींस तरी तुझ्या मनीचें सारें मला कळलें. ९ सरपाड–समानगुणता. १० कंपिलदृक्–चंचलदृष्टीचा. ११ सिंधुगर्भी–समुद्र हटवून वसवलेल्या द्वारकेंत. १२ तंतीं लागसी–मार्गास लागलीस. १४ घालाघालीं–गोंधळ, धांदल. पोटागीची माय–जिच्या पोटांत मुलीविषयीं कालवाकालव होते अशी आतड्याला पीळ पाडणारी आई. १६दारुण–कठोर. भावा–दीर. १७ माणुसही तिरांचें–तिरसट माणूस. १९ पिढें–पाट, आसन. २२ मिळणीं मिळावें–एकरूप व्हावे. २३ वल्लभ–प्रियकर, पति. वश्य–वश. २४ जाब–उत्तर. २६ सांकडेंच–संकट. २७ ढंग--चाळे, चेष्टा. २८ घरोबा–संसार. २९ तूटि–फूट, भिन्नभाव. ३१ नवोढे–नववधू रुक्मिणीस. ३३ कैतव–कपट. ३४ प्रगल्भता–प्रौढत्व. ३६ उधंटा–उद्धट आचरणाच्या. ३७ आदासपर्यंतहि–अगदीं दासापर्यंत. ३९ पल्लव–पदर. ४३ संसूचक--निदर्शक. मोळा–वागण्याची पद्धत. धम्मिल्ल–केशकलाप, वेणी. अंधंतमरूप--तमोमय प्रदेशरूप. विक्त्रेंदु–मुखचन्द्र. कूर्पासकाआड–चोळीआड. ४५ पैशून्य–चहाडखोरपणा. ४६ न माखें–लिप्त होऊं नकोस. ४७ वीसिल--प्रसवशील.

## ३४. श्रियाळ व चांगुणा यांची सत्त्वपरीक्षा

( श्रीधर—शिवलीलामृत )

श्रीधरकृत ' शिवलीलामृत ' या प्रसिद्ध ग्रंथाच्या १४ व्या अध्यायांतून ही कथा घेतलेली आहे. नारदाकडून श्रियाळाच्या दातृत्वाची ख्याति ऐकून त्याची सत्त्वपरीक्षा करण्यासाठीं ' कुश्चळ अतीताचा ' वेष धरून शंकर त्याच्याकडे येतात, असा पूर्वकथाभाग.

१ कुश्चळ–वाईट. २ अतीत–पाहुणा, आतिथि. ( सं. आतिथि ) ५ येरू (र)–री–रें ( सं. नाम ) उल्लेख केलेला मनुष्य. पूर्ववाक्यांत ज्याचा नामनिर्देश केला असतो त्याचा पुन्हां उल्लेख करीत असतां या सर्वनामाचा प्रयोग करतात. ६ धरून माझा उद्देश–माझ्यासाठीं. ९ बत्तीसलक्षणी–सर्व-गुणसंपन्न, शास्त्रांत सांगितलेल्या बत्तीस लक्षणांनीं युक्त. ११ पचऊनि–शिजवून. १५ पिशितदान–मांसदान. २१ अतींद्रियद्रष्टा–अतींद्रिय, इन्द्रियास आकलन न होणारे, त्यांच्या सामर्थ्याबाहेरचें, द्रष्टा–पाहणारा. २९ सुढाळ–चांगल्या घडणीचे, रचनेचे. २९ पयःफेनधवल–पाण्याच्या फेसाप्रमाणे शुभ्र, शंकर. ३३ भणंग–अनाथ, भिकारी. ३५ अवधारीं–खात्रीचा. ३७ केणें–बाजारांत विकावयास आलेला पदार्थ, व्यापाराविषयक पदार्थ. ५३ वळसा–गोंधळ, गलबला. ६१ जगद्‌गुरु–( जगत + गुरु ) ईश्वर.

## ३५. धनुर्भंग

( श्रीधर–रामविजय )

प्रस्तुत उतारा श्रीधराच्या ' रामविजय ' काव्यांतील आठव्या अध्यायांतून घेतलेला आहे. विश्वामित्राच्या यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या असुरांचा नाश करून, अहिल्येचा उद्धार करून, रामलक्ष्मण जनकाजवळ असलेलें शंकराचें धनुष्य पाहावें म्हणून मिथिलेस येतात. जनक त्यांना सामोरा येऊन राजसभेंत घेऊन जातो. तेथें सीतेच्या स्वयंवरासाठीं देशोदेशींचे राजे जमलेले असतात. शिवधनुष्य हत्तींकरवीं ओढून राजसभेंत आणविलें जातें. जनक पण सांगतो. पण धनुष्याला गुण लावावयास उठावयाची कोणाहि राजाची छाती होत नाहीं. अनाहूत आलेला रावण आत्मप्रौढीनें भरलेलें भाषण करून धनुष्यास गुण लावावयास सिद्ध होतो. पण त्याला धनुष्य धड उचलतांहि येत नाहीं.

धनुष्य कलथून रावण उताणा पडतो व धनुष्य त्याच्या छातीवर येतें. ‘ धनुष्य त्वरित काढा ’ म्हणून ओरडा करीत रावण पडलेला असतो. अशा वेळीं विश्वामित्र रामाला तूं उठून धनुष्याला गुण लाव म्हणून खुणावतो, अशी या उताऱ्याची पार्श्वभूमि आहे.

सीतास्वयंवरास रावण आला होता या गोष्टीस मूळ वाल्मीकिरामायणांत आधार नाही. नंतर रचल्या गेलेल्या अनेक रामायणांत व हनुमन्नाटकादि काव्यांत मात्र तसें म्हटलें आहे. त्यांचा अनुवाद आनंदतनय व वामनपंडित या कवींनीं आपल्या सीतास्वयंवरावर रचलेल्या आख्यानांत केला आहे. त्यांचेंच अनुकरण येथें श्रीधरानें केलेलें दिसतें.

१ जातवेद–अग्नि. ३ मखपाळका–यज्ञाचें पालन म्हणजे रक्षण करणाऱ्या. हें विशेषण विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण नुकतेंच रामानें केलें असल्यानें, विशेष अन्वर्थक वाटतें. ५ महायाग–मोठा यज्ञ, पंचमहायज्ञांपैकीं प्रत्येक. ( पंचयज्ञ–ब्रह्मयज्ञ ( वेदाध्ययन ), पितृयज्ञ ( तर्पण ), भूतयज्ञ ( बळी ), मनुष्ययज्ञ, अतिथि–संतर्पण ). पूर्णाहुती–यज्ञाच्या शेवटी सर्व देवतांना दिलेली आहुती. ८ शरयूतीरविहारी–राम, यमुनातटविहारी या धर्तीचें विशेषण. ९ भगणांत–नक्षत्रांत. १२ अरिचक्रवारणपंचानन–शत्रुरूपी हत्तींचा संहार करणारा सिंह. १३ सकुमार–सुकुमार हा शब्द या अशुद्ध स्वरूपांत श्रीधरानें इतरत्रहि वापरला आहे. देखतां राम सकुमार।... ते रामासी मज अर्पिता ॥ या ओव्या हनुमन्नाटक काव्यांतील पुढीलप्रमाणें वर्णनावर आधारलेल्या आहेत. “ कमठपृष्ठकठोरमिदं धनुर्मधुरमूर्तिरसौ रघुनंदनः। कथमधिज्यमनेन विधीयतामहह तात पणस्तव दारुणः ॥ ” ह. ना. वामनपंडितानें तर हनुमन्नाटकाचा सरळ अनुवादच पुढीलप्रमाणें केला आहे. “ मदनशत्रुशरासन हें महा, मदनमूर्तिच केवळ राम हा। करिल सज्ज कसा धनु आपण ?। अहह दारुण तात ! तुझा पण ॥ ” वा. पं. सी. स्व. २५. १५ मदनदहनाचें–शंकराचें. २० चंडीशकोदंड–शंकराचें धनुष्य. २८ तैशी दशमुखाचीं हस्तकमळें पाही ॥ इ. हे उल्लेख अर्थातच वाल्मीकि–रामायणास धरून नाहींत. ३३ घटोद्भव–अगस्ति. ३६ किशोरवयातीत भूषण–तरुणांना भूषणभूत. ३७ जात सप्तावरण भेदून–पंचमहाभूतें व अहंकार आणि महत्तत्त्व हीं सात आवरणें. ४२ घोळिला–जेरीस आणला. ४३ नावेक–क्षणभर,

थोडा वेळ, अंमळ. ४७ आदिवराह–विष्णूचा वराह अवतार. ४८ भाविती–कल्पिती. रमातळा–पाताळास. रसातळ–सप्तपाताळापैकीं एक खालचा पाताळ. ४९ वृंदारक–देव, अमर. ५३ दिव्य–आपल्या सत्याची साक्ष पटवून देण्यासाठीं विशिष्ट देहदंडाची कृति करणें, शपथेचा एक प्रकार. तुला, अग्नि, अप्, विष, कोश इ. दिव्यें आहेत. ५९ स्मरारिमित्रा–स्मरारि=शंकर, त्याच्या मित्रा म्हणजे विष्णूच्या अवतारा, रामा. ६२ मेदिनी म्हणे–वरील रघुनंदनसीता ही पृथ्वीची कन्या असून शेत नांगरलें जात असतांना ती जनकाला सांपडली. ६६ मस्तक चरणीं ठेविला । हें वर्णन अप्रयोजक वाटते. त्याला रूढीचाहि आधार नाहीं. ६७ निराळ–आकाश, अंतराळ, अवकाश.

## ३६. ध्रुवचरित्र

( अमृतराय–ध्रुवचरित्र )

अमृतरायाच्या ‘ ध्रुवचरित्र ’ या आख्यानांतून हा उतारा घेतलेला आहे. त्याच्या शैलीचे सारे विशेष त्यांत दिसून येतील. प्रास व यमकें यांच्या तालावर नाचणारे त्याचे कटिबंध आपल्या शब्दसौंदर्यानेच वाचकाचें मन मोहून टाकतात. विविध प्रकारची परिस्थिति व भाव यांचें यथार्थ वर्णन करण्याचें अमृतरायाचें चातुर्य ध्रुवचरित्रासारख्या वैराग्यपर प्रकरणांतहि दिसून येतें. या उताऱ्यांतील चूर्णिकेंत त्याचे संस्कृतचे ज्ञान स्पष्ट होतें.

मूळमंत्र–ॐ नमो भगवते वासुदेवाय । हा मूळमंत्र. कूळ–तीर. दुकूल–पातळ वस्त्र. शूळपाणि–त्रिशूलधारी शंकर. तूल–कापूस. गोकुळपतीस–कृष्णाला: विष्णूस. कलरवशिशु–मधुर स्वर ज्याचा आहे असा मुलगा. अजन–ज्याला जन्म नाहीं असा. वितृष्ण–ज्याची तहान भागली आहे असा. वृष्णिकुलोत्तंस–यादवकुळाचें भूषण. कृष्णातटीं–यमुनातटीं. कृष्णाहिदमन–कालियाचें दमन. कृष्णसारथि–अर्जुनाचा सारथि. कृष्णमुनि–कृष्णद्वैपायन, व्यास. आताई करूं–नातें जोडूं. मृणालमृदुभुजें–कमळाप्रमाणे मऊ असलेल्या हातांनीं. तरुत्वचा–वल्कलें. अधुनाहि–आतांहि. हरिकथा परिपाटी–हरिकथेची पद्धति. अवगाहें प्रवेश करें. भवगजकेसरी–संसाररूपी हत्तीला मारणाऱ्या सिंहा. सांद्रानंदविग्रहसमुद्रा–ब्रह्मानंदाच्या मूर्तिमंत समुद्रा. मार्जिन–झाडीन. इभ–हत्ती. करणें–इंद्रियें, गात्रें. तरुणतरणितुल्य–बालसूर्यासारखा. संलाप–भाषण. भवव्याल–संसाररूपी सर्प. व्याल–प्रसवाल. भवालागी–कल्याणाला.

# ३७. सीतागीत

( मोरोपंत-स्फुटकाव्य )

मोरोपंताच्या ‘सीतागीत’ या स्फुट काव्यांत सीतेनें आपल्या जावा झालेल्या बहिणींना, श्रीरामाबरोबर वनांत निघाल्यापासून तों रावणवधानंतर, परत अयोध्येंत येईपर्यंतचा सारा वृत्तान्त सांगितला आहे. कवीनें आपले यजमान बाबुजी नाईक यांच्याकडे बारामतीस आल्यानंतर त्यांच्या घरांतील स्त्रियांकरितां सावित्रीगीत, रुक्मिणीगीत व सीतागीत हीं तीन गीतें तयार केलीं असें सांगण्यांत येतें. पंताची रचना क्लिष्ट, समासबहुल व कृत्रिम आहे असा तिच्यावर आक्षेप घेण्यांत येतो. तो सीतागीताला निश्चितच लागूं पडत नाहीं. माजघरांत झोपाळ्यावर बसून मुलींना सहज म्हणतां येईल इतक्या सरळ, सोप्या प्रसादयुक्त भाषेंत यांत रामचरित्र वर्णिलेलें आहे. वृत्तान्त सांगणारी सीता स्वतःच असल्यामुळें स्त्रीसुलभ शब्दांची योजना व भावपूर्णता हेहि विशेष त्यांत आढळून येतात. प्रस्तुत उताऱ्यांत सीताहरणापर्यंतचा कथाभाग आलेला आहे.

१ धन्या—पुण्यश्लोक अशा जनकास. ३ बंधू—याचें नांव कुशध्वज. ४ सुहिता दोन्ही कुळीं—दोन्ही कुळांचा उद्धार करणारी. ८ व्यथा—दुःख. ९ वियोग देउनी—विरह दुःख देऊन. १२ मृषा—असत्य. १३ मुरडोनी—मागें मान करून. १५ नेले मज वाटे—मार्गी नेलें. १६ अनुसूया—अत्रिऋषीची पत्नी, सुप्रसिद्ध पतिव्रता. १७ आजवरी...माळागुणीं—अनुसूयेनें सीतेस सदा शीतल राहणारी चंदनाची उटी व न सुकणारी पुष्पमाला या दोन वस्तू दिल्या होत्या. तुटी—खळ. २१ वेदशास्त्रार्थज्ञ—वेदशास्त्रांचें रहस्य जाणणारे. २४ तीणें—तिनें, शूर्पणखेने. २५ दुष्टें—रावणानें. २९ जगदेकशूर—जगामध्यें अद्वितीय वीर. ३७ शब्दरोपें—शब्दबाणानें. ३८ अग्रजाचा—वडीलभावाचा (रामाचा) ४० मूर्त—मूर्तिमंत. ४२ दापीतां—दटावलें असतां. ४३ सद्या—सद्यःचा अपभ्रंश, तात्काळ या अर्थी. ४४ धनुष्य—धनुष्यें असा पाठ अन्यत्र आहे. ४५ छद्म—कपट. ४७ लेखा—पाड, सामर्थ्य. ४८ महाकाय—मोठें आहे शरीर ज्याचें असा.

## ३८. रुक्मिणीची विवाहकथा

( मोरोपंत--कृष्णविजय )

भागवताच्या दशम स्कंधाच्या आधारें मोरोपंतांनी 'कृष्णविजय' हा आपला ग्रंथ रचला. त्यांतील ८३ व्या अध्यायांतून प्रस्तुत रुक्मिणीविवाह-कथा घेतलेली आहे. या अध्यायाबद्दल—विशेषतः त्यांतील रुक्मिणीच्या विवाहकथेबद्दल—प्रा. बनहट्टी म्हणतात, " ८३ वा अध्याय विवाहकथनाचा असून, त्यांत श्रीकृष्णाच्या अष्टनायिकांनीं व इतर स्त्रियांपैकी एकीनें आपल्या विवाहाच्या कथा द्रौपदीस तिनें विचारल्यावरून सांगितल्या आहेत. पण पंतांनीं येथे फार मार्मिकपणा दाखवून सर्व स्त्रियांच्या विवाहाच्या कथा त्यांच्या तोंडून अति विस्तारानें वदविल्या आहेत. त्यांतल्यात्यांत रुक्मिणीची विवाहकथा तिच्या तोंडून ९१ आर्यांत वदविली असून ती अत्यंत बहारीची वठली आहे. बायकांच्या तोंडी शोभेल अशी भाषा लिहिण्यांत व बायकांचे मनोविकार त्यांच्याच तोंडून अकृत्रिम रीतीनें वदविण्यात पंत फार कुशल होते. त्याप्रमाणें ही रुक्मिणीविवाहकथा सर्वत्र स्त्रियांच्या बोलीनें सजविलेली व स्त्रियांना पटतील अशा उद्गारांनीं भरलेली असल्यामुळें हिला एक प्रकारचें स्वभावसहज माधुर्य प्राप्त झालें आहे."

२ हारि—मनोहर. ३ स्तन्य—दूध. ४ परिहार—निवारण. ५ दुखणी काय—दुमजलीच काय. धरा नखेंदु खणी—पदनखें धरा खणीत बसे. हें चिंतेचें लक्षण समजले जाते. ८ साधुभावांच्या—उत्तम स्वभावाचे जे भाऊ त्याचा किंवा चांगला अभिप्राय ज्यांच्या अशा लोकांचा. सत्त्वभावांच्या—सत्त्वशील लोकांच्या. ९ मणिगोटा—रत्नपाषाण. १० मोहरोगवैद्यातें—मोहरूपी रोगाच्या वैद्याला. ११ क्ष्वेड—विष. १३ हरिकीर्तिसुधाब्धिलब्धसंशुद्धि—हरीच्या यशरूप अमृतसागरांत स्नान केल्यानें शुद्ध झालेली. १५ लाखोटा—लखोटा. १७ ज्याचे संपूर्ण वेद निश्वास—वेद हे परमेश्वराचे निश्वास मानले आहेत. १८ सद्विप्र—चांगला ब्राह्मण. १९ शाल्वमगधपतिसख—शाल्व, जरासंध इत्यादि राजांचा मित्र. चैद्य—चेदि देशाचा राजा, शिशुपाल. तद्बलजलनिधींत—त्याच्या सेनासागरांत. आधींत—मनोव्यथेंत. २० खळदर्पघ्न—दुष्टांचा दर्प मारणारा. २१ हरिद्रा—हळद. शुष्कोपचरण—कोरडे बाह्य उपचार. २२ असुखशैल—दुःखाचा पर्वत. होय सखींत...तैल—माझ्या भाषणानें माझ्या मैत्रिणी रडूं

लागल्या, पण त्यांच्या अश्रुपातास तें तेल हें बाह्यकारण झालें; खरें कारण माझी दुःस्थिति हेंच होय. २३ पुरेक्षणच्छद्में–नगर पाहण्याच्या मिषानें. हरिदिङ्मुखा–कृष्ण येण्याच्या मार्गाकडे, पूर्वकडे. २४ मित्र–सूर्य. २५ अन्वर्थनामधेय–' मित्र ' या यथार्थ नांवाचा. २६ यष्टी–आधाराची काठी. आधिभारभग्नासि–दुःखाच्या भारानें खचलेल्याला. ३३ नेत्रभुजोरुस्फुरणें–नेत्र, बाहु व मांड्या यांचें स्फुरण. माज–कंबर. ३६ स्वस्तुत्यादर...अस्तु–वसुदेवाला स्तुतीची आवड नाही असें समजून माझें मन त्याची स्तुति करण्यास प्रवृत्त झालें नाही, हा भाव. ३८ पादोपासककामापूर्त्यर्थस्थिति–चरणसेवा करणाऱ्यांच्या मनोरथाची पूर्ति करण्यासाठी. उत्तमश्लोक–पुण्यश्लोक. ४० प्रभुवाक्य...तें–तें कृष्णाचें वाक्य कृष्णाची दया पुष्कळ होती असें सुचवी. ४३ पर्जन्यप्रियसखशिखिसुख–ढग पाहून मोराला ज्याप्रमाणें सुख होतें त्याप्रमाणें सुख. ४४ हरिपदनीररुहावितान–हरीचें पदकमलरूप आच्छादन. ४९ दंशित–कवचधारी. ५० श्रीशिवेच्चिया–देवीच्या. ५४ फलितं सर्वम्–'फलेन फलितं सर्व' या पूजामंत्राचें श्रवण. ५५ तत्प्रसादाशी–त्यांचा प्रसादासहित आशीर्वाद. भटमीनमंडळा–योद्धे हेच मत्स्य, त्यांच्या समुदायास. दाशी–कोळीण. ६० दावा–वैर. ६३ वाल–केस. महाभागा–मोठ्या उत्सवास. ६४ वायसाराती–घुबड. ६६ सुमनोमाळा–पुष्पमाला किंवा उत्तम मनोरूप माला. ६८ हरिनीलनिभवरांकीं–इंद्रनीलमण्यासारख्या कांतीच्या कृष्णाच्या मांडीवर. चपळे–विजेला. ७१ सोपानें वीरशिरें केलीं की–वीरांचीं शिरें पायऱ्या केल्या म्हणजे वीराच्या शिरावर पाय दिले. ७३ धुतरें–धोतरें.

## ३९. कर्णाचा अनुनय

### ( मोरोपंत–आर्याभारत )

मोरोपंताच्या आर्याभारतांतील उद्योगपर्वाच्या दहाव्या अध्यायांतून प्रस्तुत उतारा घेतलेला आहे. श्रीकृष्णानें भारतीय युद्ध टळावें म्हणून पांडवातर्फे कौरवांकडे केलेली शिष्टाई दुर्योधनाच्या हट्टवादीपणानें विफल होते. श्रीकृष्ण परत जाताना कर्णाला कांहीं अंतरापर्यंत आपल्या रथांतून बरोबर नेतो. कर्णाला त्याचें जन्मरहस्य सांगून त्यानें पांडवांना येऊन मिळावें म्हणून त्याचें मन वळविण्याचा तो प्रयत्न करतो. दुर्योधनानें आपल्यावर केलेले उपकार व

बालपणापासून ज्यांनीं आपलें लालनपालन केलें त्या मानलेल्या माता-पितरांचें आपल्यावरील प्रेम स्मरून कर्ण तसें करण्याचें नाकारतो, अशी कथा आहे. त्यापैकीं श्रीकृष्णानें कर्णाचें मन वळविण्याकरितां केलेला प्रयत्न व कर्णाचें त्यास उत्तर हा भाग या उताऱ्यांत आलेला आहे. कर्णाचें अत्यंत धीरोदात्त असें स्वरूप यांत दृष्टीस पडतें. त्याचा स्वाभिमान, बाणेदारपणा, मित्रप्रेम, उपकारकर्त्याविषयीं निष्ठा व कुंतीनें बालपणींच त्याग केल्यामुळें त्याच्यावर झालेला घोर अन्याय या गोष्टी विचारांत घेतल्या म्हणजे, त्यानें असत्पक्ष घेतल्याबद्दल त्याचा राग न येतां त्याच्याविषयीं आदर, करुणा व सहानुभूति याच भावना मनांत निर्माण होतात. कर्णचरित्राची ही करुणोदात्त बाजू रवीन्द्रनाथ टागोरांनीं आपल्या ' कर्ण व कुंती काव्यांत आणली आहे. मोरोपंतांनाहि ती अगम्य नव्हती हें हा उतारा निश्चित दर्शवितो.

१ कानीन–कन्यापुत्र (कुमारीदशेंत झालेला पुत्र). त्वद्वदनोत्थ–तुझ्या मुखांतून निघालेला. अर्थिजनांच्या–याचकांच्या. न–नकार. २ वदान्य–दाता. विश्रुत–प्रख्यात. शुद्धविप्रजनदास–चांगल्या ब्राह्मणांचा भक्त. वनदाम–मेघास. ३ अजातारी–अजातशत्रु, धर्मराज. अग्राल्या–बंधूवांचून दुसऱ्याला. धर्मवायु–स्वधर्मरूप वायु. ४ सानुजसुत–धाकटे बंधु व पुत्र यांसह. सच्चित्त–साधूचें चित्त. गुर्वनादर–गुरूचा अनादर. तोयानादर–पाण्याचा अनादर. ५ भूमिप–राजे. दरानें–भयानें. भूमि–पृथ्वी, लाक्षणिक अर्थानें सर्व लोक. घेइल तव तांबूल–लोक तुझ्या तोंडांतून पडणारा विड्याचा चोथा देखील पदरानें झेलतील--म्हणजे तुझा शब्द देखील खालीं पडूं देणार नाहींत. ६ यांचा–कौरवांचा. सितच्छदा सुखगा–पांढऱ्या पक्षाच्या हंसास. ७ भटकरगें लोहें–वीरांच्या हातांतल्या लोखंडानें म्हणजे शस्त्रानें. स्पर्शमणीची–परिसाची. ८ राधाहस्ती–कर्णाचें पालन करणारा सारथि जो अधिरथ त्याची पत्नी राधा हिच्या हातीं. ९ परिहृतसर्वनतराधे–सकल शरणागत जनाची काळजी ज्यानें दूर केली आहे, अशा कृष्णा. सुतशोकवतन–पुत्रशोक हेंच वतन. १० नरकाविच्या–नरपंडिताच्या. ११ विवाहावधि–विवाहापर्यंतचें. यथोक्त–यथाविधि. निर्मळपणें–शुभ्रपणें. रक्तपटांतून–तांबड्या वस्त्रांतून. सूतानें–पांढऱ्या सुतानें, पक्षीं सूतपुत्र कर्णानें. १२ समरमखाचें–युद्धयज्ञच. कल्पनगदानीं–कल्पवृक्षाच्या दानानें. १३ तूळ–कापूस. अंबार्पित–आईनें

दिलेला. अतिरुग्णासि–अतिशय आजारी माणसास. १४ अवसानीं–अंतीं, शेवटीं. १५ त्या–सुप्रसिद्ध अशा. १७ ऊत–कढ. १९ क्षत्र–क्षत्रिय-समुदाय. काळरुद्रदृष्टिसि–काळ जो रुद्र त्याच्या दृष्टीला. २० स्वाश्रितप्रतिज्ञा–आपल्या आश्रितांच्या प्रतिज्ञा. सत्यागा सतीच्या म्हणजे द्रौपदीच्या अपराधा. २२ वासवा–इंद्राला. रणाजिर–रणांगण. हरिलंघन-सिंहाची अमर्यादा. बलिगजसहवास–बलशाली हत्तींचा सहवास. २३ रणदानें–युद्धरूपी दानानें. स्वरगें–कल्पवृक्षानें. २४ सम–सारखें. २५ तथाविध–तशी. नदानें–नदीनें. २७ भव्यहेतु–हितहेतु. लावे–खेळ. २८ दाता–दानशील कर्ण. उष्ट्र्यानीं–उंटाच्या वाहनावर. दक्षिणदिशेस–'अगस्त्यशास्ता दिशेला' असें मूळांत आहे. दक्षिण दिशा ही यमाची दिशा होय. २९ रक्तोष्णीतधर–तांबडें पागोटें धारण करणारे. सुश्वेतोष्णीपधर–पांढरें पागोटें धारण करणारे. मलयजरजोधवलगात्र–चंदनरजाप्रमाणें शुभ्र देह असणारे. ३० शुभ्रसहस्रस्तंभप्रासादीं–हजार पांढरे खांब असलेल्या वाड्यांत. माल्याला–पुष्पाला. दत्तोडुपभ्रमा–चंद्राच्या शुभ्र-कांतीचा भ्रम उत्पन्न करणाऱ्याला. ३२ सुपदेश–चांगल्या राज्याचे स्वामी. हितहि–हितकरहि. ३३ पद–पाय. ३४ सुचिर–पुष्कळ वेळ. मुग्धासहि–मूर्खालाहि. जडितकनकमरकतनग–जडाव सोनें व पाचू यांचा दागिना. ३५ मंत्र–गुप्तविचार. पर–परका, शत्रु.

## ४०. नामदेव

(नामदेवाचा गाथा)

नामदेवाचा जन्म शके ११९२ चा म्हणजे ते ज्ञानेश्वरांचे समकालीन. ज्ञानेश्वरांबरोबर त्यांनी तीर्थयात्रा केली. ते ज्ञानेश्वरांनीं स्थापिलेल्या वारकरी पंथाचे थोर प्रचारक. विसोबा खेचरांकडून ज्ञानेश्वरांच्या सांगण्यावरून त्यांस उपदेश झाला. पंजाबांत त्यांनीं सुमारें वीस वर्षें प्रचारकार्य केलें. शीखांच्या ग्रंथसाहेबांत त्यांचे अभंग आहेत. त्यांची हिंदी रचनाहि आहे. त्यांनीं शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा केली होती. त्यांच्या काव्याचे विशेष कल्पनेची बहार, भावनेची खोली, साधी सोपी भाषा हे आहेत. शके १२७२ त त्यांनीं पंढरपुरीं देह ठेविला.

१–१ बहाती–हांक मारतात. २–४ तोडर–तोरड्या. पीत–पिवळा. दिवाकर–सूर्य. २–५ मुद्रिका–अंगठ्या. इंदुकर-चंद्रकिरण. २–७ कोटीशारे–

अनंतकोटिब्रह्मांडनायका. ३-८ निक्षेप-ठेव. निधान-ठेव ठेवण्याच ठिकाण. ३-११ वेगळीक-वेगळेपणा. ३-१२ घडिये-घडोघडी. ३-१४ चारी मुक्ति-समीपता, सलोकता, सरूपता, सायुज्यता. ३-१९ नवजावा-जाऊं नये ४-४ खोपी-झोंपडी, खोंपट. ७-५ हेमी-सोन्याचे. १०-३ घनवट-घनदाट. १३-४ सानुळी-सुतळी. १४-२ खेवां-भानगडींत. (खेंव-अक्षरशः, आलिंगन). १९-६ अंभ-पाणी. १९-९ कुरंगिणी-हरिणी. अंडज-पांखरूं. २०-१ जाणीव शहाणीव-ज्ञान व पांडित्य. २०-३ पिसें-वेड. २२-९ पडिभर-आसक्ति. २३-२ वास-वाट. २४-१ वैराकार-वैर २७-४ झेंगट-वाद्यविशेष. २९-१० तरळली-विरलेली. ३०-२ भोजें-आवडीनें.

## ४१. जनाबाई

( नामदेवाचा गाथा )

जनाबाई नामदेवांच्या चौदा माणसांच्या कुटुंबांतील एक. गोदाकाठीं गंगाखेड येथें दमा नांवाचा भगवद्भक्त होता. त्याच्या स्त्रीचें नांव करुंड. यांची मुलगी जनाबाई. ही नामदेवांच्या घरीं (पोरकी झाल्यावर) दळणकांडण करणारी सामान्य दासी होती. ज्ञानेश्वर-नामदेवांची कोमल रसाळवाणी तिच्या अभंगांत दिसून येतेच. स्वतःची अंतरंग-गोडीहि त्यांत आहे. त्यांत स्त्रीचें अंतःकरण, भाषा व विचार प्रतिबिंबित झाले आहेत. सगुणप्रीति व योगानुभव, भक्तीची माधुरी व योगाची खोली, सरळ सोपी व प्रासादिक भाषा हे तिचे विशेष आहेत.

१-१ इंगळाची खाइ-विस्तवानें भरलेली खांच. २-२ कलगी-तुरा. २-५ मैलगिरी-मलयपर्वत. ४-४ भंडाराची झोळी-खंडोबाचा भंडार असलेली. ८-३ पाल घालणें-व्यभिचार करणें. ८-४ येसवा-स्वैरिणी. ९- यांत नाद-वर्णात्मक साक्षात्काराचें वर्णन आहे. २०-१ याती-जात. २०-३ यातिहीन-हीनजातीचा.

## ४२. तुकाराम

( गाथा )

ज्ञानेश्वरांनीं उभारलेल्या वारकरीपंथरूप देवालयाचे कळस. कै. पांगारकरांनीं त्यांचा जन्मकाल शके १५३० मानला आहे तर श्री. भारदे यांनीं

शके १५२० असा मानला आहे. त्यांचा प्रयाणकाल कोणी शके १५७१, तर कोणी शके १५७२ असा मानतात. नामदेवांच्या शतकोटी अभंगांचा अपुरा संकल्प ५ कोटी ५१ लक्ष अभंगांची भर घालून त्यांनीं पुरा केला असें महिपतीबुवा सांगतात. गाथ्यांत सुमारे ५००० च अभंग सांपडतात. ‘मन्त्रगीता’ ही त्यांनीं लिहिली असें सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री. बेंद्रे मानतात. तुकारामांनी आपल्या अभंगांत पांडुरंगास हजार प्रकारांनीं आळविलें आहे. त्यांच्या साध्या सोप्या शब्दांत अर्थांचे डोंगर आहेत, भावनेच्या नद्या आहेत, जीवनाचा सखोल अनुभव आहे, तसाच ईशसाक्षात्काराचाहि आहे. सामाजिक जीवनांतील ढोंगावरहि त्यांनी कोरडे ओढले आहेत. त्यांचें काव्य म्हणजे आत्माविष्कार, धर्मोपदेश व तत्त्वज्ञान यांचें रसायनच आहे.

१–१ वेवसाव–व्यवसाय. देवकुळपूज्य–कुळांत देवाची पूजा होत होती. १–५ तुटी–तोटा. ६–३ अगरी–अग्रें. ९–३ मारग–मार्ग. ११–१ नवजतां–न जातां. १६–१ अणुरणीयां–अणोरणीयान, अणूहून लहान. थोकडा–लहान. १६–३ त्रिपुटी–भोक्ता, विषय व त्याची जाणीव; घटीं–देहांत. १७–१ घोटवीन इ०–ब्रह्मज्ञान्यांस लाळ घोटावयास लावीन, त्यांना मुद्धां हेवा वाटेल. सांडवीन–सोडावयास लावीन. १७–४ तपोनिधा–तपस्व्यांना. १८–३ गभस्ति–सूर्य २०–५ चाहूर–१२० बिघे जमीन. २०–९ घटा पटा–न्याय व वेदान्तशास्त्रांत घट व पट यांचे दृष्टान्त वारंवार येतात त्यास उद्देशून. २०–१० जाळीत भणदी–विस्तव घालून डोक्यावर घेतलेलें खापर २५–२ धरिली धरणी–पृथ्वीचें धारण करणारा २८–३ धांवी–धांवत. ३०–३ नको गुंपों–गुंतूं नको. ३१–२ वैष्णवांचा इ०–विष्णुभक्तांचा व्यवहार रोखठोक असतो. ३५ महानुभावांस उद्देशून. ३६–५ सांकडें–संकट. ३७–३ अनुताप–पश्चात्ताप, दुःख. ३९–३ ज्ञानाचे इ० पढीक ब्राह्मण ज्यांना खरें ज्ञान झालें नाहीं. ४०–१ अर्भक–मूल. ४०–३ चाली–चालीनें. ४२–१ केशिराजा–देवा. ४२–५ ओंकार–ॐ हें अक्षर हें एक उपास्य आहे. ४३–२ सुकृत–पुण्य. निजध्यासन–निदिध्यास. ४४–२ आभार–भार, जबाबदारी. ५०–८ आन–अन्य. ५१ आवा–स्त्री, आई. ५१–४ कलवड्ड--गोवऱ्यांचा ढीग. ५१--९ निकें--चांगलें, ठीक. ५१–११ विवंची--विचार करी. ५२–२ मोट--गांठोडें. ५२--५ मात--गोष्ट. ५४--२ नीत–नीति.

## ४३. आरती

निवृत्तिनाथांची ही आरती असावी. तींत ईशसाक्षात्काराच्या अनुभवाचें वर्णन आरतीच्या रूपकाबरोबर उत्कटत्वानें आलें आहे. निवृत्तिनाथ ज्ञानेश्वरांचे वडील बंधु. त्यांची 'निवृत्तेश्वरी' नांवाची गीताटीका नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. विद्वानांनी अजून ती खरोखरी त्यांचीच असा निश्शंक अभिप्राय प्रकट केला नाहीं.

१ त्रिकुटावरि नांदे—इडा, पिंगळा, सुषुम्ना या तिघींचा समुदाय, ऐक्य. २ राउळ—देऊळ. ३ नातुडे—न आकलणें, न सांपडणें.

## ४४. नामदेवाचा बोबडा

हें रूपक नामदेवांचें आहे. इंद्रियरूपी गाई गुराख्याला म्हणजे देहाला सांभाळवत नाहींत. कृष्णार्पणबुद्धीनें वागल्यास देवच स्वस्थ वृत्ति निर्माण करतो म्हणजे इंद्रियांच्या गाई राखतो.

## ४५. कानोबा

एकनाथांचें रूपक. ब्रह्ममाया यांच्यापासून सांख्यांचीं २५ तत्त्वें निर्माण झालीं हा रूपकाचा आधार.

२ ढालगज—बेछूट, उलाढाली.

## ४६. पांखरूं

सर्वव्यापक निर्गुण ब्रह्म हें पांखरूं. त्याचें सगुण स्वरूप कृष्ण परमात्मा हेंहि नाथांचेंच रूपक आहे.

## ४७. भूपाळी

(मुक्तेश्वर—स्फुटकाव्य)

मुक्तेश्वराच्या स्फुटकाव्यांत ही भूपाळी प्रसिद्ध आहे. तिला गोपाळ असें नांव मिळालेलें दिसतें. ही सबंध भूपाळी हें एक रूपक आहे. जीवात्म्यास राखणारा गुराखी असा गोपाळावर आरोप करून रूपक साधलें आहे.

ध्रु. गोपाळा—इंद्रियचालका. स्वरूपलोचन—स्वरूप हेच डोळे. १ सुरंगसम—लाऊसर. २ लोपलिया—लुप्त झाल्यावर. लिंगदेह—सूक्ष्म देह, वासनात्मक शरीर. आपसया—एकदम. मिनली—मिळाली, मिसळली. ३ उलूक—घुबड. विकल्प—संशय. साहीचोरी—सहा पाड्रिपूंनीं.

## ४८. श्रीवनभुवनीं

( रामदास–स्फुटकाव्य )

रामदासांच्या स्फुटप्रकरणांपैकीं अत्यंत प्रसिद्ध व कांहींसें वादग्रस्त असें हें काव्य आहे. त्याचा निश्चित अर्थ काय यासंबंधीं मतभेद आहेत. महाराष्ट्र-सारस्वतकारांना " महाराष्ट्रांत पसरलेला दुःखाचा वणवा विझून गेल्यावर " तो कसा दिसेल याचें हें काल्पनिक चित्र आहे असें वाटतें. ( महाराष्ट्र-सारस्वत भाग २रा पृ.२५-२६.) पांगारकर म्हणतात, "शिवरायाच्या राज्याभिषेकानंतर महाराष्ट्र सुखसंपन्न झाला त्याचें गोड वर्णन आहे...दुःस्थिति संपून सुखाचे दिवस आल्यानंतरचा पूर्ण संतोष त्यांत व्यक्त झाला आहे." हें महाराष्ट्राचें राष्ट्रगीत आहे, असें ते मानतात. (मराठी वाङ्मयाचा इतिहास रामदास खंड, पृ. ६४० ) श्री. शंकरराव देवांनी मात्र आपल्या ' श्रीसमर्थचरित्र ' या पुस्तकाच्या दुसऱ्या खंडांत " आनंदभुवन म्हणजे खरोखर वाराणसी व या प्रकरणात वाराणसीचाच उल्लेख आहे, पण लौकिकांत मात्र हे वर्णन महाराष्ट्राचें आहे असा समज झाला आहे " असें म्हटलें आहे. त्यांच्या मतें हनुमंत स्वामींच्या बखरीत तसा उल्लेख आहे व रामदासांच्या विशिष्ट मनोवृत्तीमुळें " काशीच्या विद्यापीठाचें वर्णन जरी ते करीत होते, तरी त्यांच्या मनश्चक्षूपुढून महाराष्ट्र ढळलेला नव्हता. " या दोन कारणांमुळें हा समज लोकांत पसरला व दृढ झाला. अलीकडे श्री. ज. स. करंदीकरांनीं पुन्हा आनंदवनभूवन म्हणजे महाराष्ट्रच व या प्रकरणांत रामदासांनीं महाराष्ट्राचें उज्ज्वल भविष्य कथन केलें आहे असा पक्ष जोरानें मांडला आहे. यापैकीं कोणताहि पर्याय स्वीकारला तरी या प्रकरणाचा संपूर्ण अर्थ लागायला अडचणच पडते. व " प्रकरण आकर्षक आहे पण तसेंच तें गूढहि आहे " या श्री. देवांच्या निष्कर्षाला वाचक येऊन पोहोंचतो.

२ वीतरागें—विरक्तान. ४ येकाकी—एकटेच. ५ देहत्यागासी येणें हो—

देह ठेवण्याप्रीत्यर्थ तरी एकदां आनंदवनास जाऊं दे. ७ स्वप्नीं जें देखिलें— श्रीसमर्थांना स्वप्नामध्यें दृष्टान्त होत असत. ८ कल्लोल—आपत्तीचे कल्लोळ. विघ्नघ्ना—गणपतीस. ९ स्वधर्माआड...तें—स्वधर्मास प्रतिरोध करण्याकरितां जेवढीं म्हणून विघ्नें येणें शक्य होतें तीं तीं सर्व उद्भविलीं होतीं, परंतु तीं देवानें मारून, झाडून लुटलीं, हाकून लाविलीं, तर कित्येक कापून टाकलीं. १० भीम—हनुमान. ११ खेतल—बोभाटा, हाहाकार. १२ कळेना काय रे होते—हें सर्व कोण करते व काय होतें हें कोणासच कळेना. १३ स्वर्गीची लोटली...आनंदवनभूवनीं—या ओळींचा निश्चित अर्थ कळत नाहीं. १७ आक्रा आक्रा...कळेचिना—याहि गूढ ओळी आहेत. १८ बंदविमोचनें— पारतंत्र्यविमोचनार्थ.

## ४९. करुणाष्टकें

(रामदास—स्फुटकाव्यें)

श्रीसमर्थांनीं रचलेल्या शहात्तर श्लोकांस करुणाष्टकें हें नांव मिळालेलें आहे. या शहात्तर श्लोकांचे एकंदरींत आठ गट दिसतात. सर्वांतील श्लोकसंख्या मात्र सारखी नाहीं. पहिल्या गटांत पंधरा, दुसऱ्या गटांत आठ, तिसऱ्यांत सहा, चौथ्यांत नऊ, पांचव्यांत तेरा, सहाव्यांत व आठव्यांत दहा आणि सातव्यांत पांच याप्रमाणें श्लोकसंख्या आहे. श्री. शं. श्री. देव मात्र इतरहि कांही प्रकरणांचा करुणाष्टकांतच समावेश करतात असें दिसतें. (पहा : श्री-समर्थचरित्र द्वितीय खंड प्रकरण ४ भाग २ करुणाष्टकें वगैरे.)

या श्लोकाना हें नांव केव्हां मिळालें हें निश्चित सांगतां येत नाहीं. तें स्वतः श्रीरामदासांनीं दिलेलें नसावें. निरनिराळ्या कवींनी व रामदास-शिष्यांनीं लिहिलेल्या त्यांच्या चरित्रांतहि या नांवाचा उल्लेख नाहीं. या श्लोकांच्या नांवासंबंधीं श्री. देव म्हणतात, "करुणाष्टकें म्हणजे करुणाघन परमेश्वरास, आपल्या इष्ट उपास्य दैवतास, दीनदयाळ सद्गुरूस परोपरीनें प्रेमभरानें आळविणारी कविता. आपल्या अवगुणांची आठवण होऊन अनुतापयुक्त जे छंदोबद्ध उद्गार मुखावाटे बाहेर पडतात, तीं करुणाष्टकें होत. ज्या कवितेंत पश्चात्ताप आहे, संसाराची असारता आहे, विवेकयुक्त वैराग्य आहे, मोक्षाची अपेक्षा आहे, सद्गुरूचा धांवा आहे, तिला करुणाष्टक म्हणावें." (रामदास आणि रामदासी भाग १० वा, प्रस्तावना, पृ. १)

१ अनुदिनीं—दररोज. २ अनुतापें—पश्चात्तापानें. ३ वोखटें—वाईट. दुरित—पातक. स्वस्वरूपीं भरावें—आपणाशीं एकरूप करावें. ४ प्रचलित—चंचल. ७ पंचाननारे—सिंहा. ८ अवचट—अद्‌भुत. १० विषमकाळीं—कठीणकाळीं. वमन—वांती, ओकारी. १२ भवाचें—संसाराचें. १३ देहबुद्धि—देहावरील आसक्ति. १५ भुमिधरानिगमांसी—शेषास व वेदांना.

## ५०. मनास बोध

( वामन—स्फुटकाव्यें )

हे श्लोक रचणारा वामन व यथार्थदीपिका व इतर कृष्णविषयक आख्यानें उपाख्यानें लिहिणारा वामन ह्या भिन्न व्यक्ति असाव्यात असें विद्वानांचें निदान आहे. ( पहा:-- १ प्राचीन मराठी कविपंचक—द. सी. पंगु. २ महाराष्ट्र सारस्वत भाग २ रा. वि. ल. भावे ) ‘ मनास बोध ’ या प्रकरणांतील श्लोकांवर रामदासांच्या मनाच्या श्लोकांची छाप पडलेली स्पष्ट दिसते. याचा कर्ता रामदासांच्या शिष्यमंडळांतला कुणी वामनस्वामी असावा असा तर्क आहे.

३ नासे—नासून टाकतो. अंधकूपा—तृण इत्यादींनीं झाकलेल्या विहिरीस. ५ पराशा—दुसऱ्याची आशा. ६ भ्रांतिओझें—मिथ्या ज्ञानाचें ओझें.

## ५१. उमारमासंवाद

( आनंदतनय)

आनंदतनयाच्या ‘ उमारमासंवाद ’ या स्फुट—काव्यानें रामजोश्यांच्या ‘ लक्ष्मी--पार्वती--संवाद ’ या कवितेची आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं. कदाचित पहिलीवरूनच दुसरी सुचलेली असावी. हरिदासांना उपयोगी पडणारा, आबालवृद्धांना समजणारा विनोद दोन्ही कवितांत आहे. एकमेकांला हंसत हंसत छद्मी रीतीनें वर्मी लागणाऱ्या बोलण्याचा स्त्रीस्वभाव, दोन्ही कवितांत कौशल्यानें व्यक्त केला आहे. शब्दांची ओढाताण करणें व तज्जन्य अशुद्ध भाषेचा उपयोग करणें हा आनंदतनयाच्या रचनेंतील ठळक दोष या छोट्या काव्यांतहि आढळून येतो.

१ हर्ता–हरल्यावर. २ भिक्षुक–याचक. ( शंकर ) ३ जिणोनि–जिंकून नृपतिचा–श्रियाळ राजाचा. सत्पुत्र–चिलया. १२ चित्कळा–चित्‌शक्तीच्या कळा. १३ भावार्थे–साररूपानें.

## ५२. अमृतरायाचीं पदें

अमृतरायाचीं पदें कीर्तनकारांचा अत्यंत आवडता ठेवा आहे. त्या पदांत अद्वैतानुभव, लौकिक व्यवहाराचें अवलोकन, व विरक्ततेचा भाव प्रधना असून तीं रसाळ व सुगम आहेत. कटावांच्या शब्दार्थनादाच्या चमत्कारांपेक्षां यांत हृदयाच्या भाषेला जास्त अवकाश मिळाला आहे.

१–३ खंबाळें–खंबायती वस्त्र, उंची वस्त्र. २ घाटा–शिजवलेल्या कण्या. २–२ अतीत–अतिथि. ३–२ मैलागिरी–मलयगिरि. सुवासा–सुवास असलेला. ३–३ पालडिता–वेगळी करतां. ४–१ सगरशेल्याचे–अंग व कांठ यांत निराळी रेघ असलेला शेला. रुजामें–जमिनीवर अंथरण्याची बैठक. ४–२ रांधणें–स्वयंपाक करणें, शिजविणें. बेंबीचें उखळ होणें–शरीर पुष्ट होणें. ५–१ सोपे–ओसऱ्या. विवरीं– गुहेंत. कंथा–जोग्याचे झोळीवजा उत्तरीय वस्त्र, गोधडी.

## ५३. केकावलि

( मोरोपंत–केकावलि )

'केकावलि' हें मोरोपंतांच्या काव्यांतील अत्यंत प्रसिद्ध, अत्यंत लोकप्रिय व अति उत्कृष्ट काव्य समजलें जातें. तें जवळजवळ त्यांचें शेवटलें काव्य आहे. शके १७१२ त काशीयात्रेहून बारामतीस परत आल्यानंतर त्यांनीं तें रचलें असावें असा पांगारकरांचा कयास आहे. या काव्यांत पंतांनीं देवाशीं फाजील सलगी केली आहे असा न्यायमूर्ति रानड्यांनीं आक्षेप घेतल्यामुळें व विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं त्याचें आवेशानें खंडन केल्यामुळें त्याची मूळची लोकप्रियता अधिकच वाढली. 'केका' म्हणजे मोराचें ओरडणें. आपलें मयूराशीं अथवा मोराशीं साम्य कल्पून पंतांनीं दयाघन परमेश्वराला उद्देशून केलेल्या प्रार्थनेला 'केकावलि' हें अन्वर्थक नांव दिलें आहे. हें काव्य त्याच्या परिणत काव्यशक्तीचें द्योतक असून, भाषाप्रौढि, अर्थगौरव, साधेपणा व

प्रसाद हे त्याचे विशेष आहेत, असें पांगारकर म्हणतात. यापैकीं साधेपणाबद्दल दुमत होऊं शकेल परंतु समासप्रचुर असूनहि सहज प्रतीत होईल अशा भक्तिरसानें पूर्ण असें हें काव्य आहे, यांत संशय नाहीं. तें एक उत्कृष्ट ध्वनि-काव्य आहे असें म्हटलें जातें. पंताच्या आर्याकेकावलीशीं या पृथ्वीवृत्तांतील काव्याची तुलना करून कोणतें वृत्त विषयाला अधिक अनुरूप ठरेल याचा विचार करून पाहण्यासारखा आहे.

१ सदाश्रितपदा–साधुसंतांनीं ज्याचे पाय सेविले आहेत अशा परमेश्वरा. सदाशिवमनोविनोदास्पदा–शंकराला ज्याच्या ठायीं शांति लाभते अशा. कलिमलांतका–दुर्बुद्धिरूपी मलाचा नाश करणारा. कामदा–इच्छित फल देणाऱ्या. वदान्यजनसद्गुरो–उदारजनांच्या श्रेष्ठ आचार्यच असलेल्या. प्रशमिता-मितासन्मदा–असंख्य दुष्टांचें गर्वहरण करणाऱ्या. गदारिदरनंदकांबुजधरा–गदा, चक्र, शंख, तरवार, कमळें धारण करणाऱ्या. २ पदाब्जरज–चरणकमलाचे कण. सकलपावनाधार–गंगादि पावन करणाऱ्या तीर्थक्षेत्रांचा आधार. अघाचलहि–पापाचे पर्वतहि. गति–मुक्ति, मोक्षपद. इंगळा–अग्नीस. ३ शोधिले–शुद्ध केले, निष्पाप केले. अघनिधी–पापसागर. ४ सर्वसाक्षी–सर्व पाहणारा. सुरभी–कामधेनु. ५ व्रजावन–गोकुळाचें संरक्षण. सलील–लीलेनें. मंदराख्यहि–मंदर नांवाचाहि. रदाग्रें–दांताच्या टोकानें. सुदुर्धर–उद्धार करावयास कठिण. ६ नतावनतधृतव्रता–नम्रांचें रक्षण करण्याचें व्रत ज्यानें घेतलें आहे अशा. ज्वलन–वणवा. बाधावनीं–दुःखरूपी अरण्यांत. पदप्रणत-संकटीं–चरणीं शरण आलेल्यांच्या दुःखप्रसंगीं. प्रजव–अत्यंत वेगवान्. वारणीं–नक्रानें गजेंद्राचा पाय धरला असतां, गजेंद्रानें विष्णूचा धावा केला व विष्णूनें नक्राला मारून गजेंद्राला सोडविलें. या प्रसिद्ध कथेस अनुलक्षून सतीव्यसनवारणीं–द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं. जयजयार्थ–अर्जुनाच्या विजयासाठीं. ७ असदुक्ति–खोटें भाषण, मिथ्या आरोप. रविसखोत्थिता आळशी–सत्राजितानें कृष्णावर घेतलेल्या आळाप्रमाणें. तर्पिलें–तृप्त केलें, संतोषविलें. वदान्य–उदारदाता. ८ प्रणतवत्सला–शरणागतास कनवाळू असलेल्या. ९ भवचरणकन्यका आपगा–तुमच्या चरणापासून उत्पन्न झालेली नदी. गंगेचा उगम विष्णूच्या पायापासून आहे असें मानतात. १० किणें–घट्ट्यांनीं. भवत्पदाब्जाविणें–आपल्या चरणकमलाविना अन्य. ११ पटुत्व–चापल्य.

१२ वरद–वर देणारा. व्यंग–उणी. अलंकृतिमती–दागिन्यांनीं नटलेली. १४ निजप्रियजनांकडे–आपल्या आवडत्या साधुसंताकडे. १५ निपट–अगदीं, पक्का. धृष्ट–उद्धट, दांडगा. भाविकाला–भोळ्या भक्ताला. नयच्युतदमार्थे–नीतिमर्यादेपासून ढळलेल्यांच्या नियंत्रणाकरितां. १६ कोटिगा–कोडगा. अजांडशतकोटि–शेंकडों कोटिब्रह्मांडें, अखिल विश्व. दवा–वणवा, दावाग्नि. १७ प्रणतमंतु–शरणागतांचे अपराध. वितृष्ण–तहानभूक शांत झालेले असे. श्रितां–आश्रितांना. दयासन्नद्या–दयेचे पवित्र प्रवाह. १८ लीलालसें–मौजेनें. त्रिजगदब्जकीलालसें–त्रिभुवनरूपी कमलास पाणी असे. स्वकव्यसन–आपल्या आश्रितांचें संकट. १९ दयाब्द–दयेचा ढग. अनन्यगतिका–तुझ्यावांचून अन्यत्र थारा नाहीं अशा. करुणार्णवा–करुणेच्या सागरा.

## ५४. संशयरत्नमाला

( मोरोपंत—स्फुटकाव्य )

'संशयरत्नमाला' हें मोरोपंतांचें एक चमत्कृतिपूर्ण व भक्तिरसप्रधान स्फुटकाव्य आहे. त्यांत आपणांस परमेश्वर लवकर कां प्रसन्न होत नाहीं याबद्दल त्यांनी अनेक मजेदार शंका घेतल्या आहेत व त्यांचें निराकरणहि स्वतःच केलें आहे. केकावलीप्रमाणें या काव्यांतहि देवाशीं विनोदपूर्ण अशी सलगी आहे. कल्पनाचमत्कृतीहि आहे. परंतु त्यामुळें त्यांतील गंभीर भक्तिभावाला यत्किंचितहि उणेपणा येत नाहीं.

१ सतीची–द्रौपदीची. असदर्क–पापाचा अर्क. २ दुःशीलग्रीष्मीं–वाईट शीलरूपी ग्रीष्मऋतूंत ४ पुराणपुरुषा–हे विष्णो ! ६ चरणसारसें–पदकमलें. ७ नामप्रतिनिधि–नाम हाच कोणी प्रतिनिधि. ८ शिंपिल...आज्य–दावाग्नींत तूप कोण ओतेल. ९ समर्थोऽहं–कर्तुम् करण्यास, न करण्यास अगर विपरीत करण्यासहि मी समर्थ आहे. दीनावनाविणें–दीनांच्या रक्षणाशिवाय. दयिता-दया, दयारूपी पत्नी अथवा प्रिया. १० भजदवनव्यसन–भक्तांचें रक्षण करण्याचें व्यसन. १३ श्रीभुजबंधांतुनि–लक्ष्मीच्या बाहुपाशांतून. १४ स्पर्शमणि–परीस. १५ भारतरणवृत्त तें मनीं आणा – 'न धरीं शस्त्र करीं मी' अशी श्रीकृष्णानें केलेली प्रतिज्ञा युद्धांत भीष्म अर्जुनाला आटोपेना म्हणून

कृष्णाला मोडावी लागली. या घटनेला उद्देशून हा टोमणा आहे. १७ जन्मशुचि–जन्मतः शुद्ध. स्वपदनीरजा–आपल्या पदकमलाला. २० प्राज्य–पुष्कळ. २२ अश्रद्धेय-अविश्वासार्ह. प्रभ्वंतर–अन्य प्रभु. २७ क्षुद्विकळा–भुकेनें विकल झालेल्यास. २८ वतन–इनाम जमीन. मंगलायतन–मांगल्याचें, कल्याणाचें धाम. ३० बाहे–बाहू.

—

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| २ | ७ | कैवाल्यनाथां | कैवल्यनाथां |
| ४ | ३ | वांब्रळैली | बांब्रळैली |
| ४ | ४ | पृथ्वीचेयां | पृथ्वीयेचां |
| ४ | ११ | आमोदी | आमोदीं |
| ४ | १२ | पेठेफुलसांतेचां | पेठे फुलसांतेचा |
| ६ | १६ | एके | एक |
| ६ | २८ | भलों | भलां |
| ७ | १ | चरणुं | चरण |
| ७ | १० | यां तें | यातें |
| ७ | १३ | सूदळें | सूदलें |
| ८ | १ | नलवी | न लवी |
| ८ | २ | अधिकांचि | अधिकचि |
| ८ | ४ | जालेआं | जालेया |
| ८ | ४ | करपतुसे | करपुतसे |
| ८ | १४ | तोहि | तोडि |
| ८ | १७ | विमंब्रणें | विसंवणें |
| ९ | ३ | कैवल्यबीजाचें | कैवल्य बीजाचें |
| ९ | ४ | परसुखाचें | परु सुखाचें |
| ९ | १८ | श्रीऋद्धिपुरे | श्रीऋद्धिपुरें |
| ११ | ७ | सिंधू पण | सिंधूपण |
| १२ | २ | परी | तरी |
| १२ | २ | भोगावें कीं | भोगावें कीं तें |
| १२ | ७ | सुखाडु | सुखाडू |
| १२ | १९ | द्रष्टेचि | द्रष्टेंचि |
| १३ | ३ | सैंध | सैंघ |
| १३ | १६ | सूर्यदृष्टी | सूर्यदृष्टी ? |
| १५ | ७ | अक्षरें भरलीं | अक्षरें भलीं |
| १६ | ८ | श्रांतुजी | श्रांतु जी |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १७ | २० | धोटीवें | धीटीवं |
| १९ | २४ | लवण कण | लवणकण |
| २६ | ११ | म्हणून | म्हणून |
| २८ | २ | मिरासी कर | मिरासीकर |
| ३२ | ३ | सात्यकी | सत्य कीं |
| ३२ | २१ | आपणां तेंचि | आपणांतेंचि |
| ३३ | ५ | नमस्कारोन | नमस्कारोनि |
| ३४ | १ | आपोंआप | आपेंआप |
| ३५ | ६ | बाहेरी | बोहरी |
| ३५ | २० | केले | केल्या |
| ३६ | २४ | पित्या देखतां | पित्यादेखतां |
| ४० | ५ | जें जें | जें तें |
| ४० | २१ | खळ दुर्जनासी | खळदुर्जनासी |
| ४१ | ११ | उद्धटासि उद्धट | उद्धटासि पाहिजे उद्धट |
| ४१ | २३ | हरिकथानिरूपण | हरिकथा निरूपण |
| ४२ | २२ | विवरीं | विवरी |
| ४३ | ६ | न बुडों द्यावें | न बुडों न द्यावें |
| ४३ | १० | हरिकथा निरूपण | हरिकथानिरूपण |
| ४४ | १३ | कीर्तीं | कीर्ति |
| ४८ | २० | धर्मयश श्रीमंता ! | धर्मयशश्रीमंता। |
| ४९ | ५ | कल्पतरू | कल्पतरु |
| ४९ | ६ | मेरू | मेरु |
| ५० | १२ | मंगलाचरण मिसें | मंगलाचरणमिसें |
| ५१ | २० | मुळासी | मूळासी |
| ५२ | १ | म्हैसासूर | हैसासूर |
| ५३ | शीर्षक | शिशुपालाचें भाषण | रुक्मीचें भाषण |
| ५३ | ६ | ठावा | ठाव |
| ५३ | ७ | क्वणे | क्वण |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ५५ | ४ | विदेही | ' विदेही ' |
| ५६ | २० | मोहिनी मुखा | मोहिनीमुखा |
| ५७ | ४ | सळंव्रपण | सलंग्रपण |
| ६१ | १ | होउना | होउनी |
| ६३ | २५ | गंतातीरीं | गंगातीरीं |
| ६४ | १२ | पाडे | पाडें |
| ६४ | २० | दुःखावर्ती | दुःखावर्ती |
| ६५ | ३ | नरें | नटें |
| ७८ | १ | दोघांसर पाड | दोघां सरपाड |
| ९४ | ५ | ध्यावयासि | घ्यावयासि |
| ९६ | ११ | शाल्यमगधपतिसख | शाल्वमगधपतिसख |
| ९७ | ११ | नेत्र भुजोरुस्फुरणें | नेत्रभुजोरुस्फुरणें |
| ९८ | २२ | घ्या | त्या |
| ९८ | २४ | स्वीकारून | स्वीकारूत |
| १०० | १७ | भूत्रिप | भूमिप |
| १०१ | ३ | माझे | माजे |
| १०१ | १० | करावें | करावें ? |
| १०१ | १० | नवसानीं ? | नवसानीं |
| १०१ | ११ | त्या ? | त्या |
| १०१ | १५ | ऊत ? | वूत ? |
| १०१ | १६ | गाऊत | गावूत |
| १०२ | २४ | पुरता | परता |
| १०३ | १७ | ब्रह्म | ब्रह्में |
| १०५ | ६ | ऐसा | असा |
| १०५ | १५ | कीं | कां |
| १०५ | १५ | पाहतां | पाहतां तो |
| १०७ | १७ | ओसर | ओस |
| १०७ | २० | मेळ | मेरु |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १०८ | ३ | वीतकर | वीतभर |
| १०८ | ८ | तव | तंव |
| १०८ | १६ | क्षुधार्ति | क्षुधार्थि |
| १०८ | १६ | तृषार्ति | तृषार्थि |
| १०९ | १ | सांगती | सांगाती |
| १०९ | १८ | भाव नाहीं | नाहीं भाव |
| १११ | १५ | नाम या | नामया |
| ११२ | ४ | जेवीन | जेवीना |
| ११२ | ५ | मज झडकरी | झडकरी मज |
| ११२ | ९ | भासत | भासते |
| ११२ | १३ | उमा | उभा |
| ११४ | ७ | अंगासंगें | अंगसंगें |
| ११४ | ८ | नाम्या | नामा |
| ११४ | १२ | भक्तिमागे | भक्तियोगें |
| ११४ | २१ | मैळगिरी | मैलगिरी |
| ११५ | १ | मोहकासी | मोहोळासी |
| ११५ | ७ | पेरूनी | पेरुनी |
| ११७ | १ | पाळ | पाल |
| ११७ | २ | मेसवा | येसवा |
| ११८ | १० | भेट | भेटी |
| १२० | २० | दोनी | दोही |
| १२१ | १२ | लोप | लेप |
| १२२ | १४ | कारे | कां हें |
| १२२ | १८ | झालीं | झालों |
| १२३ | १२ | विवेका विवेक | विवेकाविवेक |
| १२४ | ४ | तपोनिधा | तपोनिधी |
| १२६ | १३ | या चरणानंतर नवा चरण हवा | अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान \| ब्रह्म सनातन तया कैंचें ॥४॥ |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२६ | १४ | ॥४॥ | ॥५॥ |
| १२६ | १८ | सप्रेमच्च | सप्रेमता |
| १२८ | १० | समर्पिला जीव इ. | समर्पिला नाहीं जीव। जाणावा हा व्यभिचार॥४॥ |
| १२८ | १८ | सिंदळीच्या | सिंदळीचा |
| १२८ | २० | नाव लोकं | नावलोकं |
| १२८ | २० | चांडाळा ऐसा | चांडाळऐसा |
| १२९ | ११ | झालीं | झालों |
| १२९ | १३ | संदेह फेडी | संदेह माझा फेडी |
| १२९ | १७ | भार | थार |
| १३० | ४ | या चरणानंतर नवे चरण हवे | हा माझा आचार हा माझा विचार। हा माझा निर्धार नाम तुझें ॥७॥ तुका म्हणे दुजे सांगायासी नाहीं। नामेविण कांहीं धनवित्त ॥८॥ |
| १३१ | ९ | आपल्या | आल्या |
| १३२ | २४ | नव जातां | नवजातां |
| १३३ | ७ | ऐक | ऐकोनि |
| १३६ | १४ | वाचे विण | वाचेविण |
| १३६ | १९ | एकपणें विण | एकपणेंविण |
| १३७ | १ | उठि रे | उठिरे |
| १३७ | १ | उघडी स्वरूपलोचना | उघडीस्वरूपलोचना |
| १३७ | ३ | नेइ | नेई |
| १३७ | १३ | साधकवृंदे | साधकवृंदें |
| १३८ | ३ | चित्त | चीत्त |
| १३८ | १३ | तें | जें |
| १३८ | २० | घडिलीं | घडिली |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३९ | १ | मह्या | माह्यां |
| १३९ | २ | नाहीं | नाहिं |
| १३९ | ३ | मह्या | माह्यां |
| १३९ | ६ | सौख्यच | सोख्य च |
| १४० | ७ | घाडिघाडि | घाडि घाडि |
| १४० | ७ | त्रिघडे | विघडे |
| १४१ | ५ | सोडून | सांडून |
| १४१ | १२ | दुश्चित्त | दुश्चीत्त |
| १४४ | ६ | सुःशासन | सुःशान |
| १४४ | १० | भला | मला |
| १४५ | १ | श्रीमद्भगवतालागिं | श्रीमद्भागवतालागिं |
| १४५ | ३ | म्हणावें | म्हणावे ? |
| १४५ | ४ | तंतूपटीं | तंतू पटीं |
| १४६ | २२ | विवरीं | विवरीं ? |
| १४७ | १४ | पावलां ? | पावलां |
| १५० | ६ | बसवा | वसवा |
| १५५ | २ | शिशुपालवल | शिशुपालवध |
| १६७ | १० | गलामांच्या | गलीमांच्या |
| १७० | १२ | प्रतिपानद | प्रतिपादन |
| १७६ | २१ | कार्यभाग | कथाभाग |
| १९२ | १५ | रामजोश्यांच्या | प्रभाकरांच्या |
| | | प्रस्तावना | |
| ७ | २२ | (अशक्यास शक्य करणारा), | अशक्यास शक्य करणारा दीर्घप्रयत्न, |
| १८ | १४ | रस | भाव |
| १८ | शेवटची | मुग्धा वृत्तीचें | मुग्धावृत्तीचें |
| २४ | उपान्त्य | ब्रह्मानंद स्वादसहोदर | ब्रह्मास्वादसहोदर |